# एकनाथांचे अभंग (संत एकनाथ महाराज-पैठण)---- सौ.मानसी वैद्दय,ठाणे



## अव्दैत

**उद्भवला ॐकार त्रिमातृकेसहित** । अर्ध मातृके परते प्रणवबीज । माया महतत्व जाले तिन्ही गुण । चौ देहांची खुण ओळखावी । अंतःकरणी जाला तत्वांचा प्रसव । पंचतत्वे सर्व रूपा आली । पांचही गुण जाले पंचवीस । परी भानुदास वेगळाची ।।१।।

**षडविकार आणि सप्त चक्रावळी** । अष्ट भिन्न जाली प्रकृती ते । नवनाडी रचना दश इंद्रियांची । अकराव्या मनाची गति तूंची । विषय इंद्रिय वासना उत्पत्ती । तुजमाजी येती जाती सर्व । चिन्मयाचा दीप साक्षित्वासी आला । भानुदास त्याला नाम जाले ।।२।।

**वाचा आणि अवस्था भोग अभिमानी** । पुरुषार्थ खाणी चारी मुख्य । किटक भ्रमर जंगम स्थावरत्व । भरले महत्तत्व कोंदाटोनी । चेताविता याला कोण आहे येथे । ओहं सोहं भाते

लाऊनियां । फुंकितो तो उभारा केला आणिक दुसरा । वर्म गुरुपुत्रा न कळेची । सृष्टीचा उभारा केला तो संकल्प । भानुदास दीप प्रज्वळिला ।।३।।

**तुजपासाव सर्व परी तूं नोहेसी** । ऐसे आपणासी बुझे बापा । कर्तुत्व करोनी आहे तो निराळा । परब्रह्म निर्मळा मळ नाही । देहाचीये ऐसी करुनी निराशा । स्वस्वरुपी ठसा ठसलासी । चिन्मयरूप मूळ ॐकार बीज । भानुदासी निज लाधले ते ।।४।।

**जाडीचे घोंगडे येव्हढीये राती** । कानीची कुंडले करी जगाज्योती । वोळखिला वोळखिला खुणा । वोळखिला मय पंढरीचा राणा । होये न होये ऐसा संशय गमला । निर्धारित विश्र्वव्यापक देखिला । हृदयमंदिरी दाटोनी धरावा । ही खुण सांगे भानुदास देवा ।।५।।

**तुज पाहू जाता नये कांही हातां** । अससी तत्वतां साध्य नाही । तुझा तूंची मागें परतोनी पाहें । तुजपाशी आहे भुलुं नको । पिंडी ते ब्रह्मांडी बोलताती वेद । होई तू सावध भुलु नको । भुललिया माया श्रम तुज झाला । फिरशी वेळोवेळां चौऱ्यांयशी । चौऱ्यांयशी आवर्तने होती गा तुज । सांगतसे गुज जीवी धरा । भानुदास म्हणे सद्‌गुरू करणे । पुरवील तुमचे पेणे निश्र्चयेंसी ।।६।।

**अवतारादिक जाले कर्मभूमी आले** । विश्र्व जनी देखिले आपुले डोळा । देखिल्या स्वरूप नुद्धरे काय जन । ते काय म्हणोन सांगो स्वामी । उध्दरत काय नाही आत्मज्ञान । देखिले **ते जाण सर्व वाव** । वाव म्हणो तरी कोंदले स्वरूप । लावलीया माप मोजवेना । देखत देखत वेडावले जन । रूप डोळेवीण पाहू जाती । भानुदास म्हणे सद्‌गुरूच्या लोभे । आहेची ते उभे विटेवरी ।।७।।

## श्रीविठ्ठलमाहात्म्य

**अनादि परब्रह्म जे का निजधाम** । ते ही मूर्ती मेघ:श्याम विटेवरी । जे दुर्लभ तिही लोका न कळे ब्रह्मादिका । तपे पुंडलिका जोडलेसे । जयाते पहाता श्रुती परतल्या नेति नेति । ती हे परब्रह्म मूर्ति विटेवरी । वेदा मौन्य पडे श्रुतीसी सांकडे । वर्णिता कुवाडे पुराणांसी । ज्ञानीयांचे ज्ञान मुनीजनांचे ध्यान । ते परब्रह्म निधान विटेवरी । पुंडलिकाचे तपे जोडलासे ठेवा । भानुदास देवा सेवा मागे ।।८।।

**अव्दय आनंद तो हा परमानंद** । शोभे सच्चिदानंद विटेवरी । सावळे रुपडे गुणा अगोचर । उभा कटी कर ठेऊनि विटे । पितांबर परिधान चंदनाची उटी । रुळे माळ कंठी वैजयंती । भानुदास म्हणे ब्रह्म अगोचर । नेणवे विचार ब्रह्मादिका ।।९।।

**वेदी सांगितले श्रुति अनुवादिले** । ते ब्रह्म कोंदले पंढरीये । वाळवंटी बुंथी श्रीविठ्ठलनामे । सनकादिक प्रेमे गाती जया । भानुदास म्हणे तो हरि देखिला । हृदयी सांठविला आनंदभरित ।।१०।।

**चन्द्रभागेतीरी उभा विटेवरी** । विठ्ठल राज्य करी पंढरीये । ॠद्धिसिद्धि धृती वोळंगती परिवार । न साहाती अवसर ब्रह्मादिकां । सांडोनि तितुले यथाबीजे केले । कवणे चाळविणे कानडीयासी । उष्णोदक मार्जन सुगंधचर्चन । भीवरा चंदन पाट वाहे । रंभा तिलोत्तमा उर्वशी मेनिका । कामारी आणिका येती सर्व । कनकाचे परयेळी रत्नाचे दीपक । सुंदर श्रीमुख ओवाळिती । संत भागवत सकळ पारुशले । नि:शब्द होऊनि ठेले तुजविण । रक्माबाई ती येई पंढरीच्या राया । अगा कृपावर्या पांडुरंगा । धन्य पंढरपूर विश्रांति माहेर । धन्य भीमातीर वाळुवंट । भानुदास म्हणे चला आह्मांसवे । वाचा ॠण देवे आठवावे ।।११।।

**जैसा उपनिषदाचा गाभा** । तैसा विटेवरी उभा । अंगी चिया दिव्य प्रभा । धवळिले विश्र्व । उगवती या सुरज्या । नवरत्ने बांधू पूजा । मुकुटी भाव पै दुजा । उपमा नाही । दोन्ही कर कटी । पितांबरी माळ गांठी । माळ वैजयंती कंठी । कौस्तुभ झळके । कल्पद्रुम छत्राकार । तळी त्रिभंगी बिढार । मुरली वाजवी मधुर । श्रुति अनुरागे । वेणूचेनि गोडपणे । पवन पांगुळला तेणे । तोही निवे एक गुणे । अमृताधारी । अहो लेणियाचे लेणे । नादुसुखासी पै उणे । विश्र्व बोधिले येणे । गोपाळवेषे । पुंडलिकाचेनि भावे । श्रीविठ्ठल येणे नावे । भानुदास हमणे दैवे । जोडले आम्हा ।।१२।।

**शंख चक्र गदाधरू** । कासे सुरंग पितांबरू । चरणी बिद्रा तोडरु । असुरावरी काडितसे । बरवा बरवा केशिराजु । गरु वहन चतुर्भुजु । कंठी कौस्तुभ झळके विजु । मेघ:शाम देखो । करी सृष्टिची रचना । नाभी जन्म चतुरानना । जग हे वाखामदना । ते लेकरू तयाचे । कमळा विलासली पायी । आर्त तु शीचे ठायी । ब्रह्मादिका अवसरु नाही । तो यशोदे वोसंगा । उपमा याची कवणे अंगा । चरणी जन्मली पै गंगा । सोळा सह संभोगा । नित्य न पुरती कामिनी । अधिष्ठान गोदातीरी रिद्धीसिद्धि तिष्ठती व्दारी । भानुदास पूजा करी । वाकपुष्पे अनुपम्य ।।१३।।

**लावण्य रुपडे पहा डोळेभरी** । मूर्ति हे गोजिरी विटेवर । राही रखुमाई सत्यभामा आई । गरुड हनुमंत ठायी उभे असती । चन्द्रभागा तीर्थ पुंडलीक मुनी । दक्षणवाहिनी शोभतसे । वेणुनादी काला गोपाळ करिती । भानुदास तृप्ति पाहुनिया ।।१४।।

**देखतांचि रूप विटेवरी गोजिरें ।** पाहता साजिरे चर कमळ । पाहता पाहता दृष्टी धाये जेणे ।वैकुंठीचे पेणे सहजहाती । भानुदास हमणे लावण्यपुतळा । देखियेला डोळा पांडुरंग ।।१५।।

**चतुर्भुज मूर्ति लावण्य रुपडे** । पाहता आवडे जीवा ब । वैजयंती माळा किरीट कुंडले । भूषण मिरविले मकराकार । कासे सोनसळा पितांबर पिवळा । कस्तुरीचा टिळा शोभे भाये । शंख चक्र हाती पद्म ते शोभले । भानुदासे वंदिले चरणकमळ ।।१६।।

**गोड साजिरे रूपस ।** उभा आहे हृषिकेश । योगी ध्यातं जयास । तो हा सर्वेष साजिरा । रूप मंडित सगुण । शंखचक्र पद्म जाण । गळां वैजयंती भूषण । पितांबर मेखळा । कस्तूर चंदनाचा टिळा । मस्तकी मुकुट रेखिला । घवघवीत घन सावळा नंदरायाचा नंदनु । हरुषे भानुदास नाचे । नाम गातसे सदा वाचे । प्रेम विठोबाचे । अंगी वसे सर्वदा ।।१७।।

**उन्मनी समाधी नाठवे मनासी** । पाहतां विठोबासी सुख बहु । आनंदाआनंद अवघा परमानंद । आनंदाचा कंद विठोबा दिसे । जागृती स्वप्न सुषुप्ती नाठवे । पाहता साठवे रूप मनी । नित्यता दिवाळी नित्यता दसरा । पाहता साजिरा विठ्ठलदेव । भानुदास हमणे विश्रांतीचे स्थान । विठ्ठल निधान सापडले ।।१८।।

**जन्मोजन्मी आम्ही बहुपुण्य केले** । म्हणोनी विठ्ठले कृपा केली । जन्मोनी संसारी जाहलो त्याचा दास । माझा तो विश्र्वास पांडुरंगी । आणिका दैवता ने घे माझे चित्त । गोड गाता गीत विठोबाचे । भ्रमर मकरंदा मधासी ती माशी । तैसा या देवासी मन माझे । भानुदास हमणे मज पंढरीसी न्यारे । सुखे निरवारे विठोबासी ।।१९।।

**आलो दृढ धरुनी जीवी** । तो गोसावी भेटला । जन्म मरण हरला पांग । तुटला लाग प्रपंचा । इच्छा केली ती पावलो । धन्य जाहलो कृतकृत्य । भानुदास म्हणे देवा। घ्यावी सेवा जन्मोजन्मी ।।२०।।

**वेदशास्त्रांचे सार** । तो हा विठ्ठल विटेवर । पुढे शोभे चन्द्रभागा । स्नाने उद्धार या जगा । पद्मतळे गोपाळपुर । भक्त आणि हरिहर । भानुदास जोडोनी हात । उभा समोर तिष्ठत ।।२१।।

## पंढरीमाहात्म्य

**हेचि साधकाचे स्थळ** । भोळे वंदिती निर्मळ । अभाविक जे खळ । तया नावडे सर्वथा । ते हे जाणा पंढरपूर । मोक्ष मुक्तीचे माहेर । करती जयजयकार । वैष्णव ते आनंदे । टाळघोळ चिपळ्या नाद । दिंड्या पताका मकरंद । गाती विठ्ठलनाम आल्हाद । अट्टाहास

करुनी । भानुदास अहोराती । देवा करितसे विनंती । या वैष्णवाचे सांगाती । मज जन्म देई देवा ।।२२।।

**न येसी योगीयांच्या ध्याना** । न बैससी मुनीजनांच्या मना । तो तु पंढरीचा राणा । भीमातीर निवासी । साक्ष अससी सर्वाभूती । असुनी न दिसे जगती । पांडुरंग बाळमूर्ती प्रकट उभी विटेवरी । न कळे शास्त्रिका संवाद । शब्दी न सापडे बोध । तो तु उभा परमानंद । पुंडलीक व्दारी । वेदा अचोज आयुला । श्रुती करती गलबला । तो तू घननीळ सावळा । भानुदास अंतरी ।।२३।।

**आगम निगमांचे स्थान** । सर्व हेचि प्रमाण । मुनिजनांचे ध्यान । ती हे मूर्ति विटेवरी । धन्य धन्य पंढरपूर । सर्व तीर्थांचे माहेर । जडजीवां उद्धार । पांडुरंग पहातांची । उत्तम तीर्थ चन्द्रभागा । स्नान करिता दोष भंगा । मध्ये पुंडलीक उभा । दरुशने तारी जगत्र । भानुदास विनंती करी । प्रेमे नाचा महाव्दारी । विठ्ठल डोळेभरी । पाहता मुक्ति प्राणिया ।।२४।।

**दांभिकाचा देव प्रतिमा धातूची** । अज्ञान जनाची निष्ठा तेथे । योगियांचा देव हातापायाविण । भक्ताचा सगुण विटेवरी । मानसिक पूजा कर्मठालागी । केले कर्म भोगी निश्र्चयेसी । आमुचा हा देव दोही विलक्षण । निरालंब खूण आहे त्याची । साक्षीचाही साक्षी आनंद जिव्हाळा । भानुदास लीळा गुज सांगे ।।२५।।

**देखोनिया पंढरपूर** । जीवा आनंद अपार । टाळ मृदंग वाजती । रामकृष्ण उच्चारिती । दिंड्या पताकांचा मेळ । नाचती हरुषे गोपाळ । चन्द्रभागा उत्तम स्थान । स्थाने पतीत पावन । पुंडलिका लागता पाया । चुके येरझार वांयां । pahata विठ्ठलमूर्ती । भानुदासासी विश्रांती ।।२६।।

**न मागता काही न करिता सेवा** । आलासी गा देवा पंढरीये । तू का मायबाप विश्र्वासी तारक । तुवां पुंडलीक सुखी केला । चरितां गोधने आलासी बा पायी । पुंडलीक काही न बोलेची । चिन्मयाचा दीप साक्षीत्वासी आला । भानुदास त्याला नाम झाले ।।२७।।

**पंढरीचे सुख पुंडलीकासी झाले** । तेणेही वाटिले भक्तालागी । भुक्तिमुक्ति वरदान दीधले । ते नाही ठेविले आपणापाशी । चन्द्रभागे तीरी आश्रम पुंडलीकाचा । तो विसावा तीर्थांचा तीर्थराव । एके गुप्तरूप म्हणोनी मौनची धरिले । एकी चोहटा उभे केले परब्रह्म । कटी कर विराजीत उभा असे निवांत । समचरण शोभत ध्यान मुद्रे । समदृष्टी साजिरी कमळनयन वरी । पितांबरधारी श्यामप्रभा । ऐसा बरवया वरवंट उभा असे नीट । मस्तकी

मुकुट तेज:पुंज । भक्तिज्ञानवैराग्य दिधले भजना । वैकुंठीचा राणा भाग्यवंतु । ऐसा सुखाचा सागरू विठ्ठल कल्पतरू । पुंडलीक थोरु भक्तराज । भानूदासस्वामी तपे पूर्ण झाला । जो भक्तजना झाला मायबाप ।।२८।।

**परलोकीची वस्तु पंढरीसी आली** । ती दैवे फावली पुंडलिका । घेता देता लाभ बहुतांसी जाला । विसांवा जोडला पांडुरंग । न करिता सायास वस्तूची आयती । वैष्णवी बहुती वेटाळिली । भानुदासस्वामी कृपेचा सागरु । विठ्ठल कल्पतरू वोळला आम्हा ।।२९।।

**माणिकांचे तारू चन्द्रभागे आले** । भूषण ते जाले सनकादिका । पंढरपूर हे नीळियांची खाणी । नवलाव साजणी देखियेला । अवघिया देशांसी न्यावया पुरले । आगरी उरले जैसे तैसे । भानुदास म्हणे नीळ हा चोखडा । सुजड्ड हा जडा जीवन मुद्रा ।।३०।।

**धन्य धन्य हे नगर** । भूवैकुंठ पंढरपूर । धन्य धन्य चन्द्रभागा । मध्ये पुंडलीक उभा । धन्य धन्य वेणुनाद । क्रीडा करितो गोविंद । धन्य पद्माळ्याची पाळी । गाई चारी वनमाळी । धन्य पंढरीचा वास । देवा गाये भानुदास ।।३१।।

**पंढरीचे सुख पाहता अलौलिक** । वैकुंठनायक उभा जेथे । देवा जे दुर्लभ भक्तांसी सुलभ । रुक्मिणीवल्लभ उभा विटे । वैष्णवांचा मेळ करिती गदारोळ । त्यामाजी गोपाळ सप्रेमे नाचे । जिकडे पाहे तिकडे होय ब्रह्मानन्द । भानुदास आनंद गात असे ।।३३।।

**धर्मशास्त्री आहे नीत** । पुनीत क्षेत्र सप्तपुऱ्या । काशी आदि असती सप्त । परि पवित्र पंढरी । न बाधीच पापलेश । ऐसा उल्हास नामाचा । सदाकाळी वैष्णवजन । गाती पावन हरी । धन्य त्यांचा रहिवास । नित्य गातो भानुदास ।।३४।।

**आवडोनि कर कटी** । पाऊले नेहटी विटेवरी । त्याचा छंद माझे जिवा । नाही हेवा आणिक । काया वाचा आणि मन । लाभले सगुण रूप देखता । भानुदास ह्मणे दृष्टी । पहाता गोमुटी मूर्ति ते ।।३५।।

## नाममहिमा

**आमुचिये कुळी पंढरीचा नेम** । मुखी सदा नाम विठ्ठलाचे । न कळे आचार न कळे विचार । न कळे वेव्हार प्रपंचाचा । असो भलते ठायी जपू नामावळी । कर्माकर्म होळी होय तेणे । भानुदास म्हणे उपदेश आह्मा । जोडीला परमात्मा श्रीराम हा ।।३६।।

**जपता नाम विठ्ठलाचे** । भय नाही हो काळाचे । नाममन्त्र त्रिअक्षर । करी सदा तो उच्चार । विठ्ठलनामे सुख आनंद । भानुदास परमानंद ।।३७।।

**तुमचे नाम गोड नाम गोड** । पुरवी कोड जीवाचे । वाचे सुलभ नामावळी । महादोषा होय होळी । सुख अनुपम्य गाता नाम । भानुदास म्हणे आम्हा विश्राम ।।३८।।

**नामाचा महिमा शुक सांगे** । परिक्षिती राजा जाणे अंगे । जपताचि रामकृष्ण नामे । दहन होती कर्माकर्मे । नामे दया शान्ति क्षमा । नामे शीतळ शंकर उमा । नाम जप ध्यानी मनी । भानुदास वंदितो चरणी ।।३९।।

**एक नामापरते साधन** । नाही नाही दुजे आन । वायां धावती बाराडी । करती संसाराची जोडी । न चुके जन्म-मरण येरझारा । हे तो न कळें पामरा । नामावाचुनी जे जे कर्म । अवघा जाणा तो अधर्म । भानुदास प्रेमे नाचे । सदा नामघोष वाचे ।।४०।।

**चार युगा माजी पावन** । कलिमाजी सोपे भजन । मना दृढ करूनि साचा । विठ्ठल विठ्ठल वदे वाचा । संकल्प विकल्प नको भिन्न । तेणे पावे हरिचरण । नामे जीवीचा जिव्हाळा । भानुदास जीवनकळा ।।४१।।

**तारक नाम सोपे साचे** । विठ्ठल विठ्ठल वदता वाचे । जन्ममृत्युचे खंडन । पापातापाचे दहन । नामे निजध्यास देखा । भानुदास सुखे सुखा ।।४२।।

## रामनाममहिमा

**श्रीराम आह्मा सोयरा सांगाती** । नाही पुनरावृत्ति जन्म कर्म । तुटती यातना देहाचा संबंध । श्रीराम बोध ठसता जीवी । येरझार खुंटली वासना तुटली । वृत्ती हे जडली श्रीरामपायी । भानुदास म्हणे कुळीचे दैवत । श्रीराम समर्थ अयोध्येचा ।।४३।।

**भवसिंधू तरावया सोपे हे वर्म** । मुखी तो श्रीराम जप सदा । यमाची यातना न घडे बन्धन । तुटेल हे जाण कर्माकर्म । योगयाग तपे घटती  तीर्थाटन । मुखी गाता नारायण जोडे सर्व । भानुदास ह्मणे कलीमाजी सोपे। नामस्मरण जपे श्रीविठ्ठलाचे ।।४४।।

**बैसोनी अनुष्ठान रामनाम ध्यान** । यापरि साधन नेणे काही । एकविध भाव दृढता हे मन । यापरि साधन आन नाही । परद्रव्य परदारेचा विटाळ । यावीण निर्मल तप नाही । भानुदास ह्मणे रामनाम गुढी । लावली चोखडी कलियुगी ।।४५।।

**पशुपक्षी श्र्वापद कीटक भ्रमर** । रामनाम उद्धार एकाचे होय । ह्मणोनिया करा नामाचे चिंतन । तुटेल बन्धन यमपाश । सोपे वर्म तुह्मा सांगितले गुज । भानुदास निज जप करी ।।४६।।

**शरणागत जाहलिया उपेक्षीना देव** । हा आहे अनुभव माझे देहि । हो का राव रंक कुळ यातिहीन । करता नामस्मरण न वंची देव । भानुदास ह्मणे स्मरा त्या रामासी । चुकेल चौऱ्यायशी येरझार ।।४७।।

**कल्पना अविद्दया सांडोनिया गोडी** । रामनाम जोडी करी चापा । येर ते मायीक नको पडू छंदा । आठवी गोविंदा एकपणे । व्दैताची ते वाढी छेदुनियां काढी । नामाची तू गुढी उभवी सदा । भानुदास ह्मणे सांडोनी कल्पना । चिंती तू चरणा विठोबाच्या ।।४८।।

## मुमुक्षुस बोध

**ये संसारी बहूता वाटा** । सिद्धा साधका सुभटा । दीप देहीचा गोमटा । तंबची ठाका सुपंथू । मग आयुष्याच्या अस्तमानी । पडलिया काळाच्या वदनी । ते वेळे न राखे मायराणी । वडवा जखिणी प्राणियां । मार्गु सांपडला निगुती । ध्रुव प्रल्हाद परिक्षिती । वाटा हाती आम्ही तयाचे सांगाती । भावे भक्ति अनुसरलो । लहाना आणि सहाना । इडा पिंगळा सुषुन्मा । पवन पंथ योगी जाणा । ब्रह्मस्थाना न्यावया । तेथे सप्त धातूंची आटणी । या नाव बोलिजे कुंडलिनी । ती तंव असाध्य कहाणी । तुम्ही त्या पंथी नव जावे । एक यज्ञाचेनि बळे । इच्छी स्वर्गाची फळे । दिवस चारी सोहळे । पुरती इंद्रियाचे । तप वेंचलीया पुढती । मागुती मृत्युलोक लोटिती । तेथे आहे पुनरावृत्ती । तुह्मीं त्या पंथे नव जावे । नाना बलिदाने देती । गळा वोखदे बांधिती । क्रूर दैवते पूजिती । ते काय पूरविती इच्छिले । तैसा नव्हे लक्ष्मीपती । त्याची कोणी न करिती भक्ति । मूढ सिंतरले नेणो किती । तया होय गती यमपंथु । तीर्थे तीर्थ प्रदक्षिणा । क्षमा नाही अंतःकरणा । कोप आलिया उगाणा । होय केलीया पुण्याचा । तैसीच प्रतिज्ञा मते । गर्वे वाहावली बहूते । तुह्मी नव जावे तया पंथे । साधुसंगती अनुसरा । हरिश्र्चंद्र सुर्यवंशी । तेणे ठाकिली हो काशी । अर्थ दिधला महंतासी । स्त्रीपुत्रासी विकुनी । तैसेची बळी बिभीषण । हनुमंत उद्धव अक्रूर जाण । रुक्मानंद सुलक्षण । येणेचि पंथे उद्धरले । मेघ वर्षती धारा प्रबळा । तेणे वाहाती नदी नद वोहळा । त्या मीनलिया सिंधु जळा । अगाधपण पावती । तैसी ही विद्दया पाहाहो । श्रीगुरुचरणी प्रेमभावो । भानुदास ह्मणे हा उपावो । संसार वावो निस्तरेल ।।४९।।

**मनासी करी पां रे बोध** । आतां लवकरी होई सावध । सांडी व्दैत भेदाभेद । वाचे उच्चारी रामकृष्ण गोविंद । व्रत करी एकादशी । नेमे जाई पंढरीसी । आषाढी आणि कार्तिकीसी । दोही वारांसी चुको नको । सोपे वर्म ह्मणे भानुदास । नाचा गाता माना उल्हास । आणिक नको बा हव्यास । साधी साधन हेचि सोपे ।।५०।।

**योगाचिया आटी नको धरू पोटी** । वाया शीण तळवटी तुज होय । यज्ञाचिया आटी नको धरू पोटी । वाया शीण तळवटी तुज होय । जपाचिया आटी नको धरू पोटी । वाया शीण तळवटी तुज होय । तपाचिया आटी नको धरू पोटी । वाया शीण तळवटी तुज होय । अनुष्ठानाचिया आटी नको धरू पोटी । वाया शीण तळवटी तुज होय ।भानुदास ह्मणे रामनाम गोष्टी । धन्य तू सृष्टीमाजी होई ।।५१।।

**कामाचिया सोसे पडशी पतनी** । यमाची जाचणी बहु असे । क्रोधाचिया सोसे पडशी पतनी । यमाची जाचणी बहू असे । मदचिया सोसे पडशी पतनी । यमाची जाचणी बहु असे । लोभाचिया सोसे पडशी पतनी । यमाची जाचणी बहू असे । भानुदास ह्मणे सांडोनिया सोस । होईर उदास सर्वभावे ।।५२।।

**आशेचिया सोसे गुतंशी पामरा** । न चुकती येरझाऱ्या चौऱ्यांयशीच्या । तृष्णाचिया सोसे धावशी पामरा । न चुकती वेरझारा चौऱ्यांयशीच्या । तृष्णाचिया सोसे धावशी पामरा । न चुकती वेरझारा चौऱ्यांयशीच्या । कल्पनेच्या मागे धावशी कल्पका । न पावसी सुखा बुडसी वाया । भानुदास ह्मणे हे सर्व सोडुनी । एक चक्रपाणी सखा करी ।।५३।।

**साधनाच्या आटी नकोरे कपाटी** । पंढरी वैकुंठ पाहे डोळा । मंत्राच्या आटी पडशील व्यसनी । पंढरी जाऊनी पाहे डोळा । तपाचिया आटी पडशी डोंगरी । पाहे पां पंढरी डोळेभरी । यज्ञाच्या आटी फिरू नको देशा । पंडरीमिवासा पाहे डोळा । भानुदास ह्मणे नामाचा हव्यास । पंढरीसुखास पात्र होशी ।।५४।।

**भांबावसी कांरे माझे माझे म्हणसी** । कोण हे कोणासी कामा आले । घेई तू अनुभव कोणाचे ते कोण । अंतःकाळी जाण पारखे होती । जवळी असता धन काही रुका । तेव्हा ह्मणती सखा दादा भाई । हीनपणे ह्मणती अभागी करंटा । जन्मला फुकटा मरता बरे । भानुदास ह्मणे ऐसे हे जन । परि माझे माझे जाण करती वाया ।।५५।।

**नको फिरू रानी वनी तू दुर्गघाट** । सोपी आहे वाट पंढरीची । नको करू जप तप अनुष्ठान । सोपी आहे जाण पंढरी हे । नको जाऊ तीर्था मनाच्या हव्यासे । जाई तू उल्हासे पंढरीसी । नको जाऊ तीर्था मनाच्या हव्यासे । जाई तू उल्हासे पंढरीसी । नको योग अष्टांग

निर्वाण । सोपे ते भुवन पंढरी जगी । भानुदास ह्मणे सोपे वर्म राम । कासयासी श्रम करसी बहु ।।५६।।

## करुणा

**जे आकाश वर पडो पाहे** । ब्रह्मगोळ भंगा जाये । वडवानळ त्रिभुवन खाय । तरी तुमची वाट पाहे गा विठोबा । न करी आणिकाचा पांगिला । नामधारक तुझाची अंकिला । सप्त सागर एकवट होती । जै हे विरुनी जाय क्षिती । पंचमहाभूते प्रळय पावती । परि मी तुझाचि सांगाती गा विठोबा । भलं तैसे वरपडो भारी । नाम न संडो न टळो निर्धारी । जैसी पतिव्रता प्राणेश्र्वरी । विनवी भानुदास ह्मणे आधारी गा विठोबा ।।५७।।

**अगा पंढरिनाथा ऐसे काय केले** । मज उपेक्षिले अनाथासी । त्रैलोक्याचे ठायी मज नसे कोणी । ऐसे चक्रपाणी ठावे तुज । कोणाचे आधारे असावे म्यां येथे । जन्मविले व्यर्थ कां गा मज । आम्हासी क्लेशात बहु पांडियेले । काय हाता आले तुझ्या देवा । आमुच्या मनीचे अर्थ करिता पुर्ण । भानुदास ह्मणे जाण दुजा कोण ।।५८।।

**तुम्ही कराल ते काय एक नोहे** । ब्रह्मांड अवघे हे उभाराल । तुझिया सत्तेने सकळांचा प्राण । चालतसे जाण ब्रह्मांड हे । तुझिया सामर्थ्या नाही अंतःपार । तेथे मी किंकर काय जाणे । सर्व अपराधी शरण मी पतित । उपेक्षा त्वां माते न करावी । भानुदास ह्मणे पूरवा मनोरथ । तुझी अनाथनाथ पांडुरंगा ।।५९।।

**चंचळ हे मन नावरे माझ्याने** । कामाच्या व्यसने पीडितसे । अविवेकाचे बळ झाले असे फार । धावती षड्विकार सैरावैरा । विवेकाचे शक्ति होऊनिया क्षीण । सत्कर्मासी हीन बुद्धि झाली । चित्ताचा चालक अगा सूत्रधारी । भानुदासा हरि कृपा करी ।।६०।।

**अधोगती आम्हा जावे पंढरीनाथा** । ऐसे तुझ्या चित्ता आले काय । पडिलो पदरी अन्यायी मी दीन । नेई सांभाळून कैसे तरी । मज अनाथांची परिसावी विनंती । भानुदास स्तुति करीतसे ।।६१।।

**ऐसियासी कृपा करावी त्वरित** । पुरवी मनोरथ सर्व माझे । काकुलती कवणा येऊ तुजविण । दु:ख निवारण कोण करी । त्रैलोक्य पावन करिसी सर्वकाळ । त्याहुनी आगळे हेचि काय । तुझिया पायांचा मजला आधार । केवि तू निष्ठुर जाहलासी । आमुचे अन्याय न धरावे चित्ती । सर्व कृपामूर्ति पोटी घाली । कर्म धर्म माझे उत्तम आचरण । न पाहे पावन करी मज । भानुदास ह्मणे कृपेचे पोसणे । परि नारायणे सांभाळावे ।।६२।।

**देवा कोठवरी अंतः पाहतोसी** । प्राण कंठापाशी ठेवलेया । पळमात्र चित्ता नाही समाधान । चिंतेने व्यापून घेतलेसे । नानापरीचे दु:ख येवोनी आदळत । शोके व्याकुळ चित्त होत असे । यासी तो उपाय न कळेचि मज । शरण आलो तुज देवराया । इच्छा पूरवुनी सुखरूप ठेवी । भानुदास पायी ठाव मागे ।।६३।।

**मज निरविले कोणाचिये हाती** । वैकुंठी श्रीपती राहिलासी । कोणी नाही मज ठाऊक तुजला । संकटाचा घाला कैसा केला । दुरी टाकुनिया केलेसे निष्ठुर । दु:खाने बेजार केले मज । काय राग आला तुझिया मनात । तयामुळे शोकात पाडीयेले । अन्यायाची राशी देहेचि सगळा । हा राग गोपाळा न मानावा । क्षमा करी माझे सर्व अपराध । न धरावा भेद काही देवा । भानुदास ह्मणे अंगिकार त्वरित । करुनी आनंदात ठेवा पायी ।।६४।।

**कोठेवरी धावा करू तुझा देवा** । श्रम झाले जीवा फार माझ्या । आझूनिया का गा न ये त्वरित । दु:खाने बहुत जाकळिलो । कंठ रोधियेला श्र्वासावरी श्र्वास । घालुनी नेत्रास नीर वाहे । दाही दिशा मज वाटती उदास । झाला कासावीस प्राण माझा । हीन कर्म माझे फुटके अद्दष्ट । ह्मणवोनी संकट ऐसे झाले । भानुदास ह्मणे पहाता चरण । तळमळ जाण शांत झाली ।।६५।।

**दिनबंधु ब्रीद भले** । जरी त्वां चरणी बांधिले । तरी का आम्हा उपेक्षिले । सांग पंढरीराया । जीवनी हा अभिमान । तू तंव जगाचे जीवन । ब्रीद आपुले सांभाळी पुर्ण । पंढरीराया ।माता ती क्रोध द्दष्टी । परते बाळकासी लोटी । तरी ते चरणी घाली मिठी । पंढरीराया । सबळ काष्ठ कोरी भ्रमर । परि कमळ रक्षी निर्धार । तैसा तू प्रीतिकर । पंढरीराया । शरण निजभावेसी । भानुदास सेवेसी । तया तू नुपेक्षिसी । सांगे पंढरीराया ।।६६।।

**पतित ह्मणती तुम्हा** । ते आपुले ब्रीद सांभाळी अनंता । नको पा परता दास तुझा । तुझा दास ह्मणोनी जगी जाहली मात । अनाथांचा नाथ तूते ह्मणती । भानुदास ह्मणे सांभाळी वचन । पतीत पावन ब्रीद जगी ।।६७।।

**अनाथांचा नाथ भक्तांचा कैवारी** । ऐसे चराचरी ब्रीद गाजे । ते आह्मा सापडले सोपे वर्म हाता । म्हणोनी अच्युता बोलतसो । आम्ही पतीतानी घालावे साकडे । उगवणे कोडे तुमचे हाती । भानुदास विनवी चरणी ठेउनी माथा । सांभाळी अनाथनाथा आम्हालागी ।।६८।।

**दीन आम्ही रंक पतीत पतीत** । पावन तू अनंत स्वामी माझा । धरिला भरवसा नामावरी चित्त । नाही दुजा हेत मनी काही । देणे घेणे नको पुरला मनोरथ । बोलणे ती मात वेगळी असे । भानुदास ह्मणे अहो पंढरीराया । कृपाकरी सखया धरी हाती ।।६९।।

**अहो श्रीरामा पतीतपावना** । तारी मज दीना रंकपणे । गाजे त्रिभुवनी उदार ती ख्याती । वेदही वर्णिता महिमा तुझा । भानुदास म्हणे श्रीरामा दयाळा । पाळा बरवा लळा उदारपणे ।।७०।।

**भाकितो करुणा पंढरीच्या राया** । अगा यादवराया श्रीकृष्णरामा । तू माय माऊली जीवी जीवनकळा । भक्ताचा लळा पुरविसी । आवडे सावडे भक्तांचे कीर्तन । नाचसी येऊन निरभिमाने । भानुदास ह्मणे पुरवी माझे लळे । विठ्ठले सावळे माउलीये ।।७१।।

**अहो पांडुरंगा पतीत पावना** । आमुची विज्ञापना एक असे । नामाचा उच्चार संतांचा सांगात । पुरवावा हेत जन्मोजन्मी । भलतीये याती भालतीये कुळी । जन्म दे निर्धारी देवराया । भानुदास ह्मणे दुजा नको धंदा । रात्रंदिवस गोविंदा वाचे नाम ।।७२।।

**वेदान्त सिद्धांत एकोनिया गोष्टी** । मन जाहले चावटी देवराया । परि त्याचा बोध नये काही चित्ता । फजिती तत्वता मागे पुढे । संसाराचे जाळे पडतसे गुंती । करिता कुंथाकुंथी न निघेचि । भानुदास ह्मणे सावळ्या श्रीरामा । देई तुझा प्रेमा दुजे नको ।।७३।।

**माझा तो भरवसा तुझे नामी आहे** । येणे कार्य होय आमुचे देवा । तू जगाचे जीवन मनाचे मोहन । ब्रह्मसनातन तूची देवा। स्थावर जंगम जगी प्रकाशला । हा अजोच अबोला दिसे देवा । भानुदास ह्मणे विश्रांतीसी स्थान । पंढरीवाचून दुजे नाही ।।७४।।

**तुझिया रुपाची आवडी मज देवा** । वाचेसी तो हेवा रामनाम । श्रवणी ऐकेन तुमचे पोवाडे । दुजे वाडेकोडे न करी काही । चरणे प्रदक्षणा घालीन लोटांगणा । वंदिन चरणा संताचिया । भानुदास ह्मणे हीच मति स्थिर । रामनाम निर्धार गाईन मुखी ।।७५।।

**श्रवणी कीर्ति ऐकेन मुखे नाम गाईन** । डोळेभरी पाहीन श्रीमुख देवा । चरणे करीन प्रदक्षणा नमन चरणा । घालीन लोटांगणा संत व्दारी । एकादशी व्रत जागर निराहारी । व्दादशी क्षीरापती निर्धारी सेवीन मी । भानुदास ह्मणे हाचि माझा नेम । दुजा काही श्रम न करी आन ।।७६।।

**इही श्रवणी तुझे गुणनाम ऐकेन** । इही चरणी तीर्थपंथे चालेन । नशिवंत देह कवणीये काजा । ऐसी प्रेमभक्ति देई सहजा । अखंड तुझे नाम उच्चारी । तेणे संसारा होय उजरी । शालीग्राम तीर्थे करीन अंघोळी । हरिदासाचे चरणरज लावीन कपाळी । कंठमंडित तुळशी माळी । तन मन प्राण तुमते वोवाळी । उदरव्यथेलागी मी न करी धंदा । उच्छिष्ट प्रसादे सदा संतोषे । देवा भानुदास इतुके । चाड नाही आह्मा वैकुंठ लोके ।।७७।।

**एकाचिये घरी व्दारपाळ होय** । एकासी ते पाहे खांदा वाहे । एकाची आवडी उभा राहे । एका घरी कण्या आवडीने खाय । एका घरी न जय बोलविता । एकाचिये घरी उच्छिष्ट भातुके । खाय कवतुके मिटक्या मारी । भानुदास ह्मणे आवडीच्या सुखा । भुलोनिया देखा लोणी खाये ।।७८।।

**शेंबडी वाकुडी गौळियांची पोरे** । तेथे नाचे निर्धार आवडीने । जाणते वेदांती न करिती तिकडे तोंड । ह्मणे हे तो होती भांड शाब्दिक ते । चोरिताना लोणी बांधिती गौळणी । तेथे काकळूनि पाय धरी । यज्ञाचे ठायी अवदान नेवे । विदुरासी मागे आणी कण्या । भानुदास ह्मणे जाणते नेणते । दोनी ते सरते होती पायी ।।७९।।

**जे सुख क्षीरसागरी ऐकिजे** । ते या वैष्णमंदिरी देखिजे । धन्य धन्य ते वैष्णवमंदिर । जेथे नामघोष होय निरंतर । दिंडी पताका व्दारी तुळशीवृंदावन । मन निवताहे नामसंकीर्तने । ज्याच्या दरुशने पापताप जाय । भानुदास तयासी गीती गाये ।।८०।।

**तुम्ही कृपानिधी संत** । मी पतीत अन्यायी । सलगी वोलियेलो फार । न कळे निर्धार योग्यता । ह्मणवी द स तुमचा देवा । करितो हेवा पुढिल्यांचा । उच्छिष्ट प्रसादाची आस । ह्मणे भानुदास तुमचा ।।८१।।

## गुरुस्तुति

**ॐ अनंत निर्गुण सर्वाठायी पूर्ण** । न करी निर्वाण दासालागी । हाके बरोबरी धावोनी सत्वरि । भक्तालागी तारी गुरुनाथ । सुंदर ते ध्यान वसे औदुंबरी । व्याघ्र चर्मधारी शोभतसे । काषाय अंबर दंडकमंडलु । डमरू त्रिशूळ शंखचक्र । किरीट कुंडले रुद्राक्षाच्या माळा । वैजयंती गळा हर रुळे । सुर्य चन्द्र नेत्र शेष फणी छत्र । पितांबर वस्त्र परिधान । गुरुचरणी सर्व तीर्थांची मिरासी । म्हणोनी जगासी उद्धरिती । जनार्दन ह्मणे न लगे ब्रह्मज्ञान । गुरुचरणी मन राहो सदा ।।१।।

**जन्मा आलो मी संसारी** । सखी मानिली अंतुरी । निंदा केली व्दिजवरी । कैसा सद्‌गुरू जोडेल । नाही पूजिले गुरुवरा । नाही नमिले व्दिजवरा । नाही केले भजन सारा । कैसा भव हा आटेल । जालो परधर्मरत । अधर्म करिता वाटे हित । जन्ममरणाची खंत । कैसी आता वाटेल । संसारी मी दुखावलो । त्रिविध तापे मी पोळलो । दु:खी होऊनिया । आलो औदुंम्बरी या ठायी । आकलखोप कृष्णातीरी । गुरु वसती औदुंम्बरी । भक्तवत्सल तारी तारी । म्हणवूनी चरण वंदिले । जनार्दन पाप रासी । करुनी आलो तुजपासी । तारिसील या भरवसी । धरणे घेतले दारात ।।२।।

**दासा दु:ख जाले फार** । वेगे करा प्रतिकार । सुख मानिले संसारी । परि दु:ख जाले भारी । सोडुनिया मी स्वधर्म । अचारलो नीच कर्म । सेवा केली हीन याती । द्रव्य लोभे यातायाती । अन्नग्रास न पडे मुखी । पश्र्चाताप जला शेखी । पुण्यस्थान मी पावलो । गुरुचरणी विश्रांतलो । स्वामी विनंती अवधारा । दीनबंधु करुणाकरा । कर जोडूनिया शिर । ठेवयेले पायावर । जनार्दन जन्म नाम । मुखी राहो गुरुनाम ।।३।।

**नरहरी गुरुराया** । दिनबंधु सखया । करिसी दासा अंतराया । काय वाटे वाडियार । निशीदिनी हाका । वियोगाने वाढे शोका । निराश वाटे सेवका । निद्रा आली तुज काय । किंवा कोठे गुंतलासी । किंवा येथून गेलासी । किंवा आम्ही पापराशी । ह्मणउनी लपसी गुरुराया । तरी आह्मी कोठे जावे । कवण्या देवा आराधावे । दत्ता कृपावंता अवघे । शून्याकार त्रैलोक्य । गुरो मौन त्वा धरिले । आह्मा दु:खाने व्यापिले । जनार्दनास आवरिले । नाही सद्‌गुरू दीन बंधु ।।४।।

**आता गुरुराया परिसा विज्ञापना** । दासाची करुणा येऊ द्यावी । नेणोनिया सोय फिरलो दिशा दाही । झाले दु:ख देही बहुसाल । तुमची ब्रिदावळी पतितपावन । किर्ती हे ऐकोन शरण आलो । माझा मायबाप गणगोत बंधू । तूचि कृपासिंधू गुरुराया । आता काही नेणे तुमच्या पायावीणे । संसाराचे पेणे दूर केले । जोडोनिया हात शिर पायावरी । ठेविले निर्धारी जनार्दने ।।५।।

**कंठी राहो नाम हा माझा नवस** । पुरवावी आस गुरुराया । वसोनी अंतरी बोलवी उत्तर । जेणे हा संसार सार होय । सर्व चराचरी द्दष्टी ऐसी करी । दावी रूप हरी अखंडित । ऐशिया वासने स्वामी साह्य होणे । काल वाया जाणे ऐसे न हो । तुज ऐसा नाही त्रिभुवनी उदार । कृपे देई वर जनार्दना ।।६।।

**देवा सापडले वर्म** । स्मरण झाले वर्म कर्म । दुर्घट आचारलो धर्म । ऐकोनि घेई गुरुराया । जन्मोजन्मी जे जे केले । भले आजी ते सुचले । कळता मन संतोषले । करिता आता विस्तार । बालविधवे अलंगिले । एकासनी बैसविले । तिशी रमता मानिले । स्वर्गी सुख तृणतुल्य । द्दष्टी नसता ते भामिनी । वियोग दु:ख वाटे मनी । सन्निध नसता भोजनी । ग्रास नवजे उदरात । मायाबहिण मी सोडिली । इंद्रिये ती सुखावली । शेखी ऐसी गती झाली । गलित कुष्ट मी झालो । प्राप्त झाले अंगी वर्ण । दुर्गंधीने दिशा पूर्ण । शेखी बधिर झाले कर्ण । कीर्तन श्रवण मग कैचे । ऐसी कर्मे जन्मोजन्मी । करुनि आलो निच योनी । सर्व साक्ष येते मनी । किती म्हणोनी वर्णावी । दैव योगे उत्तम वर्ण । झालो याती मी ब्राह्मण । नाम जनार्दन जाण । सद्‌गुरू चरणी पावलो ।।७।।

**करुनी ऐसे आचरण** । प्राप्त जाले यमपट्टण । तेथील दु:ख ते दारूण । एकी वाचा वदवेना । कुंभपाकी बुडविले । तप्तभूमी चालविले । असीपत्र वनी फिरविले । कल्पकोटी संवत्सर । जळत खांबा पोळविले । कल्पकोटी संवत्सर । जळत खांबा पोळविले । तिखट शस्त्रे मार दिले । नरककुंडी मज घातले । अनंतकोटी कल्पवरी । ऐसे भोग म्या भोगिले । पूर्वपुण्य आठविले । सद्‌गुरू दयाळे ऐकिले । ह्मणउनी आलो या ठाया । माझी दया ती येईल । शरणागता उध्दरील । जनार्दना आपुला करील । ह्मणऊनि चरण वंदिले ।।८।।

**गुरुसख्या तुजविण** । जाऊ पाहे माझा प्राण । का हो कठिण केले मन । पाहे नेत्र उघडून । माता पिता ह्मणविले । तरी का निर्वाण मांडिले । आता यावे लवकरी । भेट द्यावी बा सत्वरी । यश घेई गुरुराया । जनार्दन ठेवी पायां ।।९।।

**अहो सद्‌गुरू दातारा** । ह्मणविसी करुणा करा । राज्य देऊनि रजकासी । शेखी नेले पायापाशी । ब्रह्मग्रहा दिले ज्ञान । केले आपणासमान । काय तुझ्या आराधिले । काय देवासी अर्चिले । त्यासी तुह्मी तारियेले । ब्रीद वत्सल-मिरविले । लीला दाविली लाघवा । शुष्क काष्ठासी पल्लवा । जनार्दना कृपा करा । राखे पायापे किंकरा ।।१०।।

**अहो सद्‌गुरू अनंता** । फार काय बोलू आता । नारायण कृपावंता । असो द्यावी माझी चिंता । भलते याती हो का जन्म । परी आवडो गुरुनाम । नामे पतीत तारिले । पशु पक्षी मोक्षा नेले । मातंगाचे मुखी वेद । लीले करविला संवाद । जरी करिसी अंगिकार । तरी काय माझा भार । जनार्दन चिंती भावे । याचे स्मरण असो द्यावे ।।११।।

**मुळी नाही गुण ह्मणोनी निर्गुण** । ब्रह्म परिपूर्ण गुरुनाथ । ज्याचे गुण गाता वेद मौनावला । शेष वोढावला झाला शय्या । ब्रह्मादिक ज्याचे जाले आज्ञाधर । मानव पामर कोण पुढे । तोची कृष्णातीरी वसे ओदुंबरी । दांसा कृपा करी तारावया । राव रंक याति वर्णन विचारी । भाविका अंतरी राहे सदा । स्मरता येतो ऐसे वेद बोभाईला । तया तो ब्रीदाला रक्षितसे । जया चित्ती ठेवा कल्याण असावे । गुरूसी रिघावे शरण वेगी । ऐसी वेदवाणी एकोनिया कानी । जनार्दना मनी निश्र्चय झाला ।।१२।।

**धन्य कृष्णातीर धन्य ओदुंबर** । जेथे गुरुवर वसतसे । धन्य तेचि नर येती जे यात्रेसी । दर्शनमात्रे त्यासी मोक्ष जोडे । अनंत जन्माची पातके संचित । नुरती किंचित तीर्थ घेता । वाचिता चरित्र सद्‌गुरू स्वामींचे होणे । व्यर्थ चिंता वाहणे संसाराची । गुरु-गीती गावा भावे चित्ती घ्यावा । सगुण पहावा डोळेभरी । जनार्दन ह्मणे तीर्थे त्याचेपाशी । चारी मुक्ती दासी होती त्याच्या ।।१३।।

**तुमचा प्रसाद लाधला मस्तकी** । श्रीदत्तराया तेणे जालो मी सुखी । वाचे वदे नाम दत्त दत्त आवडी । हीच माझी जोडी न करी दुजी । पायांचा आठव द्यावा सर्वकाळ । अखंड कल्लोळ नामघोष । म्हणे जनार्दना एकनाथा परीयेसी । ध्यान अहंनिशी दत्तात्रय ।।१४।।

## एकनाथमहाराजांना उपदेश

**संकल्प विकल्प ह्यावरी घाली शून्य** । मन करी निमग्न हरीपायी । उपासना द्दढ संतांचे चरणी । तेचि पै निर्वाणी तारक तुज । पडता जडभारी संत सहाकारी । सर्वभावे हरि तेचि होती । म्हणे जनार्दन एकनाथा न विसंबे । सोपा मार्ग ऐके सर्वभावे ।।१५।।

**नको गुंतू लटिक्या प्रपंचासी बापा** । मार्ग आहे सोपा पंढरीचा । न लगे पुसावे आटाआटी काही । आणिके प्रवाही गुंतू नको । भांबावल्यापरि जन झाले मूढ । विसरले द्दढ विठोबासी । म्हणे जनार्दन एकनाथा निके । साधी तू कौतुके हेची वर्म ।।१६।।

**देह शुद्ध करुनी भजनी भजावे** । आणिकाचे नाठवावे दोष गुण । साधने समाधि नको पां उपाधी । सर्व समबुद्धि करी मन । म्हणे जनार्दन घेई अनुताप । सांडी पां संकल्प एकनाथा ।।१७।।

**तीर्थे पर्यटन कासया करणे** । मन शुद्ध होणे आधी बापां । तीर्था जाऊनी काय मन शुद्ध नाही । निवांतची पाही ठाया बैसे । मन शुद्ध जालिया गृहीच देव असे । भाविकासी दिसे बैसल्या ठाई । ह्मणे जनार्दन हाचि बोध एकनाथा । याहूनि सर्वथा श्रेष्ठ नाही ।।१८।।

**एकविध भाव सर्वा ठाई धरी** । व्दैताची ती उरी उरऊ नको । हाचि अनुभव सुगम सोपारा । ययाची निर्धारा तरले बहु । धृव उपमन्यु बिभिषण नारद । गाई गोपवृंद सरते झाले । म्हणे जनार्दन एकनाथा निजखूण । विटेवरी समचरण पाहे द्दष्टी ।।१९।।

**मुख्य ती उपासना भक्ति** । ज्ञान विरक्ती तेणे जोडे । हेचि एक परमार्थ सार । आणिक विचार करू नये । योगयाग तपता तप । न जाय संकल्प मनीचा । ह्मणे जनार्दन एकनाथा सावध । हृदयी गोविंद आठवी सदा ।।२०।।

**आणिक या सृष्टी साधन पै नाही** । घेई पा लवलाही नाम वाचे । उभा दिगंबर कटी ठेउनी कर । शोभतसे तीर चंद्रभागा पुंडलीके निज साधिले साधन । ते तू हृदयी जाण धरी भावे । म्हणे जनार्दन एकनाथा हृदयी । विठ्ठलमंत्र ध्यायी सर्वकाळ ।।२१।।

**न करी आळस हरिचिया भजनी** । तेणे तुज निर्वाणी सुख होय । नाम गाय सोपे नाम गाय सोपे । चूकतील पापे जन्मोजन्मी । ह्मणे जनार्दन एकनाथा सोपे । कळीकाळाचे मापे रिते होय ।।२२।।

**विधिनिषेध थारा आवरी पसारा** । न जाय तू सैरा आणिके पंथा । पंथ सोपा जाणा पंढरी पावन । याहुनिया आन पंथ कोण । सर्वोत्तम तीर्थे देव आणि नाम । पुरती सर्व काम विठ्ठलपायी । ह्मणे जनार्दन ऐके एकनाथा । शरण तत्वता संता रीघे ।।२३।।

**तुळशी वृंदावन विष्णुचे पूजन** । भक्तीसी कारण मुख्य हेचि । सर्वाभूति दया भेद नोहे चित्ता । साधी परमार्थ हाचि एक । व्युत्पत्ति विचार न करी निर्धार । व्यर्थ वाया भार काय करिसी । म्हणे जनार्दन एकविध भजन । सांगितले जाण एकनाथा ।।२४।।

**सर्वाभूती भाव नको ठेऊ दुजा** । तेणे गुरुध्वजा समाधान । संतासी नमन आलिया अन्नदान । वापरते कारण आणिक नाही । सर्वभावे वारी पंढरीची करी । आणिक व्यापारी गुंतू नको । ह्मणे जनार्दन घेई हाचि बोध । सांडोनी सर्वदा व्देष भेद ।।२५।।

**आलिया अतिथा द्यावे अन्नदान** । याहुनी साधन आणीक नाही । हातासी कारण नाही पै भलता अन्न द्यावे । अन्न परब्रह्म वेदांती विचार । साधी हाची निर्धार प्रेम तत्वे । ह्मणे जनार्दन यापरते आणिक । नाही दुजे देख एकनाथा ।।२६।।

**सागरी वर्षला धन** । वृथा जाय ते जीवन । योगीयासी शीण तैसा । आदी आभासा अवसानी । अनुभवुनी पहता योग । नोहे व्यंग मग काही । ह्मणे जनार्दनी एका । योगनिका रामनाम ।।२७।।

**षोडक्या लाडक्या झाली भेटी** । दैन्य गेले उठाउठी । उभयतांची एकचि राशी । षोडके लाडक्यासी संतोषी । षोडका देव लाडका भक्त । उभय लोकी त्यांची मात । ह्मणे जनार्दन समरसले । एकनाथी रंगले हृदयामाजी ।।२८।।

**उदयेचे तीन व्दितीयेचे तीन** । अविनाशी देखणे संध्याकाळी । संध्याकाळी भावना टाकूनिया द्यावी । तेणेची हो घ्यावी समाधी सुखे । एकएक चक्रे आकाशा एवढी । त्यामध्ये चोकडी मोतियांची । मणियाची ज्योती संध्याकाळी वाती । तेलाविण दीप्ति पाजळिल्या । जनार्दन म्हणे एकनाथा घेई । रामाधी हे पायी सदगुरूच्या ।।२९।।

**उदय समाधी लागो तिन्ही वेळ** । अवघा ब्रह्मांड गोळ उदयो होतो । चक्रामध्ये चक्र येती व्योमाकार । आदि मध्य हेर ज्योती त्याची । व्दितीय प्रहरी समाधि कैसी परी । गुरुपुत्रा

हारी येणे रूपे । प्रथम समाधि निबिड सर्पाकार । त्यामध्ये आकार चक्राचे ते । झळकती माणिक दिव्य रत्नखाणी । अविनाश देखणी चिन्मयाची । उदयाची ज्योती व्दितीयेचा मणी । ही दोन्ही देखणी झाली बापा । उदयाच्या तीन व्दितीयेच्या तीन । अविनाश देखणे संध्याकाळी । संध्याकाळी संदेह टाकुनिया द्वयावे । त्याचेनि पै घ्यावे समाधि सुख । एक चक्र येती आभासा येव्हढी । त्यामध्ये चोकडी मोतीयांच्या । मानी ज्योती संध्याकाळी जे वानिती । ते लावण्य दीप्ति पाजळल्या । ह्मणे जनार्दन एकनाथा घेई । सोऽहं याची देही समाधि सुख ।।३०।।

**देहाची समाधी लागे तीन वेळा** । आपुली जीवनकळा शोधावी हे । कर्णी घालूनिया बोटे अंगळ्या नेत्रात निकटे । तेणे विकाशुनी भेटे शुभ्र वर्ण । त्याचे हे नाम बिब जीवदशा । तेणे स्वरूप दिशा भरुनी येती । तितक्या मध्ये न सोडावी समाधी । त्याच्यापुढे शोधी गुरुपुत्रा । स्वामीने पुसिले कैसे काय झाले । कैसे तुज भासले आत्मरूप । शिष्य म्हणे स्वामी धरिता कान डोळे । एकाएकी उमाळे आदित्याचे । विकासिला निर्मळ जैसा चंद्र दिसे । येताहे प्रकाशे आत्माराम । ह्मणे जनार्दन नव्हे एकनाथा । समाधी पहाता आळस केला ।।३१।।

**शिष्य म्हणे स्वामी पुढे कैसे पाहावे** । रिघत हे जावे अभ्यासासी । स्वामी ह्मणे समाधि घेई आता । तुझिया विकल्पता निववितो । अशंका जे झाली तुझी तुज ठेली । आम्ही नाही विचारिली समाधी तुज । प्रथम विकास पहावा शुभ्रवर्ण । त्याचे पुढे चांदणे चकचकीत । खद्द्योताचे वाणी सूर्य तारांगण । पुढे शोध जाण घेत जावा । बैसावे निश्र्चळ त्याचे अग्री डोळे । पहावे केवळ हसु तैसे । त्यामध्ये रीघावे स्वरूप पहावे । परि समाधीही जीवे सोडू नये । जिवाचा हा शिव देहाचा कुळस्वामी । तो अविनाशी खाणी प्रकटतो । ह्मणे जनार्दन त्या पोटी रिघावे । एकनाथा पहावे आत्मरूप ।।३२।।

**मन स्वस्थ चित्ती निश्र्चल मध्यरात्री । गुरुगुह्याचे एकांती रिघावे हो** । हंसा अंगीचा डोळा विकाशुनी कमला । त्याचे मध्यस्थला हरित जावे । चिन्मय अविनाश प्रकटती ज्योत । तोची प्राणनाथ देहाचा हा । त्यामुळे उभारा दिसे नीलवर्णी । तेचि स्वरूप जाण विराटाचे । जे ब्रह्मांडी असे तेचि पिंडी दिसे । बोलायाचा भास नाही पुढे । प्रथम समाधी बाहेर घ्यावी आधी । तेही स्वरूप वेधी समरसावे । यापुढे समाधी दुजी सांगेल कोण । त्यासी होईल पतन निश्र्चयेसी । म्हणे जनार्दन एकनाथापाशी । हेची भरून घेसी ओहं सोहं ।।३३।।

एकनाथ महाराज

**ॐनमो सद्‌गुरूनिर्गुणा** । पार नाही तव गुणा । वरोनी माझिया रसना । हरिगुणा वर्णवी । हरिगुण विशाळ पावन । वदवी तू कृपा करून । मी गूढमती दीन । म्हणोनी कीव भाकितसे । तुमचा प्रसाद जाहलिया पूर्ण । हरिगुण वर्णीन मी जाण । एका वंदितसे चरण । सद्‌गुरूचे आदरे ।।३४।।

**नमो व्यासादिक कवी हे पावन** । जे परिपूर्ण धन भांडाराचे । करुनी उपदेश तारिले बहुता । उपदेश तत्वता चालतरो । एकाजनार्दनी तुमचा मी दास । एवढी ही आस पुरवावी ।।३५।।

**परा पश्र्चन्ति मध्यमा वैखरी** । नमियली खरी आदिमाया । वरोनिया जिव्हे वदावे कवित्व। हरिनामी चित्त निरंतर । आणीक संकल्प नाही माझे मनी । एकाजनार्दनी वंदितसे ।।३६।।

**श्रीगुरुराया पार नाही तंव गुणी** । म्हणोनी विनवणी करीतसे । मांडिला व्यवहार हरिनामी आदर । सादरा सादर वदवावे । न कळेची महिमा उंच निचपणे । कृपेचे पोसणे तुमचे जाहलो । एकाजनार्दनी करुनी स्तवन । घातिले दुकान मोलेविण ।।३७।।

## कलिप्रभाव

**येउनि नरदेही वाया जाय** । नेणे संतसंग काही उपाय । कली वाढलासे अधम । ब्राह्मण सांडिती आपुले कर्म । शुद्ध याति असोनि चित्त । सदा नीचाश्रय करीत । देव पूजा नेणे कर्म । न घडे स्नानसंध्या धर्म । ऐसा कलीचा महिमा । कोणी न करी कर्माकर्म । एकाजनार्दनी शरण । घडो संतसेवा जाण ।।१।।

**मंत्र तंत्रांची कथा कोण** । गाइत्री मन्त्र विकिती ब्राह्मण । ऐसा कलीमाजी अधर्म । करिताती नानाकर्मे । वेदशास्त्री नाही चाड । वाया करिती बडबड । एकाजनार्दनी धर्म । अवघा कलीमाजी अधर्म ।।२।।

**कलीमाजी नोहे अनुष्ठान** । कलीमाजी नोहे हवन । कलीमाजी नोहे पठण । नोहे साधन मंत्राचे । नोहे योगयागविधि । नसती अंगी ये उपाधी । वाढतसे भेदबुद्धि । नोहे सिद्धी कोणती । करिताती नानाकर्मे । वेदशास्त्री नाही चाड । वाया करिता बडबड । एकाजनार्दनी धर्म । अवघा कलीमाजी अधर्म ।।३।।

**कलीमाजी नोहे अनुष्ठान** । कलीमाजी नोहे हवन । कलीमाजी नोहे पठण । नोहे साधन मंत्रांचे । नोहे योगयागविधि । नसती अंगी ये उपाधी । वाढतसे भेदबुद्धि । नोहे सिद्धी कोणती । न चले कर्माचे आचरण । विधिनिषेधाचे महिमान । लोपली तीर्थे जाण ।

देवप्रतिमा पाषाण । न ठाके कोणाचा कोठे भाव । अवघा लटिका वेवसाव । एकाजनार्दनी भेव । जेथे तेथे वसवते ।।४।।

**कोणासी न कळे अवघे जहाले मूड** । म्हणती हे गूढ वाया शास्त्र । आपुलाला धर्म नाचरती जनी । अपीक धरणी पीक न होय । अनावृष्टी मेघ न पुढे निर्धार । ऐसा अनाचर कलीमाजी । एकाजनार्दनी नीचाचा स्वभाव । न कळे तया भाव कोण कैसा ।।५।।

**पंडित शास्त्री होती नीच याती** । त्यांचे ऐकताती नीति ते धर्म । स्वमुखे ब्राह्मण न करती अध्ययन । होती भ्रष्ट जाण मद्दयपी ते । नीचाचे सेवन करती घरोघरी । श्र्वानाचिये परी पोट भरती । एकाजनार्दनी आपुला स्वधर्म । सोडुनिया वर्म होती मूढ ।।६।।

**कलीमाजी दैवते उघड दिसती फार** । नारळ शेंदूर यांचा भडिमार । लटिका भक्त लटिके सर्व वाव । सात ध्यानाचे धपाटे मागती काय त्याचा बडिवार । तेल रांधा मागती मलीदा वरती काजळ कुंकू । फजितखोर ऐसे देव तयाचे तोंडावर थुंकू । एका जनार्दनी सर्वभावे सोपा पंढरीराव । तया सांडोनी कोण पुसे या देवांची कायसी माव ।।७।।

**कलीयुगामाजी थोर जाले पाषांड** । पोटासाठी संत जाले उदंड । नाही विश्र्वास संतदया मानसी । बोलती वायाविण सौरस अवघा उपहासी । वेद पठण शास्त्र संभाषे पुराणमत । अवघे बोधोनि ठेवितो बोलती वाचाल मत । देव भजन संत पूजन तीर्थ महिमा न कळे मूढा । ऐसे कलीयुगी जाले जाणत जाणत दगडा । एकाजनार्दनी कायावाचा राम जपा । सोपे हे साधन तेणे नोहे पुण्यपापा ।।८।।

या पोटा कारणे न करावे ते करिती । वेद ते विकिती थोर याती । निचासी शब्दज्ञान सांगतो ब्राह्मण । ऐकती ब्रह्मज्ञान त्यांचे मुखे । श्रेष्ठवर्ण होऊनी नीचकर्म करिती । काही न ते भिती पुण्यपापा । एकाजनार्दनी सांडोनी आचार । करिती पामर नानामते ।।९।।

**वंदू श्रीभाविक जन** । ऐकावे साधन पावन । कल-युगी अज्ञान । अभाविक पै होती । न कळे श्रुती वेदशास्त्र । पुराण न कळे पवित्र । ज्ञान ध्यान गायत्री मंत्र । जप तप राहिले । यज्ञ यागादिक दान । कोणां न कळे महिमान । अवघे जाहले अज्ञान । न कळे काही । लोपेल मंत्र औषधे । गाईस न निघे दुग्ध । पतिव्रता ज्या शुद्ध । व्यभिचार करिती । ऐशियाने करावे काय । तिही घ्यावे विठ्ठल पाय । एकाजनार्दनी ध्याय। विठ्ठल नाम आवडी ।।१०।।

**कोण मानील हा नामाचा विश्र्वास** । कोण होईल उदास सर्वभावे । कलयुगामाजी आभाविक जन । करती उच्छदन भक्तिपंथा । नानापरीची मते नसती दाविती । नानामंत्र जपती अविधाने । एकाजनार्दनी पातकाची राशी । नाम अहिर्निशी न जपती ।।११।।

**अल्प ते आयुष्य अल्प धन कली** । मर्यादा हे केली संतजनी । अन्नमय प्राण न घडे साधन । नोहे तीर्थाटन व्रत तप । असत्याचे गृह भरले भांडार । अवघा अनाचार शुद्धबुद्ध । एकाजनार्दनी म्हणोनी येते कीव । बुडताती सर्व महाडोही ।।१२।।

# उपदेश

### भक्ति स्तोम माजविणाऱ्या बाह्य वेषधाऱ्यास उपदेश

**भजन चालिले उफराटे** । कोण कोण खरे खोटे । अग्निहोत्राचा सुकाळ । वडा पिंगळासी काळ । तिन्ही देव पिंपळात । अग्निहोत्री केला घात । म्हणती सोमयाग करा । मुख धरोनी मेंढा मारा । शेंदूर माखूनिया धोंडा । चाळविती पोरे रांडा । एकाजनार्दनी नेम । सर्वाठाई पुरुषोत्तम ।।१३।।

**भक्त रागेला तवके** । देव फोडोनी केले कुटके । कटकट मूर्ति मागुती करा । मेण लावुनी मूर्ति जडा । न तुटे न जळे काही न मोडे । त्या देवाचे केले तुकडे । राडवा म्हणती आगे आई । कैसा देव फोडिला बाई । जवळची शुद्ध असता देवो । भक्तासी पडिला संदेहो । शाळीग्राम शुद्ध शिळा । हारपलीया उपवास सोळा । चवदा गाठींचा बांधीला दोरा । तोही अनंत नेला चोरा । अनंतासी अंतू आला । भक्ता तेथे खेदू जाहला । एकाजनार्दनी भावो । नाही तंव कैचा देवो ।।१४।।

**देव म्हणती मेसाबाई** । पूजा अर्चा करिती पाही । नैवेद्दय वहाती नारळ । अवघा करिती गोंधळ । मेढरे बोकड मारिती । सुकी रोटी तया म्हणती । बळेची आणिताती अंगा । नाचताती शिमगी सोंगा । सकळ देवांचा हा देव । विसरती तया अहंभाव । एकाजनार्दनी ऐसा देव । येथे कैचा आमुचा भाव ।।१५।।

**फजितीचे देव मागती घुटीरोटो** । आपणासाठी जग पीडिती काळ तोंडी मोठी । नको तया देवा आठव मजसी । विठ्ठल मानसी आम्ही घ्याऊ । अविचारी देव अविचारी भक्त । देवाकरणे मारिती पशुघात । एकाजनार्दनी जळो ऐसा देव तो भांड । विठ्ठल विठ्ठल न म्हणे त्याचे काळे तोंड ।।१६।।

**आलो ऐकोनी खंडोबाची थोरी** । बाधा होऊनी मज मागा ह्मणती वारी । ठकलो ठकलो वाउगा सिण । वारी मागता पोट न भरे जाण । सदा वागवी कोठंबा आणि झेंडा । रांडा पोरे त्यजिली जालो काळतोंडा । गेले दोनी ठाव आता कोठे उरला वाव । एकाजनार्दनी भेटवा मज पंढरीरावो ।।१७।।

**पूजिती खंडेराव पतर भारिती** । विठ्ठल विठ्ठल न ह्मणती अभागी ते । लाउनी भंडार दिवटी घेती हाती । विठ्ठल म्हणता लाजती पापमती । ऐसियासी भाव सांगावा तो कणव । एकाजनार्दनी कायावाचा शरण ।।१८।।

**सांडोनिया विठाबाई** । कारे पूजिता मेसाई । विठाबाई माझी माता । चरणी लागो इचे आता । अरे जोगाई तुकाई । इजपुढे बापुड्या काई । एकाजनार्दनी माझी आई । तिही लोकी तिची साई ।।१९।।

**प्रेमे पूजी मेसाबाई** । सांडोनिया विठाबाई । काय देईल ती वोंगळ । सदा खाय अमंगळ । आपुलीये इच्छेसाठी । मारी जीव लक्ष कोटी । तैसी नोहे विठाबाई । सर्व दीनांची ती आई । न सांडीचि विठाबाई । एकाजनार्दन पायी ।।२०।।

**म्हणती देव मोठे मोठे** । पूजितात दगड गोटे । कष्ट नेणती भोगिती । वहा दवडाते म्हणती । जीत जीवा करूनि वध । दगडा दाविती नैवेद्दय । रांडापोरे मेळ जाला । एक म्हणती देव आला । नाक घासुनी गव्हार । देवा म्हणती गुन्हेगार । एकाजनार्दनी ह्मणे । जन भुलले मूर्खपणे ।।२१।।

**पाषाणाची करुनि मूर्ति** । स्थापना करती व्दिजमुखे । तया ह्मणताती देव । विसरुनी देवाधिदेव । मारिती पशूंच्या दावणी । सुरापानी आल्हाद जया । आमुचा देव ह्मणती भोळा । पहा सकळा पावतसे । ऐशा देवा देव ह्मणेना कोण्ही।एका विनवी जनार्दनी ।।२२।।

**प्रतिमेचा देव केला** । काय जाणे ती अबला । नवस करिती देवासी । ह्मणती पुत्र देई वो मजसी । न कळेचि मूढा वर्म । कैसे जाहलसे कर्म । प्रतिमा केलीसे आपण । तेथे कैचे देवपण । देव खोटा नवस खोटा । एकाजनार्दनी रडती पोटा ।।२३।।

**देव दगडाचा भक्त तो मेणाचा** । ऐका दोहीचा विचार कैसा । खरेपणा नाही देवाचे ते ठायी । भक्त अभाविक पाही दोन्ही एक । एकाजनार्दनी ऐसे देवभक्तपण । निलाजरे जाण उभयता ।।२४।।

**करुनी नवस मागती ते पुत्र** । परी तो अपवित्र होय पुढे । नासोनिया धर्म करी वेडेचार । भोगिती अघोर पापमति । सदा सर्वकाळ निंदावे सज्जन । कायावाचा मन परद्रव्यी । परनार देखता सुख वाटे मनी । भोगी वित्त हानी पाप जोडे । ऐशिया पामरा दंड तो कोण । तयाचे वदन कृष्णवर्ण । एकाजनार्दनी नवसाचे फळ । कुळी झाला बाळ बुडवणा ।।२५।।

**जयाचेनी तुटे भवबंधन** । तयासी जाण विसरती । करती आणिकाची सेवा । ऐसे ते अभागी निदैव । मुळीच नाही देवपण । तेथे करती जप ध्यान । विसरुनी खऱ्या देवासी । भुलले आपल्या मानसी । सत्य सत्य बुडती जनी । एका शरण जनार्दनी ।।२६।।

**वोसघर वस्तीस काह्या** । तैसे या देवा कोण पुसे । सांडोनिया पंढरीराणा । वोस राणा कोण धावे । घेती मांसाचे अवदान । देवपण कैचे तेथे । ऐसिया देवासी पुजणे । एका जनार्दनी खोटे जिणे ।।२७।।

**येउनी नरदेहा भूताते पूजिती** । परमात्मा नेणती महामूर्ख । दगडाच्या देवा सेंदुराचा भार । दाविती बडियार पूजनाचा । रांडापोरे घेती नवसाचे बगाड । नुगवे लिगाड तयाचेनी । आपण बुडती देवा बुडविती । अंतकाळी होती दैन्यवाणे । एकाजनार्दनी ऐसिया देवा । जो-पूजी गाढवा सम होय ।।२८।।

**प्रतिमा देव ऐसा ज्याचा भाव** । न करी निर्वाहो अंगोअंगी । असता सर्वत्र बाहेरी अंतरी । संपुष्टाभीतरी ह्मणे देव । तेचि हे व्दारका तेचि हे पंढरी । सर्वत्र न धरी तोची भाव । तीर्थयात्रा करी देव असे क्षेत्री पाप । नवल संताप कल्पनेचा । एकाजनार्दनी । स्वतः सिद्ध असे । नाथिलेसे पिसे मत वाद ।।२९।।

**मी तेचि माझी प्रतिमा** । तेथे नाही आन धर्मा । तेथे असे माझा वास । नको भेद आणि सायास । कलियुगी प्रतिमेपरते । आसना साधन नाही निरुते । एकाजनार्दनी शरण दोन्ही रूपे देव आपण ।।३०।।

**लावूनिया अंगा राख** । ह्मणती सुख आह्मापाशी । भोळे भाविका भोंदिती । भलते मंत्र तया देती । महणती आम्हा करा गुरु । उपचारु पूजेचा । एकाजनार्दनी ते मैद । नाही गोविंद तयापाशी ।।३१।।

**अंगा लाऊनिया राख** । करी भलतेच पाप । मेळवी शिष्यांचा मेळा । अवघा भांगेचा घोटाळा । नानापरी सांगे मंत्र । नेणे विधि अपवित्र । न कळे ज्ञानाची हातवटी । सदा परहार रहाटी । एकाजनार्दनी सोंग । तेथे नाही पांडुरंग ।।३२।।

**आम्ही जाहलो गोसावी** । आमुची विभूत चालवावी । भांग भुरका हे साधन । शिष्य मिळाले चहुकोण । हे तो सोंगाचे साधन । राजी नाही जनार्दन । एकाजनार्दनी भाव । भाव तेथे वसे देव ।।३३।।

**आम्ही योग साधियेला । भोग भुरका तो आणिला । योग न कळे तया मूढा** । साधन काय ते दगडा । आत काळा बाहेर काळा । नाम नाही अमंगळा । एकाजनार्दनी ते पामर । साधन साधिति ते खर ।।३४।।

**अंगासी राख ढुंगासी लंगोटी** । गोसावी हातवटी मिरविती । अलख ह्मणोनि भिक्षा मागताती । अलखाची गती न कळे मूढा । भांगेचा सुकाळ चेले करी मूढ । तया यम द्दढ दंड करी । अलक्ष अलक्ष आलख कळेना । जगी विटंबना उगीच करती । एकाजनार्दनी नका ऐसे सोंग । तेणे पांडुरंग अंतरेल ।।३५।।

**संसाराचा धाक घेऊनिया पोटी** । जाहला हटतटी गोसावी तो । पहिल्या परीस यातायाती मागे । शिणला उद्दयोगे भीक मागू । उठोनिया पाहाटे अलख मागावे । परतोनी यावे झोपडीसी । नाही तेथे कोण्ही दिसे केविलवाणा । मग म्हणे नारायणा व्यर्थ जिणे । जरी असतो घरबारी स्त्री करू धावे । तो आयुष्याचे हवे ग्रासियेला । राहिली वासना संसार करणे । एकाजनार्दनी ह्मणे जन्म घेती ।।३६।।

**नवल दंभाचे कौतुक । अग्नहोत्री म्हणती याज्ञिक** । मंत्र तंत्राची कथा कोण । मुख्य गाइत्री विकिती ब्राह्मण । आम्ही स्वधर्मनिष्ठ पावन । दंभे म्हणती आपणा जाण । दांभिकाची भक्ति वाव । एकाजनार्दनी ठाव ।।३७।।

**स्नानसंध्या शोचाचार** । स्वधर्मे नावडे साचार । कुमक फळ नाम गोमटे । बाहेर आत दिसे काटे । शरीर श्र्वेत निर्नासिक । तोंडाळ ओढाळ पति निंदक । ऐशी आचारहीन बापुडी । एकाजनार्दनी न घरी गोडी ।।३८।।

**वेदाचिया बोला कर्माते गोविला** । परी नाही भजला संतालागी । घोकूनिया वेद व्दैत नव जाय । वाउगाचि होय श्रम तया । तया अव्दैताच्या वाटा जाय तो करंटा । शीण तो अव्हाटा आदि अंत । एकाजनार्दनी संतासी शरण । गेलीया पठन सर्व जोडे ।।३९।।

**विद्दया जालिया संपूर्ण** । पंडित पंडिता हेळसन । धन जालिया परिपूर्ण । धनाढ्यासी हेळसन । कळता आत्मज्ञान स्थिति । भलत्या सवे वाद घेती । वृश्र्चिका अंगी विष थोडे । तैसा वादालागी चढे । भुलोनि पामर । एका जनार्दनी बुडवी घर ।।४०।।

**पतनाच्या भया नोळखे पामर** । करी वेरझार नानापरी । नायके कीर्तन न पाहे पंढरी । वैष्णवांचे व्दारी न जाये मूढ । नानापरीचे अर्थ दाखवी वोंगळ । सदा अमंगळ वोले जना । हिंडे दारोदारी म्हणे पुराणीक । पोटासाठी देख सोंग करी । वाचाळ आगळा बोलो नेदी लोका । एकाजनार्दनी देखा फजित होय ।।४१।।

**भांडाचे तोंड भांड पुराण** । वरी शिमग्याचा सण । काय उणे मग भांडा । बोलती वाउगे ते तोंडा । वेदशास्त्र नीति नाही । सैरावैरा बोलणे पाही । एकाजनार्दनी पाषांड । हाणोनि फोडा त्याचे तोंड ।।४२।।

**शहाणा हो शहाणा म्हणविसी** । हरिभक्ति करि वरवर करिसी । उगीच कासया करसील फड । जग हे बोधावया बापुडे । अंतर भक्ति न करिसी मूढा । कासया लौकिकी मिरविसी बापुडा । एकाजनार्दनी धरुनी कान । संतापायी नाचे सांडूनी अभिमान ।।४३।।

**तीर्थे जाती उदंडे** । त्याचे पाठीमागे तोंड । मन वासना ठेउनी घरी । तीर्था गेली भांडखोरी । गंगेत मारिता बुडी । मन लागले बिऱ्हाडी । नमस्कार करता देवासी । मन पायपोसपासी । लवकर करी प्रदक्षिणा । उशीर झालासे भोजना । एकाजनार्दनी स्थिर मन । नाही तंव काय साधन ।।४४।।

**आशा टाकुनी फकीर जाला** । परी भिक्षा मागणे जन्म गेला । तैशी नोहे परमार्थ रहाटी । शुद्ध मन करीजे पोटी । सर्वाभूती नांदे एकदेव । वाउगा का वाढावा अहंभाव । जे जे वाणी स्तुती केली । ती ती देवासी पावली । ऐसा धरी द्दढभाव । एकाजनार्दनी मागे ठाव ।।४५।।

**ब्रह्मचारी म्हणती महंत** । सदा विषयावरी चित्त । नेसोनिया कौपीन अंतरी तो विषय ध्यान । बोले जैसा रसाळ । भाव अंतरी अमंगळ । एकाजनार्दनी सोंग । तया न मिळे सतसंग ।।४६।।

**आम्ही मुक्त म्हणोनि विचरती मही** । मुक्त ही पदवी नाही अंगी । सैर धावे मन नाही पै अटक । मुक्तज्ञान मौक्तिक वाया जाय । भूतमात्री द्रोहो करिती नानापरि । वेदशास्त्र निर्धारी ठाउके नाही । एका जनार्दनी कायसे ते मुक्त । जगी जाणा फजीत निलाजिरे ।।४७।।

**वेद विधि काही न कळे पाठका** । गुणदोष देखा मळीन सदा । दशग्रंथी ज्ञान होताची जाण । निंदितो देखोन भलत्यासी । सत्व ब्रहमरूप ऐसे बोले वेद । तेथे वादावाद उरला नाही ।

ओहं सोहं कोहं नाही ठाव । उगेचि गौरव मिरव ज्ञान । एकाजनार्दनी ब्रह्मज्ञानासाठी । हिंडताती कोटी जन्म घेत ।।४८।।

**वेद बोलिला जो जो गुण** । तो तो नव्हेची पठन । वेदे सांगितले न करि । ब्रह्मव्देशी दुराचारी । न करा सुरापान । कन्या गो विक्रय जाण । ऐसी वेदाची मर्यादा । न कळेची मतिमंदा । निजमुखे स्वये बोले वेदु । न करावा परापवादु । एकाजनार्दनी शरण । वेदाचे नोहे आचरण ।।४९।।

**कलीमाजी संत जाले** । टिळा टोपी लाविती भले । नाही वर्माचे साधन । न कळे हृदयी आत्मज्ञान । सदा सर्वदा गुरुगुरी । व्देषं सर्वदा ते करी । भजनी नाही चाड । सदा विषयी कबाड । एसिया संताचा सांगत । नको मजसी आदिअंत । भोळीयाच्या पायी । एकाजनार्दनी ठाव देई ।।५०।।

**होती पोटासाठी संत** । नाही हेत विठ्ठली । तयांचा उपदेश नये कामा । कोण धर्मा वाढवी । घालुनी माळा मुद्रा गळा । दाविती जिव्हाळा वरीवरी । एकाजनार्दनी ते पामर । भोगिती अघोर यातना ।।५१।।

**बैसोनी एकांती** । सांगती कोरडया त्या गोष्टी । ह्मणती करारे भजन । आपण नेणे जैसा श्र्वान । म्हणे करा पंढरीची वारी । आपण हिंडे दोरोदार । ऐशियाचा उपदेश । एकाजनार्दनी ह्मणे नाश ।।५२।।

**वेदशास्त्र वक्ता अति नि:सीम पाही** । सिद्धांत बोलता उरी न ठेवी काही । लयलक्ष ध्यान मुद्रा दावी आपुले ठाई । वेडे वेडे चार करिता मोक्ष नये हाता । ती खूण वेगळी विरळा जाणे एक । जाणीव ग्रासोनि त्यासी बाणे देख । अष्टांग योग जाणे मंत्र तंत्र कळा । प्रबोध भक्तीने वश्य सिद्धी सकळा । वर्म चुकला भाग्यहीन अंधळा । मी कोण हेचि नेणे कळा त्या विकळा । सिद्धांत एक निका सावध एका । सुखासी मेळविते वर्म नातुडे फुका । भाव धरुनी संतापायी नाम वोळखा । तैसा एकाजनार्दनी भेटी देखा ।।५३।।

**शतावर्ती श्रवण अधिक पै जाले** । तेणे अंगा आले जाणणेपण । पुराण श्रवण तो लौकिक मनी नाही विवेक । बुद्धिसी परिपाक कैसेनी होय । मी एक ज्ञाता मिरवी लौकिक । म्हणोनी आक्षेपक सममाजी । नानापरि व्यक्ति मिरवी लोकाप्रति । वाढवितो महंती मानालागी । मी एक स्वयंपाकी मिरवी लौकिकी । इतर कर्मासी शुद्धि नाही । कर्माकर्मी काही न धरी कंटाळा । मानीतो विटाळा ब्राह्मणाच्या । मजहुनी ज्ञाता आणीक तो नाही । ऐसे जाणीवेचे डोही गर्वे गेला । नित्य पुढिलाचे गुण दोष आरोपिती । श्रवणाची निष्पत्ति

फळली ऐशी । लौकिक प्रतिष्ठा धनावरी आस्था । वरी वरी हरिकथा काय करसी । एकाजनार्दनी साच न रिघे मन । तववरी समाधान केवि होय ।।५४।।

**करिता हरिकथा श्रवण** । स्वेद रोमांच नये दारूण । रुका वेचिता प्राण । जाऊ पाहे । द्रव्यव्दारा लोभ अंतरी । हरिकथा वरीवरी । बीज अग्नी माझारी । विरुढे कैसे । टाळी लावूनिया जाण । द्दढ घालिती आसन । अंतरी तो ध्यान । वल्लभेचे ।धनलोभाचा वोणवा । तेणे जाळिळे जीवाभावा । हरिकथेचा करी हेवा । लोकारूढी । धनलोभा आसक्तता । हरिकथा करी वृथा । तयासी तो परमार्थ तत्वता । न घडे जाणा । एकलीच कांता । नाश करी परमार्था । तेथे धनलोभ येता । अनर्थचि होय । एकाजनार्दनी । काम क्रोध लोभ तिन्ही । द्रव्यव्दारा त्यजोनी । नित्य तो मुक्त ।।५५।।

**विसरोनी विठोबासी** । भरले हव्यासी साधन । काय त्यांचा फळे मंत्र । कोण पवित्र म्हणे तया । दाविती वरी वरी भक्ति । अंतरी युक्ति वेगळीच । एकाजनार्दनी जप । वाउगे तप करती ते ।।५६।।

**अष्टांग साधन मौनी जटाधारी** । एक चरणावरी करती तप । वायु ते आहार असती दिगंबर । परी न कळे विचार कोठे । कैशी तया भ्रांती असोनी देव जवळा । रिघती साधन कळा हुडकिती । एका जनार्दनी तया नाही सुख । संतावाचुनी देख मार्ग न लागे ।।५७।।

**आहारे पामरा नेणसी देवासी** । वाउगा शिणसी काय काजा । आहारे पामरा नेणसी देवासी । वाउगा शिणसी काय काजा । आहारे तामसा कोण तुझी गती । संताची प्रचीति नाही तुज । एका जनार्दनी ऐसा हीन भागी । भूभार जगी वाया जाहला ।।५८।।

**कामक्रोध लागले मागे** । तप करुनी काय सांगे। कायसा जाशी वनांतरी । कामक्रोध भरले अंतरी । वनी जाऊनिया चिंता । रात्रदिवस घोकिशी कांता । यो अभ्यास न कळे वर्म । शिणतो मूढ धावते कर्म । कर्मी लिहिली न चुके रेखा । म्हणे जनार्दनी एका ।।५९।।

**सर्पे दर्दुर धारियेला मुखी** । तोही मक्षिका शेखी धरी तसे । तैसे ते अभागी नेणतीच काळ । वाउगा सबळ करिती धंदा । नेणती नेणती रामनाम महिमा । व्यर्थ तप श्रमा शिणती वाया । एकाजनार्दनी तपाचे हे तप । तो हा सोपा जप श्रीरामनाम ।।६०।।

**यो साधोनी पंचाग्नि साधिती** । न कळे योगाची गती फजितीखोरा । वाउगे साधन वाउगे साधन । तेणे विटंबन होत असे । एका जनार्दनी योगाचा योग । भजे पांडुरंग एका भावे ।।६१।।

**होऊनी मानभाव** । अवघा बुडविला ठाव । नाही चित्त शुद्ध गती । व्देष देवाचा करती । धरती उफराटी काठी । रांडापोरे भोंदी वाटी । नेसोनिया कालेपण । अंगालाविती दूषण । एकाजनार्दनी देवा । जळो जळो त्यांची सेवा ।।६२।।

**सांगती ते ज्ञान तैसे** । श्र्वान सुकुरासारिसे । अंगी नसोनि वर्म । दाविताती गुण कर्म । व्दैताची दावणी वाढ । भुलविती रांडा नाड । अभागी ते पामर । नर्क भोगिती अघोर । सांगती पुराणकथा । उभेबाजारी सर्वथा । एकाजनार्दनी नाही भाव । तेथे कैचा उभा देव ।।६३।।

**सुंदर विभूति लावी अंगी** । मिरची जगी भूषण । घालूनिया गळा माळा । वागवी गबाळा वोंगळ । नेणे कधी योगयाग । दावी सोंग भाविका । एकाजनार्दनी भाव । नाही तेथे कदा देव ।।६४।।

**काय ते वैराग्य बोकडाचे परी** । भलतिया भरी पडतसे । काय ती समाधी कुक्कुटाचे परी । पुढेचि उकरी लाभ नेणे । बैसोनी आसनी वाउगे ते ध्यान । सदा लक्षी मान आपुलासी । घालुनिया जेठा बैसतो करंटा । करितसे चेष्टा मर्कटा परि । नाही शुद्ध कर्म योगाचा विचार । सदा परव्दार लक्षितसे । ऐशिया पामरा कायसा तो बोध । एकाजनार्दनी शुद्ध खडक जैसा ।।६५।।

**करुनी वेदशास्त्र पठण** । निर्धारिता निजज्ञान । करुनी वेदशास्त्र श्रवण । होय शिश्नोदर परायण । महा मोहो गिळिला ज्ञाना । शरण एकाजनार्दनी ।।६६।।

**सांगे ब्रह्मज्ञान गोष्टी** । माते पाहता होतो कष्टी । काय ज्ञान ते जाळावे । वदन तयाचे ते न पहावे । करी कथा सांगे पुराण । वाया मिरवी थोरपण । जन्मला जिचे कुशी । तिसी म्हणे अवदसा ऐसी । ऐसे नसो ते संतान । एका विनवी जनार्दन ।।६७।।

**आवडीने माता बोले बाळकासी** । तव तो म्हणे विसवी पाठी लागे । सांगे लोकांपाशी मुखे ब्रह्मज्ञान । झाला स्त्री आधीन स्वदेहे तो । बैसोनी सांगे ज्ञान गोष्टी । मातेसी करंटी ह्मणे नष्ट । एकाजनार्दनी ते जन अधम । चौऱ्यांशी लक्ष जन्म भोगिताती ।।६८।।

**सांगे बहु सोपया गोष्टी** । करू नेणे तो हातवटी । ऐसे याचे नका ज्ञान । ज्ञान नोहे ते पतन । सांगे लोकां उपदेश । आपण नेणे तो सायास । शरण एकाजनार्दनी । त्याची अमंगळ वाणी ।।६९।।

**सांडोनी आचार करती अनाचार** । ब्रह्माचा विचार न कळे ज्यासी । वाहाती भार वेदाचा आधार । शास्त्राचा संभार सांगताती । पुराण व्युत्पत्ती वाउगा त्या कथा । सांगती सर्वथा हितपर । एकाजनार्दनी कोरडी हि कहाणी ब्रह्मज्ञान ।।७०।।

**एवढा मन्त्र सोपा सांडोनी सायासी** । कां रे प्रपंचासी गुंतुनी पडसी । वाचे ब्रह्मज्ञान गोष्टी ते फोल । अंतरीचे बोल सर्व वाया । वृंदावनाचे परी वरवर रेखा । तैसे पढत मुर्खा वेद गोष्टी । एकाजनार्दनी प्रपंच टाकुनी । परमार्थ साधनी रिघे वहिला ।।७१।।

**रडती पोटासाठी** । झालो म्हणती संन्यासी । वर्म न कळेची मूढा । होतो फजित रोकडा । जनी नारायण । अवघा भरला जनार्दन । तडातोडी करुनी वर्म । चुकला तो अधम । सर्वा ठाई नारायण । एकाजनार्दनी भजन ।।७२।।

**त्यागूनिया स्त्री संन्यासी जे होती** । पतना ते जाती अंतकाळी । घेउनी संन्यास ध्यान पै स्त्रियांचे । गुंतलासे आशे वाया जाये । नारायण नामी नाही पै आचार । सर्व अनाचार स्त्रीते लक्षी । एकाजनार्दनी संन्यास लक्षण । गीतेमाजी कृष्ण बोलियेला ।।७३।।

**त्यागुनी कर्म जाहला संन्यासी** । ज्ञान ध्यान नाही मानसी । शिखा सूत्र त्यागून जाण । करी दंडासी ग्रहण । नित्य भिक्षा पुत्राघरी । मठ बांधोनी राही व्दारी । एकाजनार्दनी संन्यास ।वायाचि नाश कावेचा ।।७४।।

**घालूनी आसन पोटी भाव नाही** । वाया केली पाही विटंबना । देव सर्वाभूती तयासी न कळे । वाउगे गवाळे पसरिले । अंतरी तो हेत द्रव्य मिळेल काही । वरपांग दावी वेषधारी । एका जनार्दनी ऐशिया सोंगासी । काय देवा त्यासी दण्ड करा ।।७५।।

**डोई बोडोनी केली खोडी** । काया विटंबिली यापुडी । ऐसे नोहे निर्मळपण । शुद्ध करी का अंतःकरण । राख लाउनी वरच्यावरी । इंद्रिये पीडिली भरोवरी । संध्यास्नान व्दादश टिळे । फासे घालुनी कापी गळे । बगळा लाउनिया टाळी । ध्यान धरुनि मत्स्य गिळी । पाय घालुनी आडवा । काय जपतोसी गाढवा । कन्येसमान घरची दासी । तिशी व्याभिचार करिसी । लोकामध्ये मिरविसी थोरी । घरची स्त्री परव्दारी । श्र्वान आले बुद्धीपणा । चघळोनी सांडी तो वहाणा । एकाजनार्दनी निर्मळ भाव । तेथे व्देष कैचा ठाव ।।७६।।

**षडवैरीयांचा करावा आधी नाश** । मग संन्यास घ्यावा जगी । आशा मनीशा यांचा तोडोनिया पाश । मग सुखे संन्यास घ्यावा आधी । एकाजनार्दनी संकल्पाचा त्याग । सुखे संन्यास मग घ्यावा आधी ।।७७।।

**संन्यास करी गृहस्थाश्रम** । तेणे तया अधर्म वोडवला । कर पात्री भिक्षा हाचि त्याचा धर्म । न करिता अधर्म स्वये जोडे । नाश करावे षडवैरी नेमे । तया संन्यास कर्मे ह्मणिजेती । एकाजनार्दनी गृहस्थची थरा । फजिती बाजारा उभ्या होय ।।७८।।

**नुपजे अनुताप ज्ञान** । काय घेउनी विज्ञान । अनुतापाविण । व्यर्थ संन्यास लक्षण । संन्यास घेतलियापाठी । काम नुपजावा पोटी । ऐसे संन्यास लक्षण । एकाजनार्दनी खूण ।।७९।।

**वासनेचे वसन समूळ फाडी** । त्रिगुण जानवे रागावरी तोडी । यापरी जाणोनी संन्यासु घेई । गुरुवचने सुखे विचरतु जाई ।  मन दंडिजे तोचि घेई सुदंडु । जीवनेविण कमंडलु अखंडु । एकाक्षर जप करी । क्षराक्षरातीत धारणा धरी । स्वानंदाचे करी करपात्र । सहजी सहज सेवी नारायण वक्त्र । एकाजनार्दनी सहज संन्यासु । सहजी सहज तेथे न लगे अयासु ।।८०।।

**वासना विषयी सदा वसे** । तेथे देवा कोण पुसे । सदा तळमळी मन । करी ध्यान विषयाचे । रात्रंदिवस करी चिंता । नाठवी सर्वथा रामनाम । एकाजनार्दनी नाही भाव । तव कैचा भेटे देव ।।८१।।

**वरीवरी दाविती आचार** । अंतरी तो अनाचार । मुखी नाही कधी नाम । सदा काम विषयाचा । नेणे कधी संतसेवा । न करी देवा पूजन । शरण एकाजनार्दनी । ऐसा जन्मला तो जनी ।।८२।।

**नाही ध्यान ते अंतरी** । सदा विषयी दुराचारी । स्वप्नी नेणे नामस्मरण । करी विषय सेवन । अतीत अभ्यागत । जया नावडे चित्तात । एका शरण जनार्दनी । ऐसा पामर तो जनी ।।८३।।

**विषय प्राप्ती लागी जाण** । धरी बकापरी ध्यान । विषयीक गायन करी । जैसा खर भुंके खरी । नाही संतचरणी मन । सदा विषयावरी ध्यान । विषय लोटी परता होई । एका जनार्दन पायी ।।८४।।

**तोंडभरी विवेक मनी वाहे अभिलाख** । विवेक केला रंक विषयाचा । वैराग्यविण ज्ञान बोलती ते उणे । घरोघरी पोसणे लाविताती । जुनाट परिपाठी सांगताहे गोष्टी । विरक्तीविण । पोटी ज्ञान नेघे । परिसोनी ग्रंथ निरोपी ज्ञानकथा । मनीवाहे आस्था विषयांची । आरंभीच डाव पडियेला खोटा । पचले नाही पोटा रामनाम । धडधडीत वैराग्य वरी वाहे विवेक ।

ज्ञानासी तो एक अधिकारी । वैराग्य विवेक बाणलेसे अंगी । ज्ञान तयालागी वोरलसे । एकाजनार्दनी विवेकेशी भेटी । वैराग्याविण गोष्टी फोल होय ।।८५।।

**बांधुनिया पर्णकुटी मढी** । त्यावरी गुढी अव्दैताची । ऐसे मिरविती सोंग वाया । नरका जावया उल्हासे । नेणे कधी संतांचे पूजन । सदा सर्वदा परधनी मन । शरण एकाजनार्दनी । ऐसे सोंग मिरविती जनी ।।८६।।

**पोट भरावया भांड** । जैसा बडबडी तोंड । तेवि विषयालागी जाण । शास्त्र व्यत्पत्ती श्रवण । विषयवासना धरुनी थोर । दावी वरवर आचार । जेवि काग विष्ठा देखे । तेवि विषय देखोनी पोखे । ह्मणे जनार्दनाचा एका । सुटिका नोहे तया देखा ।।८७।।

**आडक्याकारणे जीव जात** । ह्मणती आह्मी उदार भक्त । एसिया दांभिकांसी । दुरी होय हरी त्यांसी । गाजराची तुळासाची । वाट पाहती विमानाची । एकाजनार्दनी खोटा भाव । तयासी न भेटे देव ।।८८।।

**द्रव्याचे आशे कथा करणे सायासे** । उभयता नरका जोडी । मेळविली ती बापुडी । निरास करुनी मन । करा कथा ते कीर्तन । देवा आवड भक्तीची । एकाजनार्दनी साची ।।८९।।

**द्रव्य घेऊनिया कथा जे करिती** । उभयता जाता नरकामध्ये । तयाचिया दोषा नाही परिहार । वेदाचा विचार कुंठिताचि । शास्त्रांची तो मती न चाले सर्वथा । पुराणे ही तत्वता मौनावली । एका जनार्दनी मौनानाही पार । रवरव निर्धारे भोगिताती ।।९०।।

**द्रव्याचिया आशे** करी जे कथा । चांडाळ तत्वता जाणावा तो । द्रव्याचिये आशे वेद जे पढती । रवरव भोगिती कल्पवरी । द्रव्याचिये आशे पुराण सांगती । सकुळ जे जाती नरकामध्ये । द्रव्याचिये आशे  कथेचा विकरा । प्रत्यक्ष तो खरा मातंगचि । एकाजनार्दनी नैराश्य भजन । तो  प्राणी उत्तम कलियुगी ।।९१।।

**द्रव्य घेउनिया उपदेश देती** । मार्जार ते होती जन्माजन्मी । देऊनिया दान परतोनि घेती । सुकर ते होती जन्मोजन्मी । द्रव्य घेउनिया रंगी जे नाचती । वैष्णव ते न होती जन्मोजन्मी । एकाजनार्दनी निर्धनी भजन । तेणे नारायण संतुष्टचि ।।९२।।

**द्रव्याचिया लाभे** । तीर्थामध्ये रहाती उभे । सांगती संकल्प ब्राह्मण । तेणे निर्फल तीर्थ जाण । संकल्पाने नाड । उभयता ते व्दाड । संकल्पाविरहित धन । एकाजनार्दनी पावन ।।९३।।

**करिताती कथा** । द्रव्य मागती सर्वथा । नाही पुण्य दोघा गाठी । हीन भाग्य ती करंटी । नैराश्य कथा भजन । तेणे तुष्टे नारायण । एकाजनार्दनी वाणी । व्यास बोलले पुराणी ।।९४।।

**बाजरी बैसोनि सांगे ज्ञान गोष्टी** । कथेची राहाटी वापोवापी । मेळवोनी जन सांगे निरुपण । वाचे ब्रह्मज्ञान पोटासाठी । न कळे पामरा आपुला विचार । करी अनाचार जगामध्ये । एकाजनार्दनी ऐसे फजीतखोर । भोगिती अघोर नरक देखा ।।९५।।

**दांभिकाची भक्ति** । वरी वरी देहस्थिती । अंतरी तो गती । वेगळी बापा । नाम गाय प्रेमभरित । रडे स्फुंदे डोळे पुसीत । अंतरीचा हेत । वेगळा वापा । वृंदावनाचे ते फळ । कडु जैसे सर्वकाळ । तैसा मनोमेळ । वेगळा बापा । धरुनी ध्यान ।बक जैसा लक्षी मीन । परस्त्री देखोन । विव्हळ बापा । सांगे आत्मज्ञान स्थिती । अंतरी तो वेगळी रिती । द्रव्य जोडे कैशा रिती । हेचि ध्यान बापा । न कळे काही स्वहित । सदा द्रव्यदारावर चित्त । तयासी भगवंत । प्राप्त नाही । शरण एकाजनार्दन । नको मज तयाचे दर्शन । अभाविकासी भाषण नको देवा ।।९६।।

**प्रत्यक्ष ती कथा जगाची माउली** । विक्रेये करिती वाहिली दोषी देखा । आपुली ती माता आपण भोगिता । प्रायश्र्चित्त तिला कोण द्द्यावे । माते बाळकासी विषपान दिले । प्रायश्र्चित्त या बोले कोण द्द्यावे । एका जनार्दनी कथा ती माउली । विकिता घडली ब्रह्महत्या ।।९७।।

**कोटी ब्रह्महत्या घडे** । कथा विक्रय तया जोडे । हा तो पुराणी निवाडा । पाहे की रे दगडा । एकाजनार्दनी जाण । पंचमहापातकी तो पुर्ण ।।९८।।

**दीनाचे उपार्जन करी पोटासाठी** । ह्मणे मज लंगोटी द्द्याहो कोण्ही । घेउनी संन्यास हिंडे दारोदारी । नारायण करी पोटासाठी । कामक्रोध वैरी सदोदित पिंडी । वरी शेंडी बोडी करुनी काई । व्यर्थ विटंबना करिती जनात । संन्यासाची मात सोंग दावी । एकाजनार्दनी संन्यास साचा । रामनाम वाचा उच्चार करी ।।९९।।

**वाया शब्दज्ञान बोलाचा गौरव** । पोटीचा पै भाव मिथ्या सोंग । मैदाचिये परि बैसती ध्यानस्थ । सदा चित्त ओढत परधनी । वैराग्य ते फोल सांगताती गोष्टी । काय ते चावटी मिथ्या बोल । एकाजनार्दनी ऐशिया सोंगासी । कै हृषिकेशी प्राप्त होय ।।१००।।

**कंनक फळ भक्षिता सहज भ्रांती येती** । तैशी ही फजिती संसारिका । मर्कटाचीये परी नाचे घरोघरी । नाच वोनी भरी पोट तैसे । करिती तितुके अवघे ते सोंग । नाही काही रंग भावभक्ति । एकाजनार्दनी पडिलासे भ्रांती । नेणे कधी स्तुती देवाची तो ।।१०१।।

**मुखी वसे ब्रह्मज्ञान** । चित्ती चिंती धनमान । ऐसे ठक जे पतित । तया साधेना स्वहित । स्त्रीसंगी सदा सक्त । वदनी गोष्टी परमार्थ । एकाजनार्दनी तया । देव भेटेल कासया । ।।१०२।।

**गाठी बांधोनिया धन मिरविती भक्ति** । मनी ते आसक्ति अधिक व्हावी । चित्त वित्तावरी भक्ति लोकाचारी । देव अभ्यंतरी केवी भेटे । असे चित्त वित्ता लावी काळांतरी । अनुष्ठान करी दिवसगणी । जप तप विधान अवघेची सांडी । धरणेचि मांडी सावकाश । धन सांडोनी मन घरी जनार्दन । एकाऐकी भक्ति फळेल तेणे जाण ।।१०३।।

**आहाच दाहाच झकविले लोका** । एसिया ठका देव कैचा । शिकवूनी जन वंचला आपण । नरकी पतन होत असे । मी ज्ञाता म्हणोनी फुगून बैसला । ब्रह्मविद्दयेचा पसारा घातिला । अभ्यासी ते मिरवी लोकी । पडलिया चुकी निजपंथे । ज्यासी दंभ तो काय नेणे । लोकी मानविणे हेचि पाहे । घरोघरी गुरु आहेत आईते । गूळ घेउनिया विकिती रायते । संसारापासोनी सोडवी साचे । सद्गुरू ऐसे नांव त्याचे । बोलाचेनि ज्ञाने पावोनी देवा । भुलविले मावा अभिमाने । एकाजनार्दनी नव्हे त्या भेटी । वोसणता भेटी साच होय ।।१०४।।

**असत्य जन्मले असत्याचे पोटी** । अर्थबळे चावटी शिकविती । अर्थ धरुनी आस असत्य बोलणे । अर्थासाठी घेणे मंत्र यंत्र । अर्थासाठी प्राण त्यजिती जनी । अर्थे होत हानी प्राणीमात्रा । एकाजनार्दनी अर्थाचा संबंध । तेथे भेदाभेद सहज उठे ।।।१०५।।

**अर्थ नाही जया पाशी** । असत्य स्पर्शेना तयासी । अर्थापाशी असत्य जाण । अर्थापाशी दंभ पुर्ण । अर्थापोटी नाही परमार्थ । अर्थापोटी स्वार्थ घडतसे । अर्थ नका माझे मनी । ह्मणे एकाजनार्दनी ।।१०६।।

**आहारालागी करी देवाचे भजन** । मिळे मिष्टान्न भोजनासी । आहारालागी करी तीर्थाचे भ्रमण । आहारे जिंकले मन सर्वपरि । आहारालागी करी तीर्थ प्रदक्षणा । आहारे व्यापिले जना एकमय । आहार निर्धार नाही जनार्दनी । एकाजनार्दनी निराहार ।।१०७।।

**आहारालागी देवपूजा** । आहारे खादली पंचभूते । आहारालागी कर्म धर्म । भुलला वर्म आहाराची । आहारालागी मंत्र तंत्र । आहारालागी करी अपवित्र । आहारालागी जाला भांड । एकाजनार्दनी काळे तोंड ।।१०८।।

**आहारालागी कथा** । करिताती पै सर्वथा । आहार न मिळता जाण । कथेलागी पुसे कोण । आहार मिळता पोटभरी । पुराण सांगे बराव्या परी । आहार मिळता संध्यास्नान । आहारार्थ जप ध्यान । आहारालागी उपासना नीच सेवना आहारेची । आहाराकारणे सर्व हेत । एका जनार्दनी गात आहारेची । आहाराकारणे सर्व हेत । एका जनार्दनी गात आहारेची ।।१०९।।

**मी एका सूची जग हे अपवित्र** । कर्मचि विचित्र वोढवले । देखत देखत घेतसे विख । अंती ते सुख केवि होय । अल्प दोष ते अवघेचि टाळी । मुखे म्हणे सर्वोत्तम बळी । अभिलाषे अशुचि झालासे पोटी । एकाजनार्दनी नव्हेची भेटी ।।११०।।

**डोई बोडोनी केली खोडी** । काया विटंबिली बापुडी । तैसे नव्हे निर्मळ मन । शुद्ध करी अंतःकरण । व्दादश लाउनिया टिळे । फासा घालुनी कापी गळे । बक लावूनिया टाळी । ध्यान धरुनि मत्स्य गिळी । एकाजनार्दनी भाव । तेथे व्दैतासी कैचा ठाव ।।१११।।

**शिष्यापासून सेवा घेणे** । हे तो लक्षण अधमाचे । ऐसे असती गुरु बहु । नव्हेचि साहू भार त्यांचा । एकपणे समानता । गुरुशिष्य उरता उपदेश । एकाजनार्दनी शरण । गुरु माझा जनार्दन ।।११२।।

**सांगती लोका गुरु करा** । आपुली आपण शुद्धि धरा । त्यांचे बोलणे वितंड । शिष्य मिळती तेही भांड । उपदेशाची न कळे रीत । द्रव्यांसाठी हात पसरीत । ऐशा गुरूंच्या ठाई भाव । एकाजनार्दनी वाव ।।११३।।

**जळतिया घरा** । कोण वस्ती करी थारा । तैसे अभागी पामर । गुरुपण मिरविती वरवर । नाही मंत्र शुद्धीचे ज्ञान । भलतियाचे फुंकिती कान । मनुष्य असोनि गुरु पाही । एकाजनार्दनी ते नाही ।।११४।।

**बैसोनिया हाटवटी** । सांगे गोष्टी लौकिक । तैसे नव्हे भक्तपण घातला दुकान पसारा । वर्माचे ते पाठांतर । केला भार बहुतची । एकाजनार्दनी सार । भुंके फार खर जैसा ।।११५।।

**केले फाय तुवा जाऊनिया तीर्था** । सर्वदा विषयार्थी भुललासी । मनीची ती पापे नाही धोवियली । वृत्ति हे लाविली संसारीच । तीर्थस्थाने अंग तरी शुद्ध केले । नाही धोवियेले अंतरासी । वरी दिससी शुद्ध अंतरी मलीन । तोवरी हे स्नान व्यर्थ होय । तीर्थयात्रा योगे

किर्तीही पावली । बुद्धि शुद्धि झाली नाही तेणे । शान्ति क्षमा दया नाही पै अंतरी । वाया येरझारी कष्ट केले । एकाजनार्दनी सद्‌गुरू पाय धरी । शांतीचे जिव्हारी पावशील ।।११६।।

**अभाविकाचे कर्म** । तया न कळे काही वर्म । संता म्हणती भ्रम । यासी झाला । हरुषे मुखे नाम गाय । तया म्हणती वेडा होय । अभाविकाचे भय । जन मनी वाहे । बोले जैसा का भाट । वर्म काही न कळे नीट । नामस्मरण स्पष्ट । न घडे तया । ऐशियाची संगती । न घडावी निश्र्चिती । एकाजनार्दनी अप्रीति । तयाची देवा ।।११७।।

**वरुषला मेघ खडकावरुता** । चिखल ना तत्वता थेंब नाही । वाया तो प्राणी आला नरदेहा । गेला वाया पहा भक्तविण । अरण्यात जैसी सुकरे बैसती । तैसे मठाप्रति करुनी बैसे । उदय होताचि लपते उलूक । तैसा तो मूर्ख समाधि बैसे । एकाजनार्दनी वाया गेले सर्व । संसार ना देव दोन्ही शून्य ।।११८।।

**स्वप्नामाजी नेणे देवा** । करी सेवा भूतांची । नाना साधन चेष्टा । तेणे कष्टा भरी भरला । जे जे करी ते उपाधी । मंत्र जपे तो अविधी । सकळ मंत्रा मंत्रराज । एका जनार्दनी नेणे निज ।।११९।।

**शिकलासे टाणाटोणा** । तेणे ब्रह्मज्ञाना तुच्छ मानी । बोले बहु चावट वचन । वेदा म्हणे तो अप्रमाण । सिद्धांत धादांतासी म्हणे । हे तो पाषांडी बोलणे । ऐसा पामर दुराचारी । वाचे न वदे कधी हरी । एकाजनार्दनी मन । ज्यांचे पाषाणचि जाण ।।१२०।।

**भजन ते साचे भोळ्याभाविकासी** । पै अभाविकासी नरकवास । भोळीयाचा देव अंकित भोळा । अभाविक चांडाळा जवळी नसे । एकाजनार्दनी भावाचे कारण । अभाविका जाण दु:ख पीडा ।।१२१।।

**गजाचे ते वोझे गाढवासी न साजे** । भाविकाचे भजन अभाविका न विराजे । पतिव्रतेची रहाटी सिदळीसी न साजे । श्रोतियाचे कर्म हिंसका लाजे । एकाजनार्दनी कवित्व सर्वांसी साजे । वाचे श्रीगुरु ह्मणता कदा न लाजे ।।१२२।।

**जया अनुताप वैराग्य** । तया म्हणती पहा अभागी । वरी वरी दांभिक आचार । तया ह्मणती पवित्र नर । जया बोले मनुष्य मरे । तया म्हणती सिद्धत्व खरे । एकाजनार्दनी बोध । अभाविकांसी हाचि खेद ।।१२३।।

**अविश्र्वासी वोडेकोडे** । जेथे जाय तेथे साकडे । अंगोअंगी कष्ट सदा । ऐसी तयासी अपदा । जिकडे जाय तिकडे कष्ट । नोहे परमार्थी वरिष्ठ । एका शरण जनार्दनी । अविश्र्वास त्यागी क्षणी ।।१२४।।

**गाइत्रीमंत्राचा मानुनी कंटाळा** । जाय तो वेताळा पूजावया । देवाचे पूजन करिता वाटे दु:ख । आवडतो देख भांग घोटी । ब्राह्मणासी पाणी देता मानी शीण । वेश्येचे धुवण वस्त्रे धुई । कीर्तनी बैसता ह्मणे निद्रा येत । खेळतसे द्द्युत अहोरात्री । पुराण श्रवणी मानीत कंटाळा । नटनाट्य खेळा पाही जाय । एकाजनार्दनी ऐसा तो गव्हार । चंद्रअर्कवर नरक भोगी ।।१२५।।

**हरिकथा परसोनी जरी देखसी दोष** । पयपान भुजंगा तेचि परतले विष । हरीनाम ऐकता जरी न वाटे सुख । अंतरी तू देख पाप आहे। कस्तुरीचे आळा पेरिला पलाडु । सुवास लोपोनी कैसा वाढे दुर्गधु । धारोष्ण पेयपरि ज्वरिताचे मुख । थुंकोनी सांडी ह्मणे कडू । एकाजनार्दनी भाव नुपजे नरा । नरदेही आयुष्य तेही केला मातेरा ।।१२६।।

**सचेतनी व्देष अचेतानी पूजा** । भक्ति गरुडध्वजी केवी पावे । व्यर्थ खटाटोप नाथिला पसारा । गोविंद गव्हरा केवी कळे । हरिदासाचेनि गुणे शिळा दैवतपणे । त्या शिळा पूजोनी त्याते व्देषी । एकाजनार्दनी नाथिलाची दावी । सजीव निर्जीवी गोवियेले ।।१२७।।

**मत्सर ज्ञानीयाते न सोडी** । मा इतर कायसी बापुडी । शिणताती मत्स्ररवेधे । भोगिताती भोगविविधे । निर्मत्सर भजनी गोष्टी । ऐसा कोण्ही नाही सृष्टी । एकाजनार्दनी मत्सर । तेणे परमार्थ पळे दुर ।।१२८।।

**जाहला बहुदिन** । मग म्हणे नारायण । तया हीन पामरासी । ब्रह्महत्या घडल्या राशी । जे न करावे ते केले । मग राम म्हणोनी डोले । काय त्याचे ते गाणे । जैसे मोलाचे रडणे । शुद्ध भावावाचुनी निका । एकाजनार्दनी नाही सुटका ।।१२९।।

**अभाविक यासी न रुचे भजन** । सदा पिशाचपण देह त्याचा । असोनी संसार प्रेतवत देहे । काळ मुखा वाहे भार सदा । जगी अपकीर्ति फजितीचे जिणे । सदा ते लपणे श्र्वानापरी । एकाजनार्दनी ऐसे ते पामर । भोगिती अघोर कल्पकोटी ।।१३०।।

**गर्दभाचे अंगी चंदनाची उटी** । व्यर्थ शीण पोटी लावूनिया । श्र्वान तो भोजनी -बैसविला- अढळ । परी वोकावरी ढाळ जाऊ नेदी । सुकरालेपन कस्तुरीचे केले । परी तो लोळे चिखली सदा । एकाजनार्दनी अभाविकाचे गुण । व्यर्थ शीण जाण प्राणीयासी ।।१३१।।

**केलिया कर्माचा येत असे वाटा** । अभागी करंटा मतिमंद । जेथे राहे उभा दिसे दैन्यवाणा । चुकला भजना गोविंदाच्या । एकाजनार्दनी नामाच्या उच्चारा । न करिता अघोरा जाती प्राणी ।।१३२।।

**कामधेनु देऊनी पालटा** । अजा घे जैसा करंटा । तैसा ठकला कीर्तनी । निशिदिनी गाय गाणी । दवडोनिया हिरकणी । वेची आनंदे गारमणी । ऐसा अभागी पामर । एकाजनार्दनी ह्मणे खर ।।१३३।।

**एक नरदेह नेणोनि वाया गेले** । एक न ठके ह्मणोनि उपेक्षिले । एक ते करू करू ह्मणताचि गेले । करणे राहिलेसे तैसे । यापरि अभिमान जगी । ठकवितसे अंगसंगी । नडी लागवेगी जाणत्यासी । जे जे करी साधन । तेथे होय अभिमान । नागवी धावणे तेथे सावाधावा करी कोण । ज्ञाने व्हावी ब्रह्मप्राप्ती । ते ज्ञान वेचि विषयासक्ती । भांडवल नाही हाती । मा मुक्ति कैची । स्वप्नीचे । जागृती नोहे धर्म । ब्रह्मास्मि हेहि समाधान । सोलीव भ्रम । अभिमानाचिया स्थिती । ब्रह्मादिका पुनरावृत्ती । ऐसी वेदश्रुती । निश्र्चयो बोले । एकाजनार्दनी एकपण अनादी । अहंआत्मा तेथे समूळ उपाधी ।।१३४।।

**विषयाचे अभिलाषे सबळ भेदु भासे** । विषय लेशु तेथे मुक्ति केवि वसे । विषय तृष्णा सांडी मग तू साधन मांडी । वैराग्याची गोडी गुरूसी पुसे । स्त्रीपुरुष भावना भेदु भासे मना । तेथे ब्रह्मज्ञाना गमन कैचे । कणुभरित जो डोळा शरीरासी दे दु:ख । अणुमात्र विषय तो संसारदायक । शुद्धभाव ते वैराग्य आवडे । अति विषय विषयाधीन ते किडे । एका जनार्दनी निजज्ञानशक्ति । निर्विषय मन ते अभेद भक्ति ।।१३५।।

**भाविकांचे स्थान पंढरी पावन** । अभाविका जाण नावडे ते । ह्मणोनि चिंतन विठ्ठलाचे वाचे । अभाविका साचे नावडे नाम । वैष्णवांचा संग नावडे कीर्तन । अभाविकांचा दुर्गुण हाची देखा । अभाविकांच्या संगे परमार्थ नावडे ।एका जनार्दनी न घडे सेवा काही ।।१३६।।

**नशिवंत शरीर ओंगळ वोखटे** । परी तया भेटे कर्म धर्म । अशाश्र्वत शाश्र्वत हेचि उगमा मनी । तया चक्रपाणी धावे मागे । देहीचे देहपण देहाचिये माथा । कर्म धर्म सत्ता देहालागी । एकाजनार्दनी कर्म धर्म पाठी । वाया भ्रम पोटी घेता जीव ।।१३७।।

**देहेचेनी सुखे सुखावत** । सुख सरता दु:ख पावत । ऐशी आहे बरोबरी । वाया शीणतो निर्धारी । सुख दु:ख पावत । ऐशी आहे बरोबरी । वाया शीणतो निर्धारी । सुख दु:ख ते समान । मुळीचेच हे दोन्ही जाण । एकाजनार्दनी सुखदु:ख । अवघा जनार्दन एक ।।१३८।।

**देहबुद्धि जयापाशी** । पाप वसे त्या मानसी । दोष जाणा अहंकार । तेणे सत्य हा संसार । समूळ अहंतेच्या नाशी । ब्रह्मप्राप्ती होय त्यासी । एकाजनार्दनी अहंकार । त्याग करावा सत्वर ।।१३९।।

**देव देही आहे सर्व ते म्हणती** । जाणतिया न कळे गती देव नेणे । ऐसे ते भुलले देवा विसरले । तपताती वहिले करुनी कष्ट । देवाची ती भेटी नाही जाहली तया । शिणताती वाया कर्महीन । एकाजनार्दनी जवळी असोनी देव । कल्पनेने वाव केला मने ।।१४०।।

**सर्वात्मक भरला देवो** । तेथे न ठेवती भावो । ऐशी भुलली कर्मासी । आचरती ती दोषासी । सर्वा ठाई व्यापक हरी । कोण व्देषी कोण वैरी । ऐसे अभागे ते हीन । भोगिताती जन्म पतन । नको ऐसे ब्रह्मज्ञान । एकाजनार्दनी शरण ।।१४१।।

**देव सर्वाठायी वसे** । परि न दिसे अभाविका । जळी स्थळी पाषाणी भरला । रिता ठाव कोठे उरला । जिकडे पाहे तिकडे देव । अभाविका दिसे वाव । एकाजनार्दनी नाही भाव । तंव तया न दिसे वाव ।।१४२।।

**लटिक्या भावाचे** । देवपण नाही साचे । भाव नाही जेथे अंगी । देव पहाता न दिसे जगी । सर्वकाळ मनी कुभाव । जैसा पाहे तैसा देव । लटिके भंड फजिती । एका जनार्दनी निश्चिती ।।१४३।।

**देही असोनिया देव** । वाउगा करिती संदेहो । जाय देवळासी स्वये । मनी आशा दुसरी वाहे । बैसोनी कीर्तनी । लक्ष लावी सदा धनी । करू जाय तीर्थयात्रा । गोविले मन विचारा । ऐशियासी न भेटे देव । एका जनार्दनी नाही भाव ।।१४४।।

**ब्रह्म एक परिपूर्ण** । तेथे नाही दोष गुण । पराचा देखती जे दोष । तेचि दोषी महा दोष । ब्रह्मी नाही दोष गुण । पहाती ते मूर्ख जाण । जे गुण दोष देखती । एका जनार्दनी नाडती ।।१४५।।

**जीवांचे जीवन जनी जनार्दन** । नांदतो संपूर्ण सर्व देही । वाउगी का वाया शिणती बापुडी । काय तया जोडी हाती लागे । पंचाग्नि साधन अथवा धुम्रपान । तेणे काय संपूर्ण हरि जोडे । एकाजनार्दनी वाउगी ती तपे । मनाच्या संकल्पे हरि जोडे ।।१४६।।

**आशाबद्ध करिती देवाचे पूजन** । तेणे नारायण तुष्ट नोहे । आशाबद्ध करिती वेदाचे पठण । तेणे नारायण तुष्ट नोहे । आशाबद्ध करिती पुराण श्रवण । तेणे नारायण तुष्ट नोहे । आशाबद्ध करिती दैवउपासन । तेणे नारायण तुष्ट नोहे । आशाबद्ध करिती जपतप हवन । तेणे नारायण तुष्ट नोहे । निराशी करिती देवाचे कीर्तन । एकाजनार्दन तुष्ट नोहे ।।१४७।।

**भिक्षेलागी पाणीपात्र** । साठवण उदर मात्र । सायंकाळी प्रात:काळीसी । भिक्षा संग्रह नसावा निश्र्चयेसी । संग्रह यत्नाचीया चाडा । मोहोळ बांधिती अवघा कडा । मोहोळ झाडिता त्यासी । नाश होतो मासीयासी । सर्व मायीक पदार्थ । एकाजनार्दनी परमार्थ ।।१४८।।

**होऊनी विठोबाचा दास** । करी आस दुजियाची । वाया माता व्याली तया । भूभार कासया अवनीसी । पूर्वज तया कंटाळीती । जन्मला म्हणती खर हा । एकाजनार्दनी ह्मणे । तया पेणे यमलोकी ।।१४९।।

**राहुनी पंढरी** । आणिकाची आस करी । तो पातकी चांडाळ । खळाहूनी अमंगळ । सांडोनिया विठ्ठल देव । आणिकांसी ह्मणे देव । सांडोनिया पुंडलिका । गाय आणिकासी देखा । ऐसा पातकी तो खळ । तयाचा न व्हावा विटाळ । ह्मणे जनार्दनाचा एका । तया तेथे ठेऊ नका ।।१५०।।

**हीन जे पामर नावडे वाचे नाम** । सदा कामी काम प्रपंचाचे । भोगिती यातना न सुटे कल्पकोटी । चौऱ्याशीची बेडी द्दढ पायी । जैसे कर्म केले तैसे फळ आले । कुंथता वाहिले भार माथा । एकाजनार्दनी संशय न धरावा । आला तो भोगावा विषमकाळ ।।१५१।।

**जन्मोनी प्राणी नाम न घेत वाचे** । त्याचिया जन्मचे व्यर्थ वोझे । प्रसवोनी तया वांझ ती जननी । बुडविली दोन्ही कुळे त्याने । पूर्वज पतनी पडती बेताळीस । नामे नये मुखास ऐसा प्राणी । एकाजनार्दनी पतीत दुराचारी । यम तया अघोरी घालितसे ।।१५२।।

**अभागी तो जाण** । न करी विठ्ठलस्मरण । तया व्यालीसे जननी । अभागी तो पाप खाणी । न जाय पंढरपुरा । मांडी वेदांत पसारा । एकाजनार्दनी ह्मणे । श्र्वानापरी जयाचे जिणे ।।१५३।।

**नरदेह प्रताप शतवर्षे ह्मणती** । अभागी घालविती वाया जाण । न करी भजन न जाय पंढरी । अभाविक दुराचारी सदा मनी । जनार्दनाचा एका न पाहे त्याचे मुख । नरदेही देख पशुवत ।।१५४।।

**अभागिया नावडे वैष्णवाचा संग** । सदा तो उद्दयोग परनिंदेचा । ऐसे जे पामर भोगिती अघोर । सुठिका निर्धार नोहे त्याची । जन्मोनी मरती पुन्हा जन्मा येती । होतसे फजिती मागेपुढे । एकाजनार्दनी नरकाचे बिढार । यमाचे ते घर माहेर केले ।।१५५।।

**ऐसे कृपण मनाचे** । ते या पंढरीचे न वचे । पापीयासी पंढरपूर । नावडे ऐसा निर्धार । ब्रह्मज्ञान पापाडीया । नावडे कायावाचा जीवेसी । विषयी जो दुराचारी । तया नावडे ज्ञानेश्र्वरी । अभक्तांसी संत भेटी । झाल्या नावडे ह्मणे चावटी । एकाजनार्दनी ह्मणे देवा । तया दुरी मज ठेवा ।।१५६।।

**विषयी जो लंपट । तया नावडे ही वाट** । पंढरी सुभट । नावडेचि पापिष्टा । अमृत फळे पूर्ण आली । का गा जैसी परी जाली । तैसेची हे चाली । पापिष्ठाची जाणावी । धनलुब्धका नावडे धर्म । मद्दयपिया नावडे कर्म । जारासी संतसमागम । नाठवेची सर्वथा । स्त्रीलुब्ध परव्दारी । काय तया गीता निर्धारी । एकाजनार्दनी हरि । नको संग तयाचा ।।१५७।।

**ब्राह्मणाचे तीर्थ घेता त्रास मोठा** । प्रेमे पितो घोटा घटघट । हाते मोऱ्या उपशी कष्ट करी नाना । देवाच्या पूजना कंटाळतो । गायीस देखोनी बदाबदा मारी । घोडयाची चाकरी गोड वाटे । एका जनार्दनी ऐसे झाले प्राणी । जन्मोनिया जनी व्यर्थ आले ।।१५८।।

**शूद्रादिक वर्ण त्याचे पाय धुती** । उपदेश घेती तयाचे गा । वेद शास्त्रालागी अव्हेर करती । आपुलाले मती पाषांडी ते । आचार सांडोनी होती शब्दज्ञानी । व्यर्थ अभिमानी पडताती । एका जनार्दनी ऐसिया पामरा । केवि विश्र्वभरा पावसील ।।१५९।।

**नित्य हाटपाठ आचार सपाट** । कारभार दाट असत्याचा । कैचे सोवळे कैचे ओवळे । प्रात:काळी शिळे भक्षिताती । कैचे चोखटपण अंतरी मळीन । दिसे कळाहीन पापिष्ठ तो । एकाजनार्दनी अवघा अनाचार । दाविती आचार वरीवरी ।।१६०।।

**पोटासाठी लागे नीचाचिया पाया** । करीना भलिया नमस्कार । स्वयंपाकी याच्या करितो टवाळ्या । आपण खाये शिळ्या भाकरीते । अग्निहोत्रादिक त्याची करी निंदा । आपण घेई सदा गुरगुडी । एकाजनार्दनी ऐशी याची मात । नको तयाचा संगात मज देवा ।।१६१।।

**दुर्जनाचे संगे दुर्जन लागत** । नाना विटंबित सज्जनासी । दुर्जनाचे अन्न सेउनी दुर्वास । छळिले पांडवास निशिमाजी । एकाजनार्दनी दुर्जनाचा संग । तेणे होय भंग भाविकाचा ।।१६२।।

**सकळ दोषा मुकुटमणी** । निंदी जनी संता तो । जन्मतांची नाही मेला । व्यर्थ वाचला भूभार । त्याचियाने दु:खी धरा । नाही थारा जन्मोजन्मी । दांत खाय यमधर्म । देखोनिया त्याचे कर्म । अभागी तो वसे जनी । एका शरण जनार्दनी ।।१६३।।

**नाम गाता करी आळस** । निंदा करी बहु उल्हास । कोणी गातसे हरीनाम । तयासी तो अधम उपहासी । आपणा घरी नाही कण । भांडारीया म्हणे बुद्धिहीन । नेणे कधी स्वप्नी भाव । मानी देव वेगळाचि । एकाजनार्दनी ते पामर । भोगिती अघोर चौर्यांशी ।।१६४।।

**वेद तो प्रमाण** । वचन करी जो अप्रमाण । तो स्वहिता नाडला । जन्मोजन्मी कुडा जाहला । वेदाची जे मर्यादा । नायाकेची जो कदा । वेदे सांगितले कर्म । करी सदा तो अधर्म । जन्मताची प्राणी । एकाजनार्दनी वांझ जनी ।।१६५।।

**जन्मला जो प्राणी** । रामनाम नेघे वाणी । महापातकी चांडाळ । अधम खळाहुनी खळ । सदा परव्दारी हिंडे । नाम घेता कानकोंडे । करूनये तेची करी । सदा परद्रव्य हरी । जन्मोनिया अंड । एकाजनार्दनी रांड ।।१६६।।

**मर्कटासी मदिरा पाजिली** । तैसा भुलली विषयासी । मातला गज नावरे जैसा । विषय फासा त्यावरी । रेडा जैसा मुसमुशी । तैसा लोकांसी बोलत । श्र्वाना जैसे पडती किडे । तैसा चहुकडे रडे । शरण एकाजनार्दनी । अंती यमाची जाचणी ।।१६७।।

**भक्तिहीन जन्मला पशु** । केला नाशु आयुष्या । नाही कधी संतसेवा । करि हेवा भूतांचा । मुखी नये रामनाम । सदा काम प्रपंची । एकाजनार्दनी ते नर । जन्मोनी पामर भूभार ।।१६८।।

**मानी नामाचा कंटाळा** । तया वोंगळा न पहावे । सदा त्याचे विषयी ध्यान । वाचे बोले भलते वचन । आलिया तो धरा । तया न द्यावा पै थारा । ऐसा चांडाळ जन्मला । वाया भूमीभार पै जाहला । एकाजनार्दनी निर्धार । तया थार नाही कोठे ।।१६९।।

**शिकविले नाईके वचन** । वरिता करी कर्म जाण । न देखे आपुले गुण दोष । परावयाचे बोले नि:शेष । न करावे ते करी । न बोलावे ते बोले निर्धारी । न मानी स्वयातीचा आचार । सदा करी अनाचार । शिकविले गेले वाया । शरण एकाजनार्दन पाया ।।१७०।।

**दीपकाचे ठाई नाही व्दैतभाव** । चोर आणि साव सारखाची । तैसे ब्रह्मज्ञान सांगताती गोष्टी । अभाविका पोटी स्थिर नोहे त्याचा । एकाजनार्दनी खळांचा स्वभाव । पालट वैभव नोहे त्यासी ।।१७१।।

**कस्तुरी परिमळ नशितसे हिंग** । ऐसा खळाचा संग जाणिजेती । साकरेचे आळा निंब जो पेरिला । शेवटी कडू त्याला फळे पत्रे । चंदनाचे संगे हिंगणी वसती । परि चंदनाची याती वेगळीच । एकाजनार्दनी हा अभाविकाचा गुण । वमनासमान लेखू आह्मा ।।१७२।।

**मृगजळांचेनि काय तृपा हरे** । क्षुधा निर्धारे अर्क फळे नोहे तृप्ति । पाहता गोजिरे दिसे वृंदावन । कै गोडपण नये त्यासी । वचनाग खाता आधी लागे गोड । शेवटी अवघड देहपीडा । एकाजनार्दनी दुर्जन अभाविक । खळ अमंगळ देख संसारात ।।१७३।।

**कथा कीर्तन नेणे** । सदा बोलणे वाचाळ । ऐसा अभागी जन्मला । कोण सोडवी तयाला । गाये डफगाणे नानापरी । स्वप्ना नेणे वाचे हरी । आपण बुडोनि बुडवी लोका । शरण जनार्दनी एका ।।१७४।।

नये मनासी अभागिया गोष्टी । ह्मणे बोलती चावटी बहु बोल । सांगता सांगता बुडतसे डोही । पुढिलाची सोई नेणती ते । वाचेसि स्मरण नाही कधी जाण । सदा मद्ययपान बडबडतसे । एकाजनार्दनी नायके सांगता । कोण याच्या हिताहित करी ।।१७५।।

**अमंगळाचा अमंगळ वाण** । नये वाचे नारायण । सदा सर्वकाळ परनिंदा करी । वाचे हरिहरि न ह्मणे पापी । कस्तुरी उत्तम परि शेजार हिंगाचा । अमंगळासी साचा बोध नोहे । एका जनार्दनी तयाची पै गोष्टी । बोलणे चावटी परमार्थ नोहे ।।१७६।।

**अभक्ता दुर्जना यमदूत यातना** । नानापरी जाणा करिताती । नाम नाही मुखी दूत तया ताडिताती । नेऊन घालिती कुंभपाकी । ताम्र भूमीवरी खैराचे इंगळ । लाविताती ज्वाळ अंगालागी । एकाजनार्दनी यातनेचे दु:ख । कोणा सांगेल मूर्ख यमलोकी ।।१७७।।

**निर्दय मानसी मारिताती दूत** । कारे चूकलेति रामनाम । प्रपंचाचे कामी करूनि हव्यास । विसरला मुखास नाम घेता । म्हणोनि वोढिती तोडिती निष्ठुर । दया ते अंतरा नये त्यांच्या । एकाजनार्दनी निर्दय साचार । नाही आन विचार तये ठायी ।।१७८।।

**नावडे जयाची पंढरी** । तोची जाणा दुराचारी । नावडे जया चंद्रभागा । तोचि अपवित्र पै गा । नावडे पुंडलिका वंदन । तोचि चांडाळ दुर्जन । नावडे विठ्ठलाची मूर्ति । तोचि जगी पापमति । एकाजनार्दनी शरण । तोचि दुराचारी जाण ।।१७९।।

**स्वप्नीचा भांबावला** । ह्मणे मज चोरे नागविला । ऐशी अभागयाची मति । वाया भुले चित्तवृत्ति । नेणे कधी मुखी नाम । सदा वसे कामक्रोध । एका जनार्दनी देव । नाही भेव निरसीत ।।१८०।।

**कारे जन्मला अभागी** । प्रीति न धरी पांडुरंगी । उत्तम चांगलेरे मुख । रामनाम न ह्मणता विख । उत्तम क्रूर ते दिसती । दानधर्म न घडे हाती । उत्तम पद ते शोभिती । परि तीर्थयात्रे न जाती । पुष्ट दिसते शरीर । व्यर्थ वाचोनि भूमीभार । ऐसे अभागी जन्मले । एकाजनार्दनी वाया गेले ।।१८१।।

**भूमीभार वाया** । कारे जन्मली ही काया । न घडे कारे दानधर्म । कर नोहेती सर्प जाण । पायी तीर्थयात्रा न घडे । पाय नोहेत ते केवळ लाकडे । एकाजनार्दनी ते वेडे । नरदेही प्रत्यक्ष रेडे ।।१८२।।

**ज्ञान ध्यान वर्म शाब्दिक कवित्व** । हे तो न कळे अर्थ मूढाप्रती । राम सुखे गावा राम सुखे गावा । वाचे आठवावा कृष्ण सदा । एकाजनार्दनी रामकृष्ण मनी । भजा आसनी शयनी सर्वकाळ ।।१८३।।

**आयुष्य ते तीन भाग जाहले** । परी मुखी राम न बोले । सदा प्रपंचासी मन । वरवर ब्रह्मज्ञान । चित्त शुद्ध झाले नाही । ज्ञान कोरडे सांगोनी कायी । उपाधीचा निषेध भेद । सदा वाद अपवाद । एकाजनार्दनी मना । तेथे राहु नको जना ।।१८४।।

**भलतियासी ह्मणती** । आहे महाराज निश्र्चिती । ऐसे अंधळे हे जन । गेले भुलोन संसारे । महाराज जनार्दन । नेणती तयाचे चरण । दीना महाराज ह्मणती । एकाजनार्दनी सांगू किती ।।१८५।।

**सर्व महाराजाचा रावो** । विटेवरी पंढरीरावो । तया न जाती हे शरण । दीना घालिती लोटांगण । तारा ह्मणती आम्हासी व ऐसे अभागी ते दोषी । एकाजनार्दनी नाही भाव । तया अवघेची वाव ।।१८६।।

**साधने कासया करसिरे गव्हारा** । चौऱ्यायशीचा फेरा चूकवी काही । वाउगेचि माझे म्हणोनी घेशी वोझे । आदि अंती तुझे कोण होती । वाउगीयाच्या छंदा लागशी तु मूढां । पतनाचा खोडा चूकवी वेगे । एकाजनार्दनी श्रीरंगा वाचुनी । धावण्या धावणी कोण धावे ।।१८७।।

**क्रोधयुक्त अंतःकरण** । तेणे नासे स्वधर्माचरण । ऐसे व्देषे बांधले घर । ते ठाई क्रोध अनिवार । ऐशिया स्वभावावरी । नर अथवा हो का नारी । स्वभाव बाधी सत्य जाण । शरण एकाजनार्दन ।।१८८।।

**अज्ञानी विश्र्वासे साधूसी वंदी** । ज्ञानिया तो सदा तया निंदी । ऐशी उभयतांचि क्रिया । पहाता चर्या एकची । वंदू निंदू कोणी ऐसा एक भाव । तेथे तो देव वसे सदा । ज्ञान अज्ञानाचा निवाडा होय । एका शरण जनार्दनी जाय ।।१८९।।

**पराचे ते दोष आणू नये मनी** । जयाची ते करणी त्याजसवे । विषाचिया अंगी शांतीचा कळवळा । कोणा पाहे डोळा भरुनी द्दष्टी ।।१९०।।

**एकासी शुद्ध एकासी अशुद्ध** । बोलता अबद्ध नरक जोडे । शुद्ध अशुद्ध हे विठोबाचे नाम । जपता घडे सकाम मोक्ष मुक्ती । सकाम निष्काम देवाचे भजन । तेणे चुके पतन इहलोकी । एका जनार्दनी शुद्ध आणि अशुद्ध । टाकूनिया भेद भजन करी ।।१९१।।

**प्रत्यक्ष देव असोनी नाही ह्मणती** । न कळेचि मूर्खा देशकपाटे धुंडिती । देहीच देही देव तो आहे । भ्रांतीचेनि लोभे नाहीसा होय । एकाजनार्दनी सबळ ती भ्रांती । देही देव असोनी वाया हुडकिती ।।१९२।।

**कासियासी तपा धावा** । जवळी असता शेजे गावा । रामजवळी चुकले । जप तपे भांबावले । तीर्थी नाही क्षेत्री नाही । जवळी असता भ्रांती पाही । असता सबाह्याभ्यंतरी । नाही म्हणोनी दैन्य करी । तयालागी सैरा हिंडे । तोचि तया मागे पुढे । एकाजनार्दनी योग । रामचि होय सर्वांग ।।१९३।।

**हृदयस्थ असोनी का रे फिरसी वाया** । दीप आणि छाया जयापरी । आत्मतीर्थी सुस्नात झालिया मन । आणिक साधन दुजे नाही । साधन ते मन करी आपुले आधीन । यापरते कारण आन नाही । एकाजनार्दनी मनासी आवरी । मग तू संसारी धन्य होसी ।।१९४।।

**उलट पालट कासया खटपटी** । नको तू कपाटी रिघू वाया । आसन मातृका साधन समाधि । वाउगी उपाधी तेणे होय । एकाजनार्दनी वाउगा सायास । नामेची सौरस पुरे काम ।।१९५।।

**जाणोनिया वेडा होसी का गव्हारा** । भजे तू पामरा श्रीविठ्ठला । नकोरे साधन व्युत्पत्तीचा भार । चूकवी वेरझार विठ्ठलनामे । एकाजनार्दनी विठ्ठलावाचुनी । सोडविता कोणी नाही दुजा ।।१९६।।

**अष्टांग साधने करिताती योगी** । परी मन अव्यंगी होत नाही । जिंकीताची मन साधने साधती । न जिंकता फजिती मागे पुढे । एकाजनार्दनी कायावाचा मन । धरुनि बंधन त्यासी करी ।।१९७।।

**दुजेपण नको पाहू सर्वाठायी** । एकरूप देही देव दिसे । येणे सर्व काम सुगम सोपारे । दुजेपण वावरे देहबुद्धि । मन चित्त अहंकार करणे या विचार । दुजेपण पार केवि तरे । एकाजनार्दनी दुजेपण सांडी । विठ्ठलाचे मांडी हृदयामाजी ।।१९८।।

**एका स्तुति एका निंदा** । करिती अंगी आदळे बाधा । अर्धांगी लक्ष्मी काय वंदावी । चरणाची गंगा निंदावी । भज्य करावे भजनी । निंदा स्तुति सांडोनी दोन्ही । तेची भक्ति निज स्थिती । आवड चित्ती भजनाची । वसावे सदा चरणी मन । एका शरण जनार्दन ।।१९९।।

**अखळ तो खेळ नाकळे वेदांती** । वाउगे कुंथती भारवाही । ऐसा तो अकळ न कळेचि कळा । लावीयेला चाळा सर्व जीवा । परस्परे एकएका पै मैत्री । ऐशी चाले धात्री पंचभूते । जगपटतंतू आपणचि होय । ऐसा हा निश्र्चय सत्ता ज्याची । एकाजनार्दनी सर्व सत्ताधारी । न माये चराचरी कीर्ति ज्याची ।।२००।।

**लोखंडाची बेडी तोडी** । आवडी सोनियाची घडी । मी ब्रह्म ह्मणता अभिमान । तेथे शुद्ध नोहे ब्रह्मज्ञान । जळापासुनी लवण होय । जे जळीचे जळी विरुनी जाये । जैसी देखिली जळगार । शेवटी जळचि निर्धार । मुक्तपणे मोला चढले । शेवटी सोनियाचे फासा पडिले । एकाजनार्दनी शरण । बद्धमुक्ता ऐसा शीण ।।२०१।।

**अभिमानासाठी** । वेचिती तपाचिया कोटी । अभिमान दुर्वासासी । व्यर्थ शापिला अंबऋषी अभिमान ब्राह्मिसासी । नेले गाई गोप वत्सासी । अभिमान नाडला पूर्ण । विश्र्वामित्र ऋषी जाण । एकाजनार्दनी शरण । समूळ सांडावा अभिमान ।।२०२।।

**कलन्नपुत्रबाधा अभिमानाची** । तेही त्यजिल्या शेखी त्यागी म्हणे निजाची । अभिमान कैसेनी सरे । ही कृपा कीजे माहेरे दातारा । देही देहातीत प्रतिपादिजे ज्ञान । तेणेचि ज्ञाने देही येतुसे अभिमान । जे जे होय रुते ते अहंकार । त्यागी भोगी होय दिगंबरु । ब्रह्मज्ञाने म्हणती अभिमानाची तुटी । सोऽहं सोऽहं म्हणोनी तेथेही लागे पाटी । व्दैत नाही जगी मीच येकला येकु । येणे स्फुरणे आला अभिमान घातकु । अति सूक्ष्म अभिमान कणवा न पडे ठाई । देहातीत ज्ञानी म्हणती जो विदेही । एकाजनार्दनी जगदगुरु न्याहाळी । गौखर वंदिता अभिमानाची धुळी ।।२०३।।

**आणिकांचे मनी आणिक संकल्प** । न धरा विकल्प वासनेचा । नका यातायाती वाउगा फजिती । उगवा गोवागुंती आपलाली । एकाजनार्दनी एकचि स्मरा । जन्म वेरझारा खंड होती ।।२०४।।

**सबराभरित देव असोनी जवळी** । व्यर्थ ते कवळी मृतिका जळ । ज्याचिया सत्तेचा पंचभूत खेळ । विसरती गोपाळ तयालागी । वल्कले वेष्टन भस्माचे धारण । करिती धुम्रपान वाउगेचि । एकाजनार्दनी हृदयस्थ असता । का हो शीण तत्वता करिताती ।।२०५।।

**गाण्याचे कीर्तन वाखाणिले जाणिवेचे ज्ञान ते जाणिवेने खादले** । भवार्णव हा अवघा उभारी । तो कळे जाणिवेवरीरे । पंडिताचा बोध विध्संसी वाद । तापसाचे तप निर्दाळी क्रोध । योगियाचा योग नाडीयेला सिद्धि । अभिमान नाडी सज्ञान बुद्धी । कर्माकर्म नाडी वर्णाश्रम । संबंधी विषम विकल्प करी । एकाजनार्दनी भगवतकृपा पूर्ण । निराभिमाने चरण धरियले ।।२०६।।

एकांती बैसणे शरीर रोधणे । अष्टांग साधने श्रम नको । गुदाते अंगुष्ठ लावुनी बैसणे । शरीरी रोधणे पंचप्राण । नको नको व्यर्थ जीवासी यातना । रामनाम स्मरणा करी सुखे । एकाजनार्दनी नको यातायाती । नामस्मरणे मुक्ती सत्वर जोडे ।।२०७।।

**लांब लांब तुम्ही सांगाल गोष्टी** । तत्वेसी भेटी करी उठाउठी । मीपण जोवरी गेले नाही । तोवरी तुहमी केले काई । मीपण देही प्रपंच द्दष्टी । कोरडया काय सांगाल गोष्टी । एकाजनार्दनी बोधाचे सत्व । बोलामाजी तेणे दाखविले तत्व ।।२०८।।

**वरीवरी दावी भक्ति** । अंतरी असे कामासक्ती। माझे घर माझे कलत्र । माझे गोत्र माझा पुत्र । ऐसा प्रपंची गुंतला । तयावरी काळ घाला । एकाजनार्दनी शरण । काळ वंदितसे चरण ।।२०९।।।

**अंतरी शुद्ध नाही भाव** । वरी मिरवी वैराग्य वाव । जळो जळो त्याचे ज्ञान । काय नटाचे भाषण । टिळा टोपी लावी सोंग । बकध्यानी मिरवी रंग । शरण एका जनार्दनी । त्याचा मंत्र न घ्यावा कानी ।।२१०।।

**अंतरी भरला द्दढ काम** । वरीवरी दावितसे नेम । जैसे फळ वृंदावन । परी अंतरी कडू पूर्ण । सदा वाहे तळमळ चित्त । वरिवरी दावी परमार्थ । एका शरण जनार्दनी । ऐसे नर पाप खाणी ।।२११।।

**किती काकुळती यावे** । किती वेळा फजित व्हावे । न भीचि तो यमदंडा । जैसा मेंढा मातलासे । भलतिया वरी धावे । श्र्वान जैसे ते स्वभावे । एकाजनार्दनी जाण । वाहतो देवाची तो आण ।।२१२।।

**किती बोलू किती सांगू** । नायकती त्यांचा नसरे पांगु । जाता न राहती आडवाटे । मोडती कांटे कर्म धर्म । वाउगे पंथे असती जनी । तये मांडणी गुंतू नका । एकाजनार्दनी लडिवाळ । पूर्ण कृपाळ संतांचा ।।२१३।।

**पंडितांच्या वचना द्यावे अनुमोदन** । परि हित नोहे जाण तेणे काही । शास्त्रीकाचे वचना द्यावे अनुमोदन । परि हित नोहे जाण तेणे काही । वेदांताच्या वचना द्यावे अनुमोदन । परिहित नोहे जाण तेणे काही । संतांच्या वचना द्यावे अनुमोदन । एकाजनार्दनी तेणे हित होय ।।२१४।।

**पवित्र अंतर शुद्ध करा मन** । तेणे घडे जाण सर्व कर्म । वेदयुक्त मंत्र जपता घडे पाप । मी मी ह्मणोनी संकल्प उठतसे । यज्ञादीक कर्मे घडती सांग । मी मी संसर्ग घडता वाया । दानधर्मविधी धरिता शुद्ध मार्ग । मी मी म्हणता याग वाया जाय । एकाजनार्दनी मीपणा टाकून । करी कृष्णार्पण सर्वफळ ।।२१५।।

**समूळ कामनेते दंडावे** । मग शिरादिक मुंडावे । अंतरी अनिवार कामना । विरक्ति तो दाखवी जना । नाम गर्जता हे होटी । एकाजनार्दनी काम पळे नेहटी ।।२१६।।

**आलासी पाहुणा नरदेही जाणा** । चूकवी बंधनापासुनिया । वाउगाची सोस न करी सायास । रामनामे सौरस जप करी । यज्ञयागादिक न घडती साधने । न्यून पडता पतन सहज जोडे । एकाजनार्दनी चुकती येरझार । करी तू उच्चार रामनाम ।।२१७।।

**तू नायकसी कवणाचे** । बोलता नये बहू वाचे । तुझे तुज हिताचे । वर्म आम्ही सांगू । होई सावध झडकरी । नको पडू आणिके भरी । वायाचि धावसी दिशाभरी । श्रमु निर्धारी तुजचि । ब्रह्मज्ञानाची भरोवरी । वाउगी न करी निर्धारी । कर्म अकर्म आधी सारी । मग निर्धारी सुख पावे । जेणे तुष्टे जनार्दन । हेचि करी पा साधन । शरण एकाजनार्दन । वाउगा शीण न करी ।।२१८।।

**जेथे कष्टे न लभे ज्ञान** । आधी पाहिजे समाधान । योगयाग तपाचे नाही कारण । शांतिक्षमादया जाण मुख्य धरी । आणिक नकोरे साधन । वायाशिण ब्रह्मज्ञान । आहमी मुखी गाऊ रामकृष्ण । हेचि समाधान आमुचे । आलिया जन्माचे सार्थक । जन्मजरा निवारू दु:ख । कायावाचा मने संतसेवा देख । दुजा हेतू नाही मनी । जन तोचि जनार्दन । साक्षी तया लोटांगण । एकाजनार्दन शरण । कायावाचा मनेसी ।।२१९।।

**ममता ठेउनी घरीदारी** । वाया का जाशी बाहेरी । आधी ममत्व सांडावे । पाठी अभिमाना खंडावे । ममता सांडी वोडेकोडे । मोक्ष सुख सहजी घडे । एकाजनार्दनी शरण । ममता टाकी निर्दाळून ।।२२०।।

**लज्जा अभिमान टाकुनी परता** । परमार्थ सरता करी का रे । वादक निंदक भेदक ऐसे त्रिविध । याचा टाकुनि भेद भजन करी । एकाजनार्दनी त्रिविधापरता । होऊनि परमार्था हित करी ।।२२१।।

**रस सेविल्यासाठी** । भोगवी जन्माचिया कोटी । रसने आधीन सर्वथा । रसनाव्दारे रसु घेता । जव रसना नाही जितिली । तव वाउगीच बोली । एकाजनार्दनी शरण । रस रसना जनार्दन ।।२२२।।

**उपाधि या नांव भूतांचा तो व्देष** । तो तू वा नि:शेष सांडी बापा । सर्वाठाई देव जगी तो भरला । व्यापुनिया ठेला जळी स्थळी । काम अकाम सकाम निष्काम । हे सोपे वर्म भाविकासी । आसन ध्यान धारणा ते ध्येय । हे सोपे उपाय साधकांसी । दंडन मुंडन नको तीर्थाटन । एकाजनार्दन हृदयी धरी ।।२२३।।

**जिव्हा रस चाखी अवलोकी नेत्र** । प्रेरक पवित्र आत्माराम । बोलतसे मुख त्वचे कळे स्पर्श । प्रेरक परेश आत्माराम । बोलतसे मुख त्वचे कळे स्पर्श । प्रेरक परेश आत्माराम । सुखदु:ख ज्ञान होतसे पै चित्ता । प्रेरक पंढरी नाथवीण नाही । घ्राणा परिमळ एकती श्रवण । प्रेरक नारायण सर्व साक्षी । हस्ते घेणे देणे चरणी गमन । प्रेरक ईशान आत्माराम । ज्याच्या सत्तेमुळे हाले वृक्षपान । प्रेरक भगवान सर्वांचा तो । एका जनार्दनी पाय हे धरावे । ध्यान हे करावे हृदयी त्याचे ।।२२४।।

**वैराग्य प्रथम असावी शांति** । तेणे विरक्ति अंगी जोडे । हेचि मुख्य वर्म साधका साधन । येणे जनार्दन जवळी असे । उपासना मार्ग हेचि कर्मकांड । हेचि जे ब्रह्मांड जनी वनी । हेचि देहस्थिति विदेह समाधी । तुटती उपाधि कर्माकर्म । एकाजनार्दनी शांति क्षमा दया । याविण उपाय उपाधि ते ।।२२५।।

**सत्य असत्य दोन्ही देहीच भासत** । तेणेचि नासात सर्व काम । एकासी वंदावे एकासी निंदावे । ऐसिया भावा काय सत्य ते मानावे । देह जातो गोष्टी असत्य न बोलू । सर्वज्ञ विठ्ठल म्हणो आम्ही । सत्य असत्याची वार्ता नको देवा । एकाजनार्दनी जीवी हेचि प्रेम ।।२२६।।

**असत्याचा शब्द नको वाचे माझे** । आणिक होका वोझे भलतैसे । परि सतरंज वंदिन मी माथा । असत्य सर्वथा नोहे वाणी । अणुमात्र रज डोळा न साहे । कैसा खुपताहे जन दृष्टी । एकाजनार्दनी असत्याची वाणी । तोचि पापखाणी दुष्टबुद्धि ।।२२७।।

**एक एक मंत्रा करिती अनुष्ठान** । परि विठोबाचे चरण दुर्लभ ते । एक एक तीर्थां करिती प्रदक्षिणा । परि विठोबाचे चरण दुर्लभ ते । एक एक ग्रामी करिती भ्रमण । परि विठोबाचे चरण दुर्लभ ते । एक एक देह कर्वती घालिती । परि विठोबाची प्राप्ति दुर्लभ ते । एकाजनार्दनी सत्संगावाचुनी । परि विठोबाची मिळणी दुर्लभ ते ।।२२८।।

**नाही नामासी साधन** । निराहार न लगे उपोषण । नको दंडन मुंडन । सुखे वाचे आठवी । काया कष्ट नको काही । देश विदेशासी न जाई । निवांताची ठायी । बैसोनिया जपे । नको वित्त धन नाश । होऊनी देहीच उदास । एकाजनार्दनी नाश । नको करू शरीराचा ।।२२९।।

**स्नान दानाचे एक फळ** । त्याहुनी नामाचे सुफळ । कोटी गुणे विशाळ । पुण्य हाता चढतसे । धन्य धन्य नाम श्रेष्ठ । गाय अखंड नीळकंठ । आणीक श्रेष्ठ श्रेष्ठ । नाम मुखी जपताती । नाम त्रिभुवनी साजिरे । नाम पावन गोजिरे । एका जनार्दन निर्धारे । सांगे बाह्य उभारुनी ।।२३०।।

**जप जाप्य तप नको अनुष्ठान** । पंचाग्नि साधन योग नको । नको तीर्थाटन नको मंत्रावळी । वेदशास्त्र जाळी गुंतू नको । नको आत्मस्थिति ब्रह्मज्ञान । नको यंत्रमत्र  नकोरे कल्पना । भ्रांति भुली जाणा नको नको ।। नको करू तु सायास धरी पा विश्र्वास । एका जनार्दनारा पाहे डोळा ।।२३१।।

**ज्याचे नाम स्मरता कळिकाळ ठेंगणा** । तया नारायणा विसरले । करिती पूजन आणिकांची स्तुति । दैन्यवाणे होती अंतकाळी । एकाजनार्दनी तयाचे बंधन । कोण करील खंडन जन्मकर्मा ।।२३२।।

**न लागे न लगे जीवाचा तो नाश** । नाम गाता उल्हास मानाचत्ती । पंचाग्नि साधन नको धुम्रपान । योगयाग तपन नको काही । मुखे वाजवा टाळी मुखी नाम घोष । पातकांचा नाश कल्पकोटी । एकाजनार्दनी नाम एक समर्थ । तेणे पुरे स्वार्थ सर्व जीवा ।।२३३।।

**जो जो धरसी वासना** । तो तो नोहे रे उगाणा । पंढरीचा राणा । ध्यानामाजी आणिका । हेचि सर्व साधनांचे सार । नको व्युत्पत्तीचा भार । या वचनी निर्धार । धरी संतपायी ।

नको योगयाग तप । वाउगा मंत्र खटाटोप । येणे न धाये माप । जन्मजरामृत्यूचे । नको पडू याचे भरी । वाचे म्हणे कृष्ण हरी । एकाजनार्दनी निर्धारी । निष्पाप होसी तू ।।२३४।।

**वेश घेउनी नुसता का** । उगेच जगावरी रुसता का । भोग देखोनी घुसता का । आम्ही भले म्हणोनी पुसता का । थिता बाईल का सांडिली । आशा परवधु का धुंडिली । शुभ्र सांडोनी भगवी का गुंडिली । ऐसी भंडी का हो मांडिली । तुम्हा प्रपंचावर एके घाई रूसवेना । अहंज्ञातेपण कोण्हा पुसावेना । एका जनार्दनी मन जिंकवेना । मेल्या कुतऱ्यासारखे का बसवेना ।।२३५।।

**नका करू कर्माकर्म** । तुहमा सांगतो मी वर्म । श्रीरामाचे नाम । आट्टाहास्ये उच्चारा । तेणे तुटेल उपाधी । निरसेल भेदबुद्धि । होईल सत्वशुद्धि । भक्तिलागी देवाच्या । त्रिविध तापांचे दहन । कामक्रोधाचे नाशन । होईल प्रसन्न । चित्त रामप्रसादे । एकाजनार्दनी नेम । नित्य वाचे रामनाम । कैवल्याचे धाम । प्राप्त होय तत्काळ ।।२३६।।

**साधावया स्वरूपसिद्धी** । सिद्ध साधका समाधि । बैसोनी ध्यानस्थ बुद्धि । परि तो हरि न सापडे । धन्य धन्य वैष्णवसंग । खेळे तेथे पांडुरंग । कीर्तनी नाचतसे स्वयंभ । सदा सर्वकाळ सर्वदा । घेता नाम धावे विठ्ठल । नको तव नको मोल । न लगती कष्ट बहुसाल । तो कृपाळू दीनांचा । एकाजनार्दनी शरण । भक्तीस तुष्टे नारायण । त्याचे करिता चिंतन । आपोआप येतसे ।।२३७।।

**गुरुजनार्दन सांगे राममंत्र** । पूजावे पवित्र व्दिजवर । जोडिली संपदा ब्राह्मणासी द्यावी । अखंड करावी चरणसेवा । ब्राह्मणाचे तीर्थ जे नर सेविती । हरिहर येती वंदावया । ब्राह्मणाचे तीर्थ जे नर सेविती । हरिहर येती वंदावया । ब्राह्मणाचे तीर्थ ज्या नरा मस्तकी । सायुज्यता मुक्ति पाया लागे । एकाजनार्दनी मुक्ति हे तो वाव । भजा हे भूदेव कोटिजन्मी ।।२३८।।

**जनार्दने आम्हा सांगितले गूज** । पूजावे हे व्दिज आवडीने । मुखी वेद ज्याच्या तोचि नारायण । भिन्नभाव जाण भावु नको । भाविताहे भिन्न तयासी दंडिती । रवरव भोगिती कुळासहित । एकाजनार्दनी ब्राह्मणाची पूजा । चुकविल खेपा संसाराच्या ।।२३९।।

**ब्राह्मणवाक्यबळे वेदु नेमी जगा** । येऱ्हव्ही नुसघे पेव पाषाणाचे । ब्राह्मण वचनार्थ यागकर्म समर्थ । येऱ्हव्ही ते समस्त जीत ना मेली । जीवाचे जीवपण शिवाचे शिवपण । याहुनी ब्रह्मपूर्ण ब्राह्मण वाक्य । पथ नाही पोट नाही ब्रह्म ते निघोट । हाही अनुभव स्पष्ट

ब्राह्मणवाचने । एकाजनार्दनी ब्राह्मण पूर्ण बोधु । जाणे तया बाधु न शके कर्माकर्म ।।२४०।।

**शम दम तप शौच आणि क्षमा** । आर्जव तो प्रेमा ज्ञानलागी । आत्म अनुभव वेदी सत्य भाव । ब्राह्मण स्वभाव कर्म ऐसे । ब्राह्मणाच्या ठाई गुण शुद्ध सत्व । वसे ब्रह्मतत्व तया चित्ती । सर्वाभूती दया असे तयापाशी । विटला उपाधीसी सर्वभावे ।एकाजनार्दनी ऐसे हे ब्राह्मण । तयांचे चरण नित्य वंदू ।।२४१।।

**ब्राह्मणा स्वधर्म नित्य नैमित्तिक** । व्हावे उपासक वेदालागी । स्नानसंध्या वंदन हेचि नित्य कर्म । तैसेची  हे वर्म पितृतृप्ती । ब्रह्मयज्ञ आणि अग्नीची ते पूजा । तेणे अधोक्षजा पाविजेति । अथिती आलिया तया अन्नदान । करावे तर्पण द्रव्ययोगे । भूतदया गाई पशूते पाळावे । मुखी उच्चारावे रामनाम । एकाजनार्दनी हेचि नित्य कर्म । तेणे परब्रह्म हात चढे ।।२४२।।

**तयालागी ज्ञानी म्हणती नैमित्तिक** । पितृ श्राद्धादिक जाणावे ते । संतांचे दर्शन ज्ञानीयाची भेटी । उत्थापन अटी करणे लागे । एकादशी शिवरात्री प्रदोषादी । राम जयंन्त्यादि नाना पर्वे । नैमित्तिक ऐसे तयासी म्हणती । त्यायोगे पावती आत्मतत्वी । एकाजनार्दनी याते आचराल । तरीच पावाल चित्तशुद्धि ।।२४३।।

**कोणा ब्रह्मकर्म कळेना हे वर्म** । नासिले जीवन संध्यावेळे । धरिले नासिक अनुभवावाचुनी । त्रिपुटीसी पाणी लावियले । डोळिया वंदन स्वीकारिले कान । तेथे वर्म कोण नेणवेचे । हृदयावरी हात नाभीसी लाउनी । डोळे ते झाकुनी नाश केला । करी प्रदक्षिणा गुरु गुह्याविण । व्यर्थ केला शीण वायाची तो । वेळ चुकऊनि संध्या करी भलते वेळ । केले अमंगळ ब्रह्मकर्म । फिरवितो मणी बुटबुटा ते होटे । अजप तो कोठे स्थान नेणे । नेणे तो आचार करी वेडेचार । काय तो गव्हार संध्या जाणे । एकाजनार्दनी चुकला नेम । काय पशु अधम जन्म आले ।।२४४।।

**असोनी ब्राह्मण** । न करी जो संध्यास्नान । तो पातकी चांडाळ । अधम खळाहुनी खळ । वेद मन्त्र नये मुखा । सदा व्देष निंदा देखा । नाही श्राद्धसंकल्प घरी । हिंडे सदा दारोदारी । हरिनामी न बैसे चित्त । लोका पुराण सांगत । ऐसे पामर अभागी । तयाचे दोष कोण भंगी । एकाजनार्दनी नाम । वाचे होऊनी वदा निष्काम ।।२४५।।

**नित्य कर्माचे लक्षण** । स्नानसंध्या पितृर्पण । ब्रह्मयज्ञ देव पूजा । करावी त्या अधोक्षजा । वैश्र्वदेव अतिथी पूजन । आचरावे नित्य जाण । एकाजनार्दनी कर्म । तोचि जाणा परब्रह्म ।।२४६।।

**ब्रह्म जाणे ब्राह्मण याती** । त्याची घडावी संगती । ब्राह्मण तयासी ह्मणावे । त्याचे पायी लीन व्हावे । गळा घालोनी सूत्रदोरी । ह्मणविती ब्रह्मचारी । परीब्रह्म नाही ठावे । लोका सांगतसे भावे । एकाजनार्दनी पुर्ण । ब्रह्म जाणे तो ब्राह्मण ।।२४७।।

**आम्ही ब्रह्मपुरीचे ब्राह्मण** । यातिकुळ नाही लहान । आम्हा सोवळे वोवळे नाही । विटाळ न देखो कवणे ठाई । आम्हा सोवळे वोवळे नाही । विटाळ न देखो कवणे ठाई । आम्हा सोयरे जे जाहले । ते यातिकुळा वेगळे केले । एका जनार्दनी बोधु । यातिकुळीचा फिटला रांबंधु ।।२४८।।

**उचित अनुचित कळे तुम्हा** । सदैव निर्दैवा हासती । ऐशी राहे कर्मगती । वाया फजिती होती जगी । कर्म सोडोनिया नरा । करी आयुष्याचा मातेरा । एकाजनार्दनी निजसार । कर्म हिंडवी गिरिगव्हार ।।२४९।।

**जे जे कर्म करावे या देही** । भोगावे तेही देहादेह । देहीच कर्म देहीच भोगावे । वाया का शिणावे हाव भरी । आपुले संचित तैसा कर्म भोग । वाउगा उद्दयोग बोलून काय । एकाजनार्दनी कर्माची जे रेखा । न चुके सकळिका भोग त्याचा ।।२५०।।

**विपरीत सुपरीत हा तो काळाचा विभाग** । तेथे त्याग भोग करुनी काय । होणारे ते होते आपुले नचले काही । वाया दु:ख पाही मानू नये । जी जी संचिती लिहीलीसे रेखा । ती ती ब्रह्मादिका न चुकेचि । एकाजनार्दनी वाया का सायास । सुख दु:ख लेश पूर्वकर्म ।।२५१।।

**शुभ आणि विषम ही तो काळाची फळे** । भोगिल्याविण बळे न सुटती कधी । वाउगी कल्पना वाउगी कल्पना । वागविती मना परम मूर्ख । उसणे आणिताना जीवा वाटे गोड । देता ते लिंगाड होय मग । एकाजनार्दनी हाचि अनुभव । सुखदु:खा ठाव याचपरी ।।२५२।।

**जो कनकेबिजे भुलविला** । तो गाये नाचे उडे भला । शुद्धि नाही पा देहाची । सैरावैरा बोले वाचे । देह अभिमाने उन्मत्त । अतिकामे कामासक्त । ज्यासी विष चढले गहन । तया करविती विष्ठपान । एकाजनार्दनी वर्म । हारपे तेणे कर्माकर्म ।।२५३।।

**आता धर्माधर्म विचार** । तो ऐका सविस्तर । शुद्र पतीत गृहीचे अन्न । एकरात्र पवन जाण । व्याघ्र नख गज दंत । अपवित्र जव स्नेहयुक्त । पटतंतू स्वये पुनीत । वायूने शुद्ध

उर्णावस्त्र । गोक्षीर पवित्र कास्यपात्री । तेचि अपवित्र ताम्रपात्री । घृत पवित्र अग्नि संस्कारी । अग्नि पवित्र ब्राह्मणमंत्री । वेद पवित्र गुरुमुखे । गृहपवित्र निजात्मसुखे । पृथ्वी पवित्र जळ संस्कारी । जळ पवित्र पृथ्वीवरी । व्याघ्राजीन मृगाजिन । हे स्वाभाविक पवित्र जाण । एकाजनार्दनी निर्धार । मुख्य पवित्रता अंतर ।।२५४।।

**गंगोदक ते पवित्र** । येर कडु अपवित्र । दोन्ही उदके तव सारखी । शुद्ध अशुद्ध काय पारखी । गंगा देवापासून जाली येर काय मध्यावर्ती केली । शुद्धाशुद्ध हे वासना । शरण एकाजनार्दना ।।२५५।।

**वेदांत प्रतिपाद्दय करावा हा धर्म** । न करिता अधर्म सहज लागे । मुख्य चारी वर्ण यांचा पै धर्म । न करिता अधर्म सहज लागे । जया जे जे धर्म तयांचे ते कर्म । न करिता अधर्म सहज लागे । ब्राह्मणांचा धर्म  संध्या षटकर्म । न करिता अधर्म लागे । शरणागताचे रक्षण क्षत्रियांचा धर्म । न करिता अधर्म सहज लागे । शूद्रांचा धर्म सर्वभावे पूजन । एकाजनार्दनी तृप्ति तेणे ।।२५६।।

**फणस खाता लागे गोड** । तेथे अधिक खाय तोंड । सूर्या पूजिता पुण्य घडे । तेथे जे बेलपत्री चढे । ऐसा कर्माकर्म विनाश । गुण तेचि होती दोष । एकाजनार्दनी जाण । वाया दोषाचे हे चिन्ह ।।२५७।।

**जेणे घेतलेसे विख** । तया सर्प लाविती देख । जे केले आपुले आपण । ते भोगिता दु:ख कोण । एकाजनार्दनी कर्म । कर्मामाजी घडे वर्म ।।२५८।।

**ज्याने करणे चित्तशुद्धि** । कर्म आचरावी आधी । तरींच होय मनशुद्धी । सहज तुटती आधिव्याधि । चित्ताची स्थिरता । होय उपासने तत्वता। चित्त झालिया निश्र्चळ । सहज राहील तळमळ । एकाजनार्दनी मन । होय ब्रह्मरूप जाण ।।२५९।।

जया करणे आत्महित । स्वधर्म आचरावा सतत । कर्मे नित्य नैमित्तिक । ब्रह्मप्राप्तीलागी देख । ब्रह्मप्राप्तिलागी देव । तिचि नित्य आचरावी । चित्त शुद्धि तेणे व्हावी । एकाजनार्दनी कर्म । ईशभक्तिचे हे वर्म ।।२६०।।

**आलिया व्दिजासी द्दयावे अन्नदान** । नसता अभ्युत्थान द्दयावे त्यासी । तेणे जोडे यज्ञ सर्व धर्म जाण । विन्मुख गेलिया पतन घडतसे । एकाजनार्दनी घडता नमस्कार । तेणे हरिहर संतोषती ।।२६१।।

**देवातळीचे वस्त्र ते म्हणती अपवित्र** । उदके भिजविले ते जाले पवित्र । देवापरीस जळ सबळ केले । ज्ञान ते दुर्बळ होऊनी ठेले । नीचाचेनी स्पर्श देवो विटाळला । पाणीये प्रक्षाळूनी सोवळा केला । एकाजनार्दनी साच नाही भाव । संशयची देव नाही केला ।।२६२।।

**भजन चालिले उफराटे** । करण जाणे खरे खोटे । जवळी असता देव । भक्ता उपजला संदेह । सचेतन तुळशी तोडा । वाहाती अचेतन दगडा । वेला केली तोडातोडी । लिंगा लाखोली रोकडी । अग्नहोत्रास सुकाळ । शमी पिंपळासी काळ । तिन्ही देव पिंपळात । अग्नहोत्री केला घात । मुख बांधोनी बोकड मारा । म्हणती सोमयाग करा । चवदा गाठीचा अनंत दोरी । तो प्रत्यक्ष नेला चोरी । शालीग्राम शुद्ध शिळा । हारपलीया उपवासा सोळा । एकाजनार्दनी एक भाव । कुभाविका कैचा देव ।।२६३।।

**कर्म धर्म ऐसा आहे** । ब्रह्मी शोधुनिया पाहे । स्नान करावे ते कैसे । संध्या आपरूप असे । कैसा आहे ब्रह्मयज्ञ । मन अर्जताते नमन । एकाजनार्दनी भजे । कर्म धर्म सहज बुझे ।।२६४।।

**विचारी पा धडकुडे** । देह तंव केवळ जड मूढे । कर्म बंधन तयाकडे । केवि लागे । आत्मनी न रिघे कर्म । कर्म केवळ श्रम ।थिल्लरी जेवी सोम । चळी कापे । देह जगत्व न लगे देही । अथवा न लगे आत्म्याच्या ठायी । आता कर्म ते मिथ्या पाही । भ्रमरूप । भ्रमरूप वाढविता कर्मठपण । ठकले सज्ञान जन । एकाजनार्दनी कर्म भ्रमण । बोळवण रया ।।२६५।।

**कर्म केवळ देवाच्या माथा** । आत्मा देही असोनि विदेहता । शेखी म्हणती तत्वता । कर्मे बांधला आत्मा । आकाश जाता दळे । तै कर्मी ब्रह्म आतळे । कर्म अकर्मा नातळे । परब्रह्म रया । कर्मेची न कळे वर्म । तव केवि फळे परब्रह्म । ह्मणोनी न सोडी श्रम । साधकासी । कर्माकर्म विवंचना । न कळे पै सज्ञाना । एका शरण जनार्दना । परि तुझीच कल्पना रया ।।२६६।।

**कर्माच्या पोटी भ्रम** । की भ्रमाच्या पोटी कर्म । हे दोहीचे न कळे वर्म । जाणत्यासी । घटी उदक भरिले । तेणे घटाकाश नव्हे बोले । कर्मी ब्रह्म संचले । कर्मातीत । वाढविता कर्म भ्रम । न कळे परब्रह्म । मीमांसक धर्म । अनश्र्वर । कर्माची कर्मगती । न सोडी पुनरावृत्ती । नि:शेष कर्म निश्र्चिति । ब्रह्मप्राप्ती । निष्कर्मे लभ्यते सिद्धी । हे कृष्णे उपदशिले कृपानिधि । तरी कर्माची कर्मबुद्धि । न सोडी आत्मा । कर्माचे निजकर्म । केवळ परब्रह्म । एकाजनार्दनी मिथ्या । कर्मश्रम ।।२६७।।

**करू आता निजकर्म** । कर्मक्रिया अति दुर्गम । कर्म केवळ देहाचे माथा । आत्मा देही विदेहता । कर्म अकर्माचे साकडे । काही न घडे आत्म्याकडे । एका जनार्दनी कर्म । देहाचे देही परब्रह्म ।।२६८।।

**उदयो अस्तु मावळले भान** । कर्माकर्मी सहज समाधान । कर्म ते गेले करणे हारपले । सहजी पारुषले धर्माधर्म । उदयो अस्तुमान न देखे समाधान । अवघा जनार्दन जनी वनी । एकाजनार्दनी एकपणे कर्म । देहीच देहधर्म एकरूप ।।२६९।।

**वेदवाणी देवे केली** । येर काय चोरापासून झाली । सकळ वाचा वदवी देव । का वाढावा अहंभाव । ज्या वाणी स्तुती केली  ते ती देवासी पावली । एकाजनार्दनी मातु । वाचा वाचक जगन्नाथु ।।२७०।।

**आब्रह्म भुवन एक** । तर्पण जाहले ऐक्य । कैसा होता हे ब्रह्मयज्ञ । ब्रह्मदृष्टी ब्रह्मार्पण । सव्य अपसव्य न लगे जाण । पितरापितर जनार्दन । एकाजनार्दनी तिलोदक । ब्रह्मरूप तिन्ही लोक ।।२७१।।

**कर्म करिता फलाशा वाढे** । ते ते फल भोगणे घडे । कर्म करिता फळ बाधक । न करिता प्राप्त नरक । ऐशी कर्माची रहाटी । सदैव देखे उफराटी । एकाजनार्दनी कर्म । तेथे कैचा भवभ्रम ।।२७२।।

**कर्म करता काही न कळे विचार** । परि व्देषांव्देष संचार होता असे । राजस तामस सात्विक ते दोखा मूळ जाणा । यथाविधी कर्म घडे निश्र्चये। उणे पडता जाय पतनासी ।एकाजनार्दनी नाम मुखी गाता । सर्व कर्मे तत्वता घडती सांग ।।२७३।।

**नाना कर्माचिया लागता पाठी** । भ्रमचि जगा होय शेवटी । नोहे कर्म यथासांग । वाउगाचि मग श्रम होय । जाय तळा येत वरी । बुडक्या परि बुडतसे । एकाजनार्दनी शरण । कर्म न करू आम्ही जाण ।।२७४।।

**अधर्मे अद्दष्टाचे चिन्ह** । विपरीत वचन ते ऐका । भांडारी ठेविला कापूर उडे । समुद्रामाजी तारू बुडे । ठक येवोनी एकांती । मुलाम्याचे नाणे देती । स्वचक्र परचक्र विरोध धाडी । खणीत लावुनी तळघरे फोडी । पाणी भरे पेवा आंत । तेणे धान्य नासे समस्त । गोठणी शेळ्या रोग पडे । निमती गाईह्मशीचे वाडे । भूमीनिक्षेप करू जाती । ते आपुल्याकडे धुळी वोढिती । बुद्धि सांगे वाडोवाड । तेथोनी तोंडी घाला दगड । ऐशी कर्माची अधर्म स्थिती । एकाजनार्दनी सोशी फजिती ।।२७५।।

**संध्यावदनी प्रणव जपावा** । वाच्य वाचकु प्रणव अवघा । कैसी संघेसी साधिली संधि । देही हारपली देहबुद्धि । छन्द ऋषिमंत्र उच्चार । ती अक्षरी झाले अक्षर । जपी जपमाळा मौनी । संध्या साधिली निज समाधानी । सायंप्रात: मध्यान्हीक । तिही संधि नि:संदेह एक । काळे काळ तीन चुळा पाणी । संध्या साधिली एकाजनार्दनी ।।२७६।।

**कर्म करसी तरी कर्मठाचि हौसी** । परि निष्कर्म नेणसी कर्मामाजी । ब्रह्मालागी कर्म सांडणे हे कुडे । पाय खंडोनि पुढे चालु पाहासी । डोळ्यांची नव्हाळी घेवो जाता करतळी । पाहो जाता मुळी पाहणेची नाही । एकाजनार्दनी सर्व कर्म पाही । सांडी मांडी नाही तये ठाई ।।२७७।।

**कर्मक्रिया जेणे कळे** । तोचि कर्मी का नाकळे । काय करुनी कर्म सकळ । हरिप्राप्तीविण निर्फळ । कर्मी ब्रह्मप्रतीति नाही । तरी त्या कर्म केले काई । एकाजनार्दनी कर्म । कर्मी पाहे परब्रह्म ।।२७८।।

**कोटि जन्म आम्ही करू हरिकथा** । कर्मकांड माथा धरुनिया । ऐहिकादि कर्मे करुनी सर्वदा । भजो जी गोविंदा निरंतर । यजन याजन करुनी अग्नीहोत्र । पूजोनि पवित्र व्दिजवर । एकाजनार्दनी कर्म ब्रह्म एक । वेदांती विवेक बोलियेला ।।२७९।।

**मर्दुनी शंखासुरा हाते वागवीसी कलीवरा** । तेवी निवटोनी अहंकारा माझ्या वागविशी शरीरा । येथे नवल नव्हे पहा हो । माझा देहचि वागवी देवो । शंख वाजविशी नाना स्वरा । ते तव न वाधी शंकसुरा । तैसी चेतउनी माझी गिरा । बोली बोलविता तू खरा । कर्म कार्य कर्तव्यता । माझेनि नावे तूचि आता । एकाजनार्दनी निजात्मता । कर्म करून नित्य अकर्ता ।।२८०।।

**जाणतेपणे विधिनिषेध पोटी** । अज्ञान ते दृष्टी पळे दूर । अज्ञान बरवे अज्ञान बरवे । सज्ञान ते हावे बुडोनी जाये । अज्ञाने ज्ञान होतसे आपण । सज्ञाने मीतूपण घडतसे । एकाजनार्दनी अज्ञानाची वरा । सज्ञानाचा वारा नको मज ।।२८१।।

**आम्हा विधिनिषेधाचे नाही पै कारण** । नाम मुखी स्मरण गोविंदाचे । घडेल ते घडो जोडेल ते जोडो । आम्ही तो न सोडो रामकृष्ण । शरीर पतन घडे अनायासे । काय ते सायासे जतनेचि । एकाजनार्दनी श्रीरामावाचूनी । दुजा छंद मनी हा न वाहे ।।२८२।।

**विधिनिषेध कवणेपरी** । कार्या कारण ते परी । नाम जपता सादर । विधिनिषेध पळे दूर । व्रत करा एकादशी । कंठी मिरवा तुळशी । करा घोष हरिकथा । विधीनिषेध वंदिल माथा । एकपणे जनार्दने । एका विधिनिषेध  नेणे ।।२८३।।

**काय जाणो विधि** । निषेधाचे ते बुद्धि । आम्ही गाऊ नाम मुखे । नाचू सुखे कीर्तनी । न पडो भलतिया भरी । वाचे म्हणो हरिहरि । एकाजनार्दनी शरण । विधि निषेध गेला पुर्ण ।।२८४।।

**विधिनिषेध धरिता मनी** । सहजी कार्या होय हानी । जे जे वेळे जे जे घडे । विधिनिषेध सर्व जोडे । अन्य नाही विचारणा । कार्याकारण सर्व जाणा । एकाजनार्दनी खूण । जाणते ते परिपूर्ण ।।२८५।।

**पूजा यथासांग संपूर्ण** । न घडे तरी रातपूजन । करिता ऐसा संकल्प । तेणे जोडे महातप । ध्यानी ध्याता संतचरण । होईल मना समाधान । ऐसा पूजेचा सोहळा । एका जनार्दनी पाहे डोळा ।।२८६।।

**पूजा करू तरी पूजे नाही ठाव** । भाव धरू तरी देवाचि देव । करू तरी पूजा कवणाची सांगा । देवाविण जागा रिती कोण । एकाजनार्दनी पूजेसी नाही ठाव । अवघ्या व्यापला देवाधिदेव ।।२८७।।

**पूजेचे प्रकार असती सोळा बारा** । ते मी दातारा नेणे काही । म्हणवितो दास मनी धरुनि आस । धरलीसे कास जनार्दना । सायास संकट न करी व्रताचार । गाईन निरंतर जनार्दन । एकाजनार्दनी शरण मने वाचे । तया पूजनाचे सुख होय ।।२८८।।

**पूजा करू कैशी देवा** । वाचे आठवु केशवा । हेचि माझी पूजाविधि । सर्व टाकिली उपाधी । घालुनि निर्मळ आसन । पुजू संतांचे चरण । दृढ धरू भाव साचा । सदा छंद रामनामाचा । एकाजनार्दनी पूजा । सर्वभावे गरुडध्वजा ।।२८९।।

**देव पुजे ठेवितो भावो** । तो  स्वयेची जाला देवो । आता कैसेनी पुजू देवा । माझी मज होतसे सेवा । अन्न गंध धुप दीप । तेहि माझेची स्वरूप । एकाजनार्दनी करी पूजा । तेथे पूज्य पूजकु नाही दुजा ।।२९०।।

**पूजन तो येक पुरे** । वाचे स्मरे रामनाम । नको गंधाक्षता तुळशी । मुखी नाम अहर्निशी । धुप दीप नैवेद्दय तांबुल । सदा वाचे राम बोल । आर्ती धुपार्ती अक्षता । राम गाऊ नि:सीमता । एकाजनार्दनी शरण । सहज पूजा घडे जाण ।।२९१।।

**सहजची पूजा पुरे** । श्रम वाउगाची उरे । आठवीन वेळोवेळा । केशव माधव गोपाळा । मंत्रस्नान विभुती । मुखी राम जपविती । नाही आणिक काम । वाचे म्हणे रामनाम । एकाजनार्दनी बरवी । पूजा करीन देवदेवी ।।२९२।।

**देवांचे पूजन** । घडता रामस्मरण । हेचि एक पूजा सार । वाया कासया पसर । करू वैसे देव पूजे । मनी भाव आन दुजे । ऐसे पूजन लक्षण । सांगे एकाजनार्दन ।।२९३।।

**बरवी ती पुजा** । जेणे पावे अधोक्षजा । मुखी नाम वाहे टाळी । पूजा केली उत्तम हे । तुळशी माळा गोपीचंद । पूजा छंद हाची मनी । व्रत करी एकादशी । जा]ग्रण निशी सर्वदा । एकाजनार्दनी तुष्टे देव । पूजा भाव तेणे पावे ।।२९४।।

**देवपूजा करी आदरे** । अतीत आलीया न बोले सामोरे । कासया पूजन दांभीक । तेणे देवा नोहे सुख । अतितासी येणे पूजा । तेणे संतोष पावे पूजा । एकाजनार्दनी पूजा । तेणे संतोषे पावे पूजा । ऐसी न करी गरुडध्वज ।।२९५।।

**डोळीयाने रूप पाहावे साचार** । मुखाने उच्चार रामनाम । हृदयी आठव नाम ते वसावे । कारे पै अर्चाचे संतचरण । पडे प्रदक्षणा करा तीर्थाटण । हेची पै कारण पूजनाचे । एकाजनार्दनी ऐसी करी पूजा । तेणे गुरुराज तोष पावे ।।२९६।।

**जीव शिव दोन्ही एकचि आसनी** । पूजी अवसानी सर्वकाळ । कामक्रोध यांचा मानुनि विटाळ । पूजन सर्वकाळ बरे होय । परद्रव्य परस्त्री येथे आसक्त नोहे मन । तेणे जनार्दन पूजा पावे । एकाजनार्दनी ममता टाकुनी । संतांचे चरणी पूजन करी ।।२९७।।

**आपुली पूजा आपण करावी** । ही जव ठावी राहाटी नाही । कासवा ती पूजा जाणिवेचा शीण । त्याहुनी अज्ञान बरा दिसे । एकाजनार्दनी ज्ञानाज्ञाने । पूजावे श्रीचरण विठोबाचे ।।२९८।।

**नाना ते चरित्र श्रीहरीचे वाचे** । आठवावे साचे अघहरणा । केशव माधव अच्युत गोपाळ । गोविंद गोकूळपाळ वाचे वदा। वामन श्रीरामकृष्णाते आठवा । हृदयी साठवा वेळोवेळा । एकाजनार्दनी ऐसा जया हेत । तो वसे जगांत जगरूप ।।२९९।।

**हृदयीच स्थान हृदयीच ध्यान** । हृदयीच भजन सर्वकाळ । हृदयीच दान हृदयीच धर्म । हृदयीच नेम सर्व जोडे । हृदयीच कथा पुराण श्रवण । हृदयीच चिंतन सर्व सदा । हृदयीच दिसे एकाजनार्दनी । हृदयीच एकपणी बिंबलासे ।।३००।।

**हृदयीच देव हृदयीच भक्त** । हृदयीच होत पूजा सर्व । हृदयी ते भुक्ती हृदयी ते मुक्ति । हृदयी सर्वस्थिति देव जाणो । एकाजनार्दनी हृदयीच पाहाल । ते सुख घ्याल हृदयामाजी ।।३०१।।

**हृदयस्थ जया नाही ठावा देव** । पूजा करती वाव सर्वभावे । जाणावा अंतरी मानावा हृदयी । पाहावा सर्वातरी परमात्मा । एकाजनार्दनी व्यापक सर्वा ठायी । भरुनी उरला ठाई जेथे तेथे ।।३०२।।

**देवासी तो पुरे एक  प्रेमभाव** । पूजा अर्चा वाव सर्व जाणा । मनापासूनिया करिता कीर्तन । आनंदे नर्तन गाता गीत । रामकृष्णहरि उच्चार सर्वदा । कळिकाळ बाधा तेणे नोहे । एकाजनार्दनी हाची पै विश्र्वास । सर्वभावे दास होईन त्याचा ।।३०३।।

**सप्रेमे करिता भजन** । तेणे घटती कोटी यज्ञ । प्रेम सार प्रेम प्रेमसार । वाया भार कुंथेचा । प्रेमेविण न भेटे देवो । अवघा वावो पसारा । एकाजनार्दनी प्रेम सार । तुटे वेरझार येणे जाणे ।।३०४।।

**ब्रह्माडाची दोरी** । हालवी जो एक्याकरी । भूता परस्परे मैत्री । ती एके ठाई असती वरी । पंचप्राणाचे जे स्थान । तये कमळी अधिष्ठान । एकाजनार्दनी सूत्रधारी । बाहुली नाचवी नानापरी ।।३०५।।

**मिथ्या मायेच्या धाकासाठी** । योगी रिगाले कपाटी । आसन घालूनिया जाण। आकळिती पंचप्राण । क्षुधेने खादली भूक । तृषा ताहान प्याली देख । बुद्धि सुबुद्धि धरुनि हाती । आकळितसे इंद्रिय वृत्ती । शांतीचेनि बळे । संकल्प त्यागिले सकळ। ऐशी योगाची काहाणी । शरण एकाजनार्दनी ।।३०६।।

**प्राणापानाची मिळणी** । शक्ति चेतवी कुंडलिनी । ती आधार शक्ति अचाट । चढे पश्र्चिमेचा घाट । कुंडलिनी चालता वाटा । चुकल्या आधिव्याधीच्या हाटा । साधिता उल्हाट शक्ति उलटे । उघडले ब्रह्मरंध्रीचे कपाट। शरीराकारे ते वोतिली । एकाजनार्दनी पुतळी ।।३०७।।

**समुद्र क्षोभे वेळोवेळी** । योगिया क्षोभेना कोण्हाकाळी । समुद्रा भरिते पर्वसंबंधे । योगी परिपूर्ण परमानंदे । समुद्रा सर्वदा तो क्षार । तैसे नव्हे योगीश्र्वर । समुद्री वरुषता धन । जीवनी मिळतसे जीवन । योगीयांची योगस्थिति । सदा परमार्थ भक्ती । एकाजनार्दनी शरण । योगीयांचे जे योग चिन्ह ।।३०८।।

**सर्प बिळामाजी रिगे** । हे तो देखती सवेगे । तैसा योगियांचा योग । सर्पावरी भूमी व्यंग । दाविता आचारु । हातताती लहानथोरु । म्हणती एक कर्मठ । येक म्हणती योगभ्रष्ट । एक निंदिती वंदिती । ऐशी आहे योगस्थिति । यापरीस उत्तम साधन । एकाजनार्दनी शरण ।।३०९।।

**प्राण रक्षणापुरते** । योगी भागती भिक्षेते । तैसा साधावा हा योग । जेणे साधे अंतरंग । रिघोनी कमळिणीपाशी । भ्रमर लोघे आमोदासी । कोरडे काष्ठ भेदूनि जाय । तो कमळदळी । गुंतोनी राहे । एकाजनार्दनी योग । ऐसा साधावा अनुराग ।।३१०।।

**चार मुद्रा आणि समाधी त्या चारी** । दिसती चकाकारी स्वरूप हे । चहू समाधीचे पाही हे देखणे । विकळता तेणे सहजी व्हावी । जिकडे स्वरूपचि दिसे । तया माजी ठसे आणिक बिंब । मसूरप्रमाण शून्य महा ते कारण । गुरुमुखे खूण जाणावी पै । साचार स्वरुपाची मेळवणी केली । परात्पर ठेली हेची ज्योती । त्याच वस्तुसाठी भांडती पुराणे । वेदशास्त्र तेथे मोनावली । गुह्य हे पंचक देखोनी समाधी । बोलोनिया वेदी निश्र्चयो केला । एकाजनार्दनी स्वरूप उरले पाही । व्दैत गेले पायी सदगुरूच्या ।।३११।।

**कैसे झाले देवदर्शन** । देवा पहाता आहे कोण । डोळा उघडोनिया पाहे । पैल देव दिसताहे । पैल देव तो मी भक्त । दोहीसी कोण आहे देखत । एकाजनार्दनी पाहे । पहाणे पहाता देवचि आहे ।।३१२।।

**दुबार बाहुली वस्तरूप झाली** । पहाता सोहं मेळी चिदानंद । अर्धमात्रा स्थान नयनीच प्रमाण । मसुरेसमान हा वर्ण जेथे । सुषुन्मा कुंडलिनी कासीया सांगातिनी । निश्र्चिती ते नयनी बिंदुरूप । एकाजनार्दनी पाहे डोळिया भितरी । सबाह्य अभ्यंतरी तरीच दिसे ।।३१३।।

**स्वहिताकारणे विचार न कळे** । संध्येचे हे मूळ आम्ही जाणो । अर्ध बिंबी सूर्य धरू मध्यांन्धासी । अस्तु जाता त्यासी अर्ध्य देतो । नासिकेचे अग्र सुषुन्मा विदान । करी प्राणायाम वेगळाचि । साही चक्र जप वर्णदळी संकल्प । पूजा तर्पण युक्त मंत्र सहज । त्रिपुटीपासुनी डोळिया वंदन । रक्त श्र्वेत गुण पीत भासे । अर्धाकी पाहे अणुरेणू सरी गगन शून्याकारी विखुरले । विराजली संध्या बैसली जे बाळा । चन्द्र सूर्य कळा लाजविल्या । हृदयापासोनि नाभिचा नेट । मनी बळकट पुष्टी व्हावी । मूळ बंधापासूनि दिधली आटणी । हृदयी कुंडलिनी सिद्ध रांघ । दाही दिशा करी प्रदाषिणा वेडा । गगनी बीज सडा भाजविले । एकाजनार्दनी रांध्या हेचि रीति । सहस्त्रदळी ज्योति निजबिंदु ।।३१४।।

**विधियुक्त नोहे संध्यास्नान** । तेणे घडे पतन कल्पकोटी । रेचक पूरक कुंभक त्रहाटक । प्राणयाम देख न साधेची । मूळ मंत्र न्यारा विधि वीज । न घडता सहज दोष लागे । हृदय कवच शिखा शिरी । नेत्र अस्त्रादीक फटकारीन साचे । एकाजनार्दनी यातायाती । पुढे फजिती जन्मोजन्मी ।।३१५।।

**निर्लज्ज होऊनी नाचे महाव्दारी** । वाचे वदे हरी सर्वकाळ । व्रत करी सदा नामाचे पारणे । अखंड ते पेणे रामकृष्ण । पंढरीची वारी धडे सर्वकाळ । कीर्तन कल्लोळ मुखी सदा । एकाजनार्दनी भजनी सादर । सर्व वेरझार खुंटे त्याची ।।३१६।।

# जनास उपदेश

**नशिवंत देह जाणार जाणार** । हा तो निराधार स्वप्नवत । अभ्रीची छाया क्षणीक साचार । तैसा हा प्रकार नशिवंत । मृगजळाचे जीवन क्षणीक निर्धार । तैसा हा विचार व्यर्थ सर्व । एकाजनार्दनी नशिवंतासाठी । केवढी आटाआटी प्राणी करती ।।३१७।।

**मिथ्या भूतकाया मिथ्या भूतमाया** । मिथ्या भूत छाया जेवी वसे । मिथ्याभूत देह नशिवंत जाण । मिथ्याभूत भान सर्व दिसे । मिथ्या भूत जन मिथ्या भूत धन । एकाजनार्दनी शरण वेगी ।।३१८।।

**नशिवंत धन नाशिवंत मान** । नाशिवंत जाण काया सर्व । नशिवंत देह नशिवंत संसार । नशिवंत विचार न करती । नशिवंत बळे गळा पडती । एकाजनार्दनी सर्व नाशिवंत । एकचि शाश्र्वत हरीनाम ।।३१९।।

**रडती रांडापोरे नशिवंतासाठी** । केवढी आटाआटी जीवी होसी । कुडीसी मरण न कळेची जाण । आत्मा अविनाश परिपूर्ण स्वयंज्योती । एकाजनार्दनी नाथिलाचि भारा । विठ्ठलनामे सौरस न घे कोणी ।।३२०।।

**भांबावले जन ह्मणती माझे माझे** । वाउगेची वोझे वहाताती । खराचिये परी उकरडा रोविती । नोहे तया गती अधम जाणा । स्तंभ असोनिया चोर ह्मणती आला । नसोनी प्रपंच खरा भासिला । मृगजळवत जाणार सर्व । अभ्रिचे रावेव वाया जैसे । एकाजनार्दनी घरी कारे सोय । पुनरपि नये गर्भवास ।।३२१।।

**पाचाजणांचे आणिले जायाचे** । मिरवण तयाचे कोण सुख । नवल विस्मयो कैसा । देखत देखत झांसा । मृगजळाची आशा । केवी लाहे । आता नेती मग नेती । ज्याचे ते घेउनी

जाती । मूढ जन ह्मणती । माझे माझे । स्वप्नीचे निज भोज । कोल्हार मंडपीचे चोज । गंधर्व नगरी राज्य । केवी घडे । ऐसे जाणोनी अरे जना । भुललासी अज्ञाना । मी माझी कल्पना । करसी वाया । एकाजनार्दनी हरी । व्यापक तो चराचरी । तोची एक निर्धारी । वाउगे येर ।।३२२।।

**फुल झडे तव फळ सोसे** । तया पाठी तेही नासे । एका मागे एक पुढे । मरण विसरले बापुडे । शेजारी निमाले कोणाचे खांदी । लपो गेला सापे खादली मांदी । मरण एकता परता पळे । पळे तोही मसणी जळे । प्रेत देखोनी वोझाच्या जाती । वोझे ह्मणती तेही मरती । मरण ह्मणता थू थू ह्मणती । थुंकते तोंडे मसणी जळती । पळेना चळे तोचि सापडे । जाणता जाणता होताती वेडे । एकाजनार्दनी शरण । काळ वेळ तेथे न रिगे मरण ।।३२३।।

**गर्भवासीचे दु:ख सांगता आटक** । मळमूत्र दाथरी जननी जठरी अधोमुख । शिव शिव जननी जठरी अधोमुख । शिव शिव सोऽहं सोऽहं सांडूनी पाहे निज जीवन । गर्भवासीचे साकडे सांगावे कणवा पुढे । सर्वांगी विष्ठालेपु नाकी तोंडी किडे । एकाजनार्दनी भेटी तै जन्ममरणा तुटी । जननी पयपान पुढती न करणे गोष्टी ।।३२४।।

**उगम संगम प्रवाह गती** । ऐशी त्रिविध देहस्थिति । वाळत्व तारुण्य वृद्धत्व । ऐसे देहाचे त्रिविधत्व । जरा मरण नाश पावे । ऐसा देह व्यर्थ जाये । ऐसियाचा भरवसा । एकाजनार्दनी ठसा ।।३२५।।

**कामक्रोधलोभ दंभ मद मत्सर** । षडवैरी तप्तर हेचि येथे । क्षुधा तृषा मोह शोक जरामरण । षडुर्मी पूर्ण देही हेचि । आशा मनिशा कल्पना इच्छा तृष्णा वासना । हे अठरा गुण जाणा देहामाजीं । एकाजनार्दनी त्यजोनि अठरा । तोचि संसारामाजी शुद्ध ।।३२६।।

**आशेपायी काम आशेपायी क्रोध** । आशेपायी भेद लागलासे । आशेपाशी कर्म आशेपाशी धर्म । आशेपाशी नेम नानात्वाचा । आशेपाशी याति आशेपाशी जाती । आशेपाशी वस्ती अहंकाराची । एकाजनार्दनी निराशी तो धन्य । ज्यासी नारायण सांभाळीता ।।३२७।।

**त्रिगुणात्मक देह पंचभूती खेळ** । शेवटी निर्फल होईल रया । दिसती भूताकृति वाउगा ते मिथ्या । शेवटी तत्वता काही नुरे । पंचभूते विरती ठायीचे ठायी । वाया देहादेही बद्धमुक्त । एकाजनार्दनी नाथिलाची खेळ । अवघा मायाजाळ जाईल लया ।।३२८।।

**एक एक योनी कोटी कोटी फेरा** । नरदेहा थारा अवचटा । मांडिलासे खेळ मांडिलासे खेळ नरदेही । स्त्री पुत्र नातु बाहुले असती । नाचवितो पती त्रैलोक्याचा । एकाजनार्दनी मांडियेला खेळ । त्रैलोक्य सकळ बाहुले त्याचे ।।३२९।।

**चौऱ्यायशी लक्ष योनी फिरता** । अवचट नरदेह आला हाता । करी याचे समाधान । वाचे गाई नारायण सोडविता तुज कोणी । नाही नाही त्रिभुवनी । भुलू नको जाशी वाया । एकाजनार्दनी लागे पाया ।।३३०।।

**कोटी कोटी फेरे घेउनी आलासी** । अद्यापि पडसी गर्ते रया । कोण तुज सोडी कोण तुज सोडी । पडेल जेव्हा वेडी पायी रया । हाणिती मारिती निष्ठुर ते दूत । विचकूनिया दात पडसी रया । एकाजनार्दनी मागील आठव । काही तरी भेद धरी रया ।।३३१।।

**ऐसे येरझारी कोटी कोटी फेरा** । परि त्या पामरा समजेना । माझे माझे म्हणोनि झोंबतसे बळे । केलेसे वाटोळे नरदेहा । फजितीचा जन्म मरावे जन्मावे । हे किती सांगावे मूढ जना । एकाजनार्दनी माझे माझे टाकुनी । वैष्णव कीर्तनी नाचे सुखे ।।३३२।।

**हितकरणे तुम्हा सांगतसे गुज** । काही तरी लाज धरा आता । अवचट नरदेह पावले निधान । काही सोडवण करी बापा । पूर्व सुकृताचे फळ ते पदरी । म्हणोनि हा देह निर्धारी प्राप्त तुज । एका जनार्दनी वाया जातो काळ । काही तरी गोपाळ आठव वेगे ।।३३३।।

**किती किती जन्म किती किती फेरे** । किती किती अधोरे भोगिताती । न सुटे न सुटे न सुटे बंधन । याची आठवण धरा चित्ती । किती किती विषय भोगिती वासना । यमाचे सदना जावयासी । एकाजनार्दनी न धरी विचार । नरक तो अघोर भोगिताती ।।३३४।।

**इकडूनी तिकडे चालू जैसे माप** । तैशी जन्ममरण खेप प्राणियांसी । भोगिता नूतन सांडिती जे जाण । तैसे जन्ममरण प्राणियांसी । पुरुषाचा परिमळ घेउनी सांडिती जाण । तैसे जन्ममरण प्राणियांसी । देह धरुनी आला न करी स्वहित । करी अपघात आपणासी । एकाजनार्दनी दोषी तोचि जाणा । न भजे चरणा संतांचिया ।।३३५।।

**मरणापाठी जन्म जन्मापाठी मरण** । ही शिदोरी जाण बांधली पदरी । शतवर्ष कऊल घेता वाटे गोड । कर्माकर्म सुघड न कळे काही । मरणाची भ्रांती विसरुनी मूढ । वागवी काबाड प्रपंचाचे । बाळ तरुणदशा वृद्धाप्य पावला । सर्वेचि तो गेला अधोगती । एकाजनार्दनी मापाचिये परी । सर्वेची गोणी भरी सर्वे रिती ।।३३६।।

**माझे माझे म्हणोनी करितोसी कष्ट** । उडाला तो हंस राहिले फलकट । तनांचे बुजविणे तैसी देहस्थिती । चिता अग्नि उजळोनि मिळे मातीसि माती । स्वजन स्वगोत्र सारे करती विचार । काढा काढा ह्मणती जाला भूमीभार । देहाची जनके केवळ मातापिता । गेला गेला ह्मणती तोचि देह असता । अष्टही प्रहर भोगी देह गेह वित्त । सेजेची भार्या पळे ह्मणे भूतभूत । यापरी जाणोनी सांडी देहाची खंती । एकाजनार्दनी राहिला विदेह स्थिती ।।३३७।।

**आयुष्य भविष्य हे तव कवणा हाती** । वायाची वहाती कुंथाकुंथी । आयुष्याचा अंत आलिया जवळी । कोण तया वेळी सांभाळीत । गुंतुनी संसारी पडती आघोरी । न चुकेची फेरी येता जाता । एकाजनार्दनी संत कृपेविण । कोणवारी शीण जन्ममृत्यु ।।३३८।।

**गत ते आयुष्य गत ते धन** । गत द्वश्यमान पदार्थ तो । गत ते अंबर गत तो पवन । गत ते हवन गत होय । एका जनार्दनी अगत ते नाम । ह्मणोनी विश्राम योगियांसी ।।३३९।।

**जे जे दिसे ते ते नासे** । अवघे वोसे जायाचे । नाशिवंत सर्व काया । भेणे उपाया करा काही । पदार्थ मात्र जात असे । काही नसे आनु दुजे । एकाजनार्दनी सर्व वाव । धरा भाव विठ्ठली ।।३४०।।

**नरदेही आयुष्य शत ते प्रमाण** । अर्धरात्र जाण जाय मध्ये । बाळत्व तारुण्य जरामय जाणा । संपले गणना होती त्याची । एकाजनार्दनी राहिले भजन । सवेचि मरण पावला वेगी ।।३४१।।

**शत रुपयांची घेउनी आला चिठ्ठी** । अर्ध रात्री खादले उठाउठी । केव्हा जपशील रामनाम वाचे । आयुष्य सरलियां पडशील यमफासे । अज्ञानत्व गेले वरुषे बारा । खेळतसे विटीदांडु भोवरा । उपरी तारुण्य मदाचा ताठा । करी वैसोनी विषयाच्या चेष्टा । ऐशी पन्नास वर्षे भरोवरी । एकाजनार्दनी पडला चौऱ्यायशीचे फेरी ।।३४२।।

**शत वर्षाचा कउल घेउनी** । आलासी योनी नरदेहा । गर्भ जठरी सोहं सोहं । जन्मताची ह्मणसी कोहं । ऐसा ठकडा पापिष्ठ । पुढे करिशी विषय चेष्टा । बाळ तारुण्य गेले । पुढे वृद्धाप्य वयही आले । नाही घडले कीर्तन । तो पुढे आले मरण । घेउनी जाती यमदुत । कुंभपाकी तुज घालीत । नाना यातना ते करती । अग्नीस्तंभा भेटविती । तेथे कोण सोडी तुज । आता ह्मणसी माझे माझे । ऐसा भुलला गव्हार । भोगी चौऱ्यायशीचा फेर । फेरे फिरुनी नरदेही आला । एका जनार्दनी वाया गेला ।।३४३।।

**येती नरदेहा गमाविती आयुष्य** । प्रथम बाळदशेस भोगिताती । वाचा नाही तया रडे आक्रंदोनी । जननी तो स्तनी लावी बळे । क्षुधा लागलीया औषध पाजिती । उदर देखता देती स्तन बळे । संपता व्दादश जालासे शहाणा । करुनी अंगना वेगी देती । विषयाचे बळे मातलासे सर्प । सदा धूस धूस दर्प अंगी वसे । सरलीया तारुण्य आला वृक्ष दशे । भोगितसे क्लेश नाना व्याधी । रामनाम वाचे सदा आठवणी नाही । धन दारापुत्र पाही माझे माझे । शेवटील घडी परिपूर्ण भरली । मति जड झाली पापिष्टाची । येउनी यमदूत नेताती बांधून । नानापरी ताडन करिताती । यातना ती सर्व भोगुनी ढकलिती । पुनरपि येती गर्भवासा । चौऱ्यायशी लक्ष योनी फिरता फिरता । एकाजनार्दनी तत्वता नरदेह ।।३४४।।

**जव देहाते देखती तव माझे म्हणती** । निमालीया रांडापोरे रडती । पहा कैसा अनुभव लौकिकाचा । देह निमाला की न कळे साचा । जीव आत्मा न मरे कोणे काळी । निमाला देह चतुष्टयाची होळी । एकाजनार्दनी देहा देखती मरण । गेला आला नाही तो तैसाचि जाण ।।३४५।।

**निमालिया देहासाठी** । रांडापोरे हाणती होटी । तयासाठी न रडती । आपुले म्हणती कैसे होती । ऐसे भुलले पामर । नरक भोगिती अघोर । एका शरण जनार्दनी । राम नाम न घेती कोण्ही ।।३४६।।

**मी मी म्हणता वाया गेले सर्व** । पाहे तू अपूर्व नवल बापा । रावण नासला मी पणे गेला । रामे क्षय केला पुत्रपौत्री । मीपणे दुर्योधन बहुत गर्वीत । नासले जीवित रणांगणी । ऐसे ते मीपणे नासले । एकाजनार्दनी भले मीपण रहित ।।३४७।।

**आहारे पामरा मीपण फुगारा** । व्यर्थ कारे भारा वागविसी । शस्त्राचेनि रोम वक नोहे अंगा । तया सहस्त्र भगा जाहले देखा । विष अग्नीचेनी मेळे । तया काही न पोळे । एकाजनार्दनी मन । देवापाशी केले अर्पण ।।३४८।।

**मी म्हणोनिया भार वाहे** । वाउगा जाय कुंथत । रात्रदिवस जैसा खर । वोझे अपार वहातुसे । नावडे भजन पूजन कथा । संसाराची वाहे चिंता । आला आयुष्याचा काळ । परि न राहे तळमळ । आपण मरुनी आणिका मारी । ऐसा नष्ट दुराचारी । एकाजनार्दनी नाही भाव । तेथे न भेटचि देव ।।३४९।।

**म्हणती नरदेह पावन** । परी अत्यंत निंद्दय जाण । जव जन्मलेचि नाही । तंव मरण लागले पाही । देही देहासहसा । नित्य मृत्यु लागला सरिसा । एकाजनार्दनी शरण । तै चुके जन्ममरण ।।३५०।।

**मनुष्य देही व्हावे ब्रह्मज्ञान** । घेतो पुढिले आमंत्रण । पुढे जन्माचा विसार । घेतो अतिमाने तो पामर । चौऱ्यायशी लक्ष योनीप्रती । कोटी कोटी फेरे होती । ऐसा मनुष्य देह पावन । तो वेची विषयाकारण । होता विषयी वासना । नाठवीची एकाजनार्दना ।।३५१।।

**नाशिवंत देह नाशिवंत माया** । नाशिवंत काया काय काज । यमाचा पाहुणा जाणार जाणार । काय उपचार करुनी वाया । छायेसी बैसला सर्वेची तो गेला । वृक्ष रडू लागला गेला म्हणोनी । पांथस्य मार्गस्थ येउनी राहिला । उदय होता निघाला आपुल्या मार्गे । तो घरधनी रडत धावे मागे । काय काज वेगे सांगा तुम्ही । उसने आणिता सुख वाटे जीवा । देता दु:ख जीवा काय काज । पाहुणा हा देह जाईल टाकुनी एकाजनार्दनी काय दु;ख ।।२५२।।

**हे शरीर नाशिवंत साचे** । जयाचे हो जायाचे अंतकाळी । काय याचे सुख मानिती हे जन । पडिलेसे जाण मायाचक्री । संसाराचा या  करिती विचार । भुलले पामर अधोगती । एकाजनार्दनी पायाची भ्रमती । पुढे ती फजिती नेणवेचि ।।२५३।।

**नाशिवंत देह नाशिवंत माया** । नाशिवंत छाया वाया जैसी । मृगजळाचे परी नाशिवंत धन । यासी भुलून गुंतलासी । व्यापारी बाजारी घातिले दुकान । स्त्री पुत्र स्वजन तैसे बापा । एकाजनार्दनी ऐशियाच्या छंदा । भुलोनी गोविंदा विसरती ।।२५४।।

**क्षणभंगुर देह** । याचा मानिती संदेह । उदकावरील तरंग । तैसे दिसे सर्व जग । पाहता मृगजळा । जळ नोहेची निर्मळा । साउली अभ्राची । वाया जाय जैशी । करिता लवण पुतळा । विरे जैसा मिळता जळा । एकाजनार्दनी तैसे । दिसता देह नासे जैसे ।।२५५।।

**असत्याचे मूळ नरदेह साचे** । वाया काय याचे कवतूक । हरिनाम सारे सेवी तू निर्धारे । आणीक पसार शीण वाया । एकाजनार्दनी मृगजळ वोखटे । दिसे ते गोमटे तृपा न हारे ।।२५६।।

**जाणता जाणता कारे वेडा होसी** । नाथिल्याच्या पिसी हाव भरी । दोन दिवसांचे उसणे व्यापारी । काय त्यांची थोरी मानितोसी । दिवसाची छाया पूर्व पश्चिमेसी । तैसा या देहाची स्थिती जाणा । एकाजनार्दनी हरिकृपेवीण । दावील ही खूण कोण बापा ।।२५७।।

**देहीच्या अवसाना** । कोणी कामा नये कोण्हा । हे तो मिळाले अपार । अवघा मायेचा बाजार । तुजसाठी शोक कोण्ही न करतीच दु:ख । रडती पडती । पुढे कैसे होईल ह्मणती । आपुलीया हिता । रडती जना देखता । याचे मानू नको खरे । एकाजनार्दनी त्वरे ।।२५८।।

**नका करू वाद विवाद पसारा** । वाउगा मातेरा नरदेही । आयुष्याचे अंती कामा नये कामा । नेती ढकलुनी एकलेचि । स्वजन स्वगोत्र नये कोणी कामा । सांडी त्यांचा प्रेमा परता होई । एकाजनार्दनी मधाचीये मासी । तैसा सापडसी यमफाशी कोण सोडी ।।२५९।।

**कारे भांबावासी नास्तिकासाठी** । कोरडी कां आटी करसी वाया । हे तो पोसणे आणिके उसणे । जयाचे तया देणे अनायासे । घ्यावे त्याचे द्दयावे ऐशी आहे नीत । तू रे दुषित वाउगा मनी । न देता तरी देणे आहे केव्हा । वाउगा तो हेवा धरती पोटी । एकाजनार्दनी भरता मापोडी । पडतसे उडी खाली मग ।।३६०।।

**अस्थिमासाचा हा कोथळा** । ऐसा देह अमंगळा । प्राणी ह्मणती माझे माझे । खर जैसे वाहे वोझे । न कंटाळे कधी मन । जेवी भुले सर्प जाण । एकाजनार्दनी देवा । याचा विसर पडावा ।।३६१।।

**मिळती सख्या माया बहिणी** । हाती घेउनी तेलफणी । जच आहे शरीर चांग । तव काढीताती चंग भांग । नासलिया शरीराते । टाकीताती तया परते । पहा देही देव असता । नाही ह्मणती सर्वथा । एकाजनार्दनी पंचत्व । मग ह्मणती भूतभूत ।।३६२।।

**देहीचे आयुष्य पूर्ण ते भरले** । मग नाही उरले मागील काही । देही देह आहे तोवरी अहंता । निमालीया तत्वता वाव सर्व । देही देहपण मी मी माझे ह्मणे । मिथ्या सर्व जाण देहाअंती । एकाजनार्दनी मिथ्या देह आहे । रामनाम वाहे सबराभरीत ।।३६३।।

**ह्मणती नरदेह पावन** । परी अत्यंत निद्दय जाण । योनीव्दारे ज्याचे जनन । सर्वेची मरण लागलेसे । जव जन्मलेचि नाही । तव ते मरण लागलेसे पाही । गर्भाच्याही ठायी भेवो । मरण भावो न चुकेची । एकाजनार्दनी नाही मरण । तेथे नाही जनन येणे जाणे ।।३६४।।

**स्वप्नामाजी बंधन** । जागृती पाहता लटिके स्वप्न । ऐशी जाणा देहस्थिती । जागृती स्वप्न ते भास चित्ती । जागृती धरिता भाष । स्वप्नी दिसे तो प्रकाश । जागृती स्वप्न दोन्ही पाही । एकाजनार्दनी पायी ।।३६५।।

**स्वप्नामाजी अनिरुद्धे देखिलीसे उखा** । तयालागी घेउनी गेली चित्ररेखा । तया सोडविण्या हरि । धांव घेतसे झडकरी । पाहे स्वनाचेनी कांते । अनिरुद्धा केलेसे निरुते । स्वप्नेची देखे सारा । एकाजनार्दनी पसारा ।।३६६।।

**आत्मा तो देही नाशिवंत नाही** । अशाश्र्वत पाही कलेवर । समजोनी उमजोनि झाकिती डोळे । बळेची अंधळे होती मूर्ख । मरणाचे हावे एकमेका बोलती । गेला गेला ह्मणती असोनी जवळी । एकाजनार्दनी ऐसे ते अंध । भुलले मतिमंद भ्रांतियोगे ।।३६७।।

**उलट भावना पालट मनाची** । कायावाचा देहाची स्थिती एक । होणार ते होय देहाचे पतन । तेथे कोणा कमीपण येते जाते । आणिके जयाचे ते देणेचि आहे । सोस वाउगा वाहे काय फळ । एकाजनार्दनी वाउगा पसार । व्यर्थ हावभर प्राणी जाहले ।।३६८।।

**धरिसी देहाची तु आशा** । तेणे फासा पडशील । सोडविता नाही कोण्ही । पाहे विचारूनि मनामाजी । येती तैसे सर्वचि जाती । व्यर्थ कुंथती माझे माझे । एकाजनार्दनी पैलपार । तरसी निर्धार विठ्ठलनामे ।।३६९।।

**वायाची आयुष्य जातसे खरे** । उपाय तो बरे हरी एक । अवघा वेळ अवघा काळ । नका पोकळ घालवू । जे जे घडी जे जे वेळी । करा कल्लोळी हरिकथा । शरण एकाजनार्दनी । भजा अनुदिनी संतासी ।।३७०।।

**देहाची ममता नाधरी साचार** । करी कारे विचार पैलथडी । भरिला भरीला सागर भरिला । उतरी कारे वहिला संतसंगे । नामाची सांगडी बांधीत निर्धारे । तेणे पैलपार तरसी देखा । सांगड नामाची धरी प्रेमभावे ।  संता शरण जावे एकविधा । एकाजनार्दनी शरण गेलिया । कळिकाळ पाया वंदी यम ।।३७१।।

**नरदेही आयुष्य गमाविले सारे** । परी रामभजन खरे केले नाही । ऐसे जे अभागी पावती पतनी । तया सोडवणी कोण करी । एकाजनार्दनी मानी हा विचार । राम चराचर जप करी ।।३७२।।

**प्रपंची गुंतती** । बळे माझे माझे ह्मणती । ऐसे अभागी ते खर । नेणे विचार सारासार । चिखली रुतती । आणिकाते धावा हमणती । बळे कृशान पदरी । बांधिताती दुराचारी । कुंथाकुंथी बळे । यम मारीतसे सळे । शरण जनार्दना । कोण्हा नोहेचि वासना । जनार्दनाचा एका । बोल बोलतसे देखा ।।३७३।।

**प्रपंचाचा भार वाहातसे खर** । न कळे विचार साधनाचा । गुतंलासे मीन गळाचिये परी । आमिष देखोनी वरी गिळीतसे । टाळी लाऊनिया बैसला सेवक । तैसाचि तो देख नामहीन । आवडे आदरे न ये नाममुखी । एकाजनार्दनी सुखी केवी होय ।।३७४।।

**न कळेची मूढा सुखाची ती गोडी** । पायी पडली बेडी प्रपंचाची । पान लागलिया गुळ न ह्मणे गोड । तैसे ते मूढ विसरले नाम । शुद्ध वैराग्याचा मानिती कंटाळा । पाळिती अमंगळा प्रपंचासी । एकाजनार्दनी नाही भाव खरा । तया त्या पामरा सांगुनी काय ।।३७५।।

**भासतसे दोर विखाराचे परी** । तैसीच हे थोरी प्रपंचाची । भुलले भुलले प्रपंची गुंतले । वायाची उगले बोल का हे । श्र्वानाचियापरी मागे पुढे पाहे । माझा म्हणोनी बाह्या कवटाळिती । एकाजनार्दनी अवकाळी मेघ । तैसा प्रपंची दंभ लटिकाची ।।३७६।।

**प्रपंच आमिष गुंतशील गळी** । शेवटी तळमळी होईल रया । स्त्रीपुत्र धन हे केवळ जाळे । गुंतशील बळे यात रया । पुढील विचार धरी काही सोय । संतसंग लाहे अरे मूढा । एकाजनार्दनी सत्सगावाचुनी । कोण निर्वाणी तारील तुज ।।३७७।।

**बाळ तरुण वृद्ध ऐसे ते पाहिले** । पाहुनी निमाले देखसी रया । प्रपंच काबाड कोंबड्याचे परी । पुढेचि उकरी लाभ नाही । तुज सुख दु:ख मागील आठव । आता भाकी कीव काही रया । एकाजनार्दनी अहा रांडलेका । भोगिसी अनेका योनी रया ।।३७८।।

**जाणते नेणते दोघेही गुंतती** । वाया कुंथाकुंथी करिती रया । प्रपंच व्यसन न सुटे पामरा । करती येरझारा न चुके रया । वोढाळ सापडता बांधिती दावणी । कोण करूणा वचनी सोडी रया । एकाजनार्दनी करिता प्रयाणा । नाही ती करुणा यमाची रया ।।३७९।।

**ऐशी प्रपंचाची गोडी** । जन्ममरण घेती कोडी । नाही तया काही धाक । जन्म मरणाचा देख । आलिया देहासी । नाठविती हृदयस्थासी । जरा आलिया निकटी । करी प्रपंचाची राहटी । एकाजनार्दनी शरण । नायकती मूर्ख जन ।।३८०।।

**दीपाचिया अंगासंगा** । कोण सुख आहे पतंगा । दीपा रूपाचेनि कोडे । पतंग स्नेहात उडी पडे । एक निमाले देखती । दुजा उडी घाली अवचिती । ऐशी भुलली बापुडी । एकाजनार्दनी धरुनी गोडी ।।३८१।।

**काळ आलारे जवळी** । वाचे जपे नामावली । अन्तकाळी जाण । तुज होईल बंधन । नको गुंतू संसारा । चूकवी जन्ममरण फेरा । कोणी कोणाचे न सांगती । अवघे सुखाचेच होती । एकाजनार्दनी शरण । कायावाचामने जाण ।।३८२।।

**संसार पसर करिसी तळमळ** । कारे घननीळ नाठविसी । पुत्रदाराधन कवण हे कवणाचे । आहे तोवरी माझे माझे म्हणती । लटिका प्रपंच सर्व नाशिवंत । एक हे शाश्र्वत हरिनाम । ह्मणे जनार्दन एकनाथा घेई । प्रेमसुख पाही पावशील ।।३८३।।

**अवघे सुखाचे सांगाती** । दु:ख देखती पळती । सुख देखोनि म्हणती माझे । दु:ख देखता पळती वोजे । यापरि अवघे लटिके देख । एकाजनार्दनी पाहे सुख ।३८४।।

**नरदेहा येउनि गभावी आयुष्य** । धरीना विश्र्वास रामनामी । अंतकाळी तया कोणी नये कामा । वाउगाची श्रमा पडतो डोही । माझे माझे म्हणोनिया कवटाळितो बाही । प्रपंच प्रवाही धाव घाली । एकाजनार्दनी करिता कल्पना । गेलासे पटना घाव घाली । एकाजनार्दनी करिता कल्पना । गेलासे पतना यमलोकी ।।३८५।।

**कां रे नागवीसी दिवसाचे चोरी** । प्रपंच भोवरी पडसी रया । वाचे नाम गाय वाचे नाम गाय । नाम न गाता होय दु:ख रया । सुख दु:खे दोन्ही भातुकी असती । प्रपंचाचे अंती भोगिया रया । रामनाम वाचे सदा गात जाय । न घरी तू हाय वाउगी रया । एकाजनार्दनी किती सांगू मूढा । वाया तू दगडा भुमीभार ।।३८६।।

**कां रे हावभरी जाहलासी पामरा** । भार वाहसी खरा प्रपंचाचा । नाम श्रीरामाचे नित्य घेई वाचे । तुटेल जन्माचे दु:ख जाण । यातना यमाची दु:खाची परवडी । नामे धरी गोडी आवडीने । एकाजनार्दनी नायकासी मूढा । अहारे दगडा धर्मलंडा ।।३८७।।

**भक्ती नाही नामी तो चांडाळ पतीत** । तोची जाणावा कुश्र्चित नष्ट येथे । प्रपंच कर्दमी बुडोनिया ठेले । संताविण उगले फजित होती । पुत्र मित्र कांता मानुनी भरवसा । याचा मोहफासा जन्मवरी । एकाजनार्दनी अंती आहे कोण । न कळे संताविण निश्र्चयेसी ।।३८८।।

**नवल देखिले संसाराचे बंड** । त्याचे कोणी तोंड न ठेचिती । गुंतलेची बळे चिखले माखले । कर्मा जन्मफळे भोगिताती । नाथिला पसारा मानिती वो साचा । वेध हो तयाचा वागविती । एकाजनार्दनी नाडलेसे मोहे । संदेह संदेहे गोवियले ।।३८९।।

**वाउगाची पसारा** । कारे वाढविला गव्हारा । म्हणसी माझे माझे । अंती कोण आहे तुझे । भुललासी वाया । गमाविसी व्यर्थ काया । कोण हे कोणाचे । एकाजनार्दनी साचे ।।३९०।।

**वाउगाची शीण करिसी सर्वथा** । चुकसी परमार्थी मूढा जाण। किती करिसी सोस माझे माझे म्हणोनी । शेवटी बंधनी पढसी मूढा । अंतकाळी कोणी नाही रे सांगाती । होईल फजिती तुझी तुला । एकाजनार्दनी वाउगाचि धंदा । त्यजूनि गोविंदा सेवी बापा ।।३९१।।

**उपजोनि प्राणी गुंतला संसारी** । आपुला आपण वैरी होय रया । न कळे पामरा नरकाचे ते मूळ । विषय सुख अमंगळ भोगी रया । नाथिलिया प्रपंच बराडी । सैर वोढा वोढी होईल

रया । न कळे तयासी जाहला बुद्धिहीन । माझे माझे कवळोन रडे रया । एकाजनार्दनी अभागी पामर । भोगिती अघोर नरक रया ।।३९२।।

**दु:खाच्या खडकी आदळती प्राणी** । परि संसाराचा मनी वीट नये । कामाचीया लाटे कर्दमाचे पुरी । बुडे तरी हाव धरी अधिकची । वरिता नायके भ्रमलासे कीर । सापडे सत्वर पारधीया । एकाजनार्दनी यमाचीया फासा । पडेल तो सहसा न कळे मूढा ।।३९३।।

**सर्पे धावोनी धरिल्या तोंडी** । सर्वांगा घालितसे वेढी । सर्प बाधेची साकडी । निवारी मंत्रवादी गारुडी । रिघता सदगुरुशी शरण । जैसे निरसे जन्ममरण । संसार सर्प मिथ्या देही । एकाजनार्दनी सदा घ्याई ।।३९४।।

**अशाश्र्वत देह जाईल जाईल** । वायाचि गमाविल अभागी तो । नये मुखी कदा श्रीरामचरित्र । वायाचि पै वक्त्र जल्पे सदा । दिननिशी करी संसाराचा धंदा । नाठवी गोविंदा मूढ काही । एकाजनार्दनी अभागी तो खरा । तपाच्या डोंगरा हाव धरी ।।३९५।।

**भजन करिता लाजतो पामर** । संसारी चित्त स्थिर सदा वाहे । तीर्थयात्रे जाय संसार चिंता वाहे । पुराण कीर्तनीये निद्रा बळे । ऐसा तो पापिष्ट कर्म ते सबळ । एकाजनार्दनी ह्मणे दोषी अमंगळ ।।३९६।।

**मधाचिया बोटा गुंतले लिगाडी** । तैशी परवडी संसाराची । वाउगाची सोस रचलीया कंद । झाडुनि नेता वेध माक्षिकेसी । एकाजनार्दनी विचारी मानसी । वाया भवपाशी गुंतू नको ।।३९७।।

**पाहतो देखता कानी जे ऐकतो** । परी सदाचि पाहतो संसार मनी । मीनाचीये परी गुंतलासे जळी । परी संसारा कवळी अधम तो । दानधर्म काही न वेचे आडका । रुक्यासाठी थडका घेत असे । एकाजनार्दनी संसार वेगळा । कै मी गोपाळा होईन साचा ।।३९८।।

**भरला तो हावे ह्मणे माझे माझे** । वाहातसे ओझे संसाराचे । कुंथत कुंथत येरझारा करी । खराचीये परी पृष्ठी वाहे । न मिळेचि अन्न बहुत आपदा । परि त्या गोविंदा स्मरेचिना । ऐसे जन्मोनिया दास संसाराचे । एकाजनार्दनी त्याचे तोंड काळे ।।३९९।।

**न कळे पामरा काही हा विचार** । भोगावे अघोर किती जन्म । मरुनी जन्मावे मरुनी जन्मावे । पुनरपी मरावे येरझारी । एकाजनार्दनी न मानी विश्र्वास । द्दढ धरी पाश संसाराचा ।।४००।।

**पाहता पाहता नेत्र गेले** । परी भूललोसे मेळे संसाराच्या । जाऊनी धरितो माझे म्हणोनिया । परी ते वाया जाती सर्व । विषय भोगितो गर्दभाचे रिती । लाभ तो निश्चिती लत्ताप्रहर । एकाजनार्दनी मंडूकाचे परी । वटवट खरी संसारी ते ।।४०१।।

**पिसाळले श्वान पाणीयासी बीहे** । तैसा नरदेह संसारासी । वाउगाची शीण पावती पतन । नेणे आपुले बिदान भुलला वाया । मर्कटासी जेवी मदिरा पाजिली भुतबाधा झाली तयावरी । सैरावैरा नाचे कोण न तया हासे । एकाजनार्दनी तैसे मनुष्यदेही ।।४०२।।

**अवघे आयुष्य काळाधीन जाहले** । परी चित्त त गुंतले संसारात । सापे दर्दूर गिळियेला मुखी । तेणेचि तो शेखी मक्षिका धरी । ऐसे हावभरी प्राणी पै नाडले । ह्मणती माझे वहिले कन्यापुत्र । एकाजनार्दनी मृगजळाची आशा । पडे तेणे फासा गळा बळे ।।४०३।।

**काय सुख आहे संसारी** । म्हणोनी भरलासी हाव भरी । वाचे स्मरे श्रीहरी । दिननिशी प्रपंची । जन्म जाहलियापासून । सदा संसाराचे ध्यान । नाही कधी आठवण । न ये मुखी रामनाम । ऐसा भार वाही खर । परि तया न कळे साचार । आहे पुढे यातना अघोर । हे काही नाठवी । ऐसे होता भरले आयुष्य । मृत्यु पुन्हा येत जन्मास । ऐशा भोगी चौऱ्यायशी नि:शेष । एकाजनार्दनी ह्मणे त्यास लाज नाही ।।४०४।।

**अशाश्वतासाठी** । का रे देवासवे तुटी । अंतकाळीचे बंधन । कोण निवारी पतन । तू म्हणसी हे माझे । खरा ऐसे वाहसी वोझे । पावलीया अवसानी । कोणी नाही वा निर्वाणी । याचा न धरी विश्र्वास । एकाजनार्दनाचा दास ।।४०५।।

**उघडा अनुभव असौनिया देही** । वायाचि प्रवाही का पडसी । संसार दुस्तूर कूप हा निर्धार । पडता अंधकार सुटे जाण । भ्रमता भ्रमता नयेचि बाहेरी । चौऱ्यायशी फेरी पुनःपुनः। एकाजनार्दनी नको हा विचार । वाया फजितखोर होशी बापा ।।४०६।।

**नेणता नेणता का रे अंध होशी** । माझे म्हणविशी का रे बळे । तू कोण कोठील आहेसी कोणाचा । शिणतोसी साचा मी माझे म्हणुनी । राहत माळ जैसी जात येत वरी । तैशीच हे परी जन्म देही । एकाजनार्दनी करी का विचार । वाया हावभर फिरू नको ।।४०७।।

**गुंतला सर्प भुलला नादा** । तैशी प्राणियासी आपदा संसाराची । सदा तळमळ मन नाही स्थिर । भोगिती अघोर जन्मोजन्मी । नळिका यंत्रामाजी सापडे वानर । संसारी तो नर तैसा गुंते । एकाजनार्दनी करिता नाना युक्ती । मागे ही फजिती पुढे होती ।।४०८।।

**कासयासी मूढा करिती संसार** । पुढे तो अघोर थोर आहे । बळेचि कारे नागवसी पहाता । विषय भोग भोगिता दु:ख बहु । पातकाची राशी हे तो कन्यापुत्र । तू का रे पवित्र त्यासी म्हणसी । एकाजनार्दनी नशिवंतासाठी । देवासर्वे तुटी पाडितोसी ।।४०९।।

**वायाचि भुली पडली गव्हारा** । भ्रमशी भोवरा संसारीच्या । कारे सावध न होशी मूढा । शिणशी दगडा फजितखोरा । गुंतुनी पडसी वाउग्या व्यसनी । संसार घसणी चौऱ्यायशीच्या । एकाजनार्दनी किती हे सांगावे । जाणत जाणत नागवे निलाजिरा ।।४१०।।

**आमिष लाउनी मीनाते गोविती** । तैसी संसार स्थिति जाणे बापा । पान लागलिया गूळ न ह्मणे गोड । नामामृती चाड न धरती । पहाती डोळा देखती प्रकार । परि विषयाचा आदर न सांडिती । माझे माझे ह्मणोनी द्दढ धरिताती । एकाजनार्दनी भोगिती चौऱ्यायशी ।।४११।।

**संसाराचे सुख कोण पै सांगती** । होत आहे फजिती लहानथोरा । सर्पे मंडूक धरिलासे मुखी । तेणे पै शेखी मक्षिका धरी । मरती बापुडी हाव धरती गोडी । तरी ती वेडी नागविती । एकाजनार्दनी न धरी सोय । वायाचि धावो जाय हाव भरी ।।४१२।।

**काय ऐसा यासी मानला विचार** । संसार पसर गोड वाटे । बुडता देखती आणिकासी डोळे । परि नुमजे अंधळे बळी होती । सायासे शिणती माझे ह्मणोनिया । एका जनार्दनी कृपा न करी देव । तोवरी अभाव सर्व जाणा ।।४१३।।

**मक्षिकेने जैसा रचियेला कंद** । वाउगाची वेध तैशापरी । आणिके झाडिता गुंतोनि पडती । तैशी ही फजिती संसाराची । एकाजनार्दनी कृपा न करी देव । तोवरी अभाव सर्व जाणा ।।४१४।।

**स्वप्नवत संसार माना हा निर्धार** । अशाश्र्वत जाणार छाया जैसी । मृगजळ नाथिले दिसतसे जळ । पहा हो प्रबळ पटल मेघ जैसे । एकाजनार्दनी वाउगा आभास । देवाविण सौरस वाउगा भासे ।।४१५।।

**वाउगाची सोस वाहताती वोझे** । ह्मणती माझे माझे हीन भाग्य । जाणती नेणती राहाटी देखती । मरती रडती देखती त्या । एकाजनार्दनी भुलले ते वाया । परि देवराया शरण न जाती ।।४१६।।

**धरसी संसाराची हाव** । माझे माझे ह्मणशी सर्व । हे तव कोणाचे वैभव । तुज न कळे पामरा । आयुष्यमान जव आहे । तव सर्वा होशी साहय । अंतकाळी पाहे । कोणी कामा न

येती । तुज जे ह्मणती उत्तम । त्यांचा तुज मोठा भ्रम । अंतकाळी पावशी श्रम । एकलाचि पामरा । ह्मणोनि सर्व भावे हरी । स्मरण करी निरंतरी ।

वृक्षाची एकाजनार्दनी निर्धारी । नाम स्मरे वेळोवेळा ।।४१७।।

**छाया पै बैसता सुख** । तैसा संसार देख प्राणीमात्रा । गुंडती बळे गुंडती बळे । माझे माझे सळे काळ तोंडे । असता बरवी करिती आणिक सेवा । आवडली या देवा धावे ह्मणती । ऐसा काळतोंडा जनी जाला वेडा । एकाजनार्दनी रेडा पशुजन्मी ।।४१८।।

**सुखावोनि पतंग दीपावरी पडे** । परि शेवटी जोडे देह अंत । तैसे प्राणीमात्र संसारी भुलले । कष्ट ते उगले करिताती । भिलाव्याचे परि प्रपंच गोमटा । परी काढी चपेटा अंतरीचा । एकाजनार्दनी भुलले पामर । वाया नरक घोर भोगिताती ।।४१९।।

**मिथ्या हा संसार** । अवघा मायेचा बाजार । स्त्रिया पुत्रधन । हे तो सर्व मायिक जाण । यात गुंतू नको नरा । न करी आयुष्य मातेरा । वाचे वदे हरिहर । करी ध्यान निरंतर । एकाजनार्दनी नरा । नित्य भजे हरिहरा ।।४२०।।

**कोणाचे घरदार मृगजळ संसार** । तुझा तू विचार करी बापा । सोयरा तू देव करी पा संसारी । वाया हाव भरी होऊ नको । व्दैत अव्दैत टाकुनी परते । होई पा सरता देवापाशी । एकाजनार्दनी देवाविण तुज । राखील पा सहज कोण दुजा ।।४२१।।

**कोण हरी आता संसाराचा छंद** । न स्मरता गोविंद दु:ख बहु । शाहाणे बुडती शाहाणे बुडती । शाहाणे बुडती भवडोही । तत्वज्ञानाच्या सांगताती गोष्टी । परि संसार हिंपुटी होती मूढ । एकाजनार्दनी संसाराचा छंद । टाकुनी गोविंद भजे का रे ।।४२२।।

**संसार सागरी बुडालिया प्राणी** । करी सोडवणी कोण त्याची । अविद्द्यादि पंचक्लेश हे तरंग । बुडाले सर्वांग प्राणियाचे । भ्रमाच्या आवर्तामाजी सापडला । सोडवी तयाला कोण आता । स्त्रीयापुत्र आप्त बंधु हे सोयरे । ओढिताती सारे मत्स्याऐशी । प्रचंड या कामे पसरिले जाळे । त्यामाजी गुंतले प्राणी जात । एकाजनार्दनी उच्चारील नाम । सुखाचा आराम प्राप्त होय ।।४२३।।

**फट गाढवाच्या लेका** । संसार केला फुका । खटपट करिता खटपट गेला सारा वेळ । रामनाम घेता तुझी बैसे दातखीळ । कैचा आपा कैचा बापा कैचा मामा काका । कैची आई कैची ताई कैची बहिण आका । कैचे घर कैचे दार भुललासी फुका । कैची सासू कैची बाईल त्यांनी नेला पैका । बारा सोळा मुळे झाली त्याला झाले नातु । द्रव्य होते ते रारुनी गेले

कंबरेवर हातु । एकाजनार्दनी ह्मणे हा संसार खोटा । हरिस्मरण करा कधी नये तोटा ।।४२४।।

**किती वेळा जन्म किती वेळा मृत्यु** । हाचि न कळे अंतु भाग्यहीना । जन्मोनी संसार मानितो बरवा । परि या राघवा शरण न जाय । पावलिया मरण सहज नरक कुंडी । कोण तया सोडी अधमासी । स्वप्नामाजी नेणे परमार्थ मानसी । सदा चौऱ्यायशी फेरे भोगी । एकाजनार्दनी नोहेचि सुटिका । भाग्यहीन देखा मरे जन्मे ।।४२५।।

**मृगजळाच्या पुरी गुंतशी पामरा** । कोण तुज निर्धारा सोडवील । पडशी पतनी चौऱ्यायशी आवर्ती । तेव्हा तुझी गती कैशी होय । जीवी जीवपण शिवी शिवपण । वेगळे ते जाण दोन्ही होती । यातना अनंत तुज भोगविती । तेथे काकुलती कोणा ऐशी । यमाचे ते दूत मारिती पामरा । कारे संसारा न चुकशी । एकाजनार्दनी सांगतो विचार । रामनाम परिकर जप करी ।।४२६।।

**संसारी तरले बोलती ते कुडे** । जाती ते बापुडे अधोगती । नेणती आचार विचार स्वधर्म । करताती कर्म मना तैसे । न तरती भवसागरी बुडती हव्यासे । लागतसे पिसे धन आशा । एकाजनार्दनी आशा हे सांडोनी । गोविंद चरणी मिठी घाला ।।४२७।।

**आपुले पारखे सांगता नायकती** । करितसे खंती संसाराची । काय संसाराचे सुख ते तयासी । कोण फासा फाशी चुकवील । कधी रामनाम नाठवी पामर । भोगितो अघोर जन्म कोटी । एकाजनार्दनी एकपणे शरण । जगी जनार्दन आम्हा आहे ।।४२८।।

**देह नाशिवंत अग्नीची साउली** । तैशी परी बोली संसाराची । जळगारी जैसे उदक नाथिले । की मृगजळ पसरले चहुकडे । पुरुषाची छाया वाउगाचि भास । चोराचा पै लेश काय तेथे । रज्जु देखताचि भासतसे सर्प । एकाजनार्दनी दर्प संसाराचा ।।४२९।।

**वायाचि कासया करिता आटाआटी** । झणे पाडा तुटी संसारासी । संसार कर्दमी गुंतलेती बापा । किती वेळा खेपा कराव्या त्या । मरावे जन्मावे मरावे जन्मावे । खंडन केव्हा व्हावे न धरा शुद्धि । एकाजनार्दनी किती ते सांगावे । नायकती हावे भरले जीव ।।४३०।।

**जे आसक्त संसारी** । ते अघोरी पडती । तया नाही सोडविता । सद्गुरूनाथावाचुनी । त्याचे चरण धरा चित्ती । मग भिती कासया । एकाजनार्दनी शरण । जन्ममरण चुकले ।।४३१।।

**संसार म्हणसी माझा** । कारे गुंतला बोजा । राहे अलिप्त संसारी । अंतरी धरुनिया हरी । तेणे चुकती बंधने । पावन करिती संतजन । त्रैलोक्यी ह्याचा शिक्का । एकाजनार्दनी नाम घोका ।।४३२।।

**मागे बहुतांसी सांगितले संती** । वाया हे फजिती संसार तो । अंधाचे सांगाती मिळालेसे अंध । सुख आणि बोध काय तेथे । विष खाउनिया प्रचीत पाहे कोणी । तैसा अधमपणी गुंतू नको । एकाजनार्दनी जाऊ नको वाया । संसार माया लटिकी ते ।।४३३।।

**नोहे सायास रामनामी** । संसारासी गुंते प्राणी । आठवी वाचे रामनाम । संसार नुरेची श्रम । नको करू वाया श्रम । वाचे म्हणे रामनाम । आवडीने नाम नाम घोका । म्हणे जनार्दनाचा एका ।।४३४।।

**अष्टची प्रहर करिसी संसाराचा धंदा** । का रे त्या गोविंदा स्मरशी ना । अंतकाळी कोण सोडवील तूते । कारे स्वहिताते विसरलास । यमाची यातना न चुके बंधन । सोडवील कोण तुजलागी । एकाजनार्दनी गुंतलासी वाया । भजे यादवराया विसरू नको ।।४३५।।

**वायाची सोस संसार कामाचा** । रामनामी वाचा रंगो का रे । यापरती जीवा सोडवण नाही । वेदशास्त्री पाही भाष्य असे । पुराणे डांगोरा पिटिती नामाचा । ते तू का रे वाचा न वदरी । सायास साधने न लगे आणीक । एकाजनार्दनी ऐक्य मन करी ।।४३६।।

**सांडी पा सांडी संसाराचा छंद** । आठवी गोविंद वेळोवेळा । न लगे सायास न लगे सायास । आठवी श्रीहरीस मनोभावे । षडवैरीयांचे तोंडी पा बिरडे । करी तू कोरडे आशापाश । एकाजनार्दनी शरण स्वभावे । भोगी तू गौरवे वैकुंठीचे ।।४३७।।

**आहारे मूढा अहारे मूढा** । जन्मोनी दगडा काय केले । साठी घटी करसी संसाराचा छंद । वाचे तो गोविंद नुच्चारिसी । एकाजनार्दनी श्रीरामावाचून । चुकवील बंधन कोण मूढ ।।४३८।।

**बुडालिया जळी धावतसे कोण** । तैसे प्राणी जन बुडताती । संसार हा डोहो दुस्तर पारखा । सांगड ती देखा रामनाम । एकाजनार्दनी संतांचा आधार । उतरू पैलपार भावडोही ।।४३९।।

**संसारी आलिया प्राणी** । तया यमाची जाचणी । अंती तयासी निर्वाणी । कोणी नाही । करी नामाचे स्मरण । तेणे तुटेल बंधन । कायावाचा मने जाण । संता शरण जाई । नाराती पापे होय होळी । विठ्ठलनामे वाजवी टाळी । कळीकाळ पायातळी । वैष्णवसांगते । भाव

धरी बळकट । आशापाश तोडी नीट । रामनाम जपे स्पष्ट । यातना ते चुकती । सोस करी नामाचा । आणिक शीण उगाची साचा । एकाजनार्दनी ह्मणे वाचा रामनाम गाये ।।४४०।।

**करू करू ह्मणता गेले वायाविण** । संसार तो शीण केला वेगी । अधमा न कळे अधमा न कळे । झाकोनिया डोळे घाणा नेती । यमदूत नेती तयासी तातडी । मारिती बरी कोडी यमदंडे । एकाजनार्दनी चूकवी या यातना । संतांच्या चरणा शरण रिघे ।।४४१।।

**मी माझे आणि तुझे** । टाकी परते हे वोझे ।नामे पावन होसी सहजे । तेचि सेवी आवडी । नको गुंतू या लिंगाडा । सोडी सोडी या दगडा । भवबंधनाचा हुडा । पडेल अंगावरूता । देई टाकुनी लवलाही । रामनाम मुखे गाई । एकाजनार्दनीपायी । तरी सुखा काय उणे ।।४४२।।

**अल्प आयुष्य अल्प सर्व** । अल्प वैभव समजेना । ह्मणे सदा माझे माझे । परी न लाजे काळासी । त्यासी ऐसे न कळे कदा । संसारधंदा मिथ्या हा । शरण एकाजनार्दनी । नाठवी मनी श्रीहरीसी ।।४४३।।

**देह भागितसे मुख्य गोडी** । स्त्री भोगतो आवडा । स्त्री हाती धरिता देख । वाढे प्रपंचाचे दु:ख । जे जे आणी ते ते थोडे । धनधान्य आवडे कुडे । ऐसा भुलला संसारा । लक्ष चौऱ्यायशी वेरझारा । सोडविता नाही कोण्ही । एकाजनार्दनावाचुनी ।।४४४।।

**पावला जनन मातेचे उदरी** । संतोषली माता तयासी देखोनी । जो जो जो जो ह्मणोनी हालविती बाळा । नानापरी गाणे गाती करिती सोहळा । दिवसेदिवस वाढला रारळ फोक । परि कर्म करी आचाट तया न साहावे दु:ख । शिकविता नायके पडे भलते बेसनी । एकाजनार्दनी पुन्हा पडतसे पतनी ।।४४५।।

**अभागी ते पामर** । भोगिती नरक अघोर । जाहला बाईलेचा अंकित । वर्ते जाणोनी मनोगत । नावडे माता पितियाची गोष्टी । ह्मणे हे बोलती चावटी । एकाजनार्दनी दुर्जन । पावती नरकी ते पतन ।।४४६।।

**पिता सांगता गोष्टी** । तयासी करितो चावटी । नायके शिकविले । ह्मणे ह्माताऱ्यासी वेड लागले । बाईल बोलताचि जाण । पुढे करून धावे कान । ऐसे नसावे संतान । वाया भूमीभार जाण । एकाजनार्दनी अमंगळ । त्याचा होईल विटाळ ।।४४७।।

**व्हावे निसंतान** । हेचि एक बरे जाण । येर श्र्वान ते सुकर । जन्मा येवोनिया खर । मातापित्याचा कंटाळा । न पहावे त्या चांडाळा । देखताचि सचैल स्नान । करावे ते पाहुनि जाण । पुत्र नोहे दुराचारी । एकाजनार्दनी ह्मणे वैरी ।।४४८।।

**नवमास वरी वाहिले उदरी** । तिसी दासेदारी हिंडवितो । लालन पालन करीत आवडी । जोडली ती जोडी नेदी तिसी । सर्वभावे दास बाईलेचा जाहला । एकाजनार्दनी अबोला धरी माते ।।४४९।।

**मायबापा न घाली अन्न** । बाईलेच्या गोता संतपर्ण । मायबापा न मिळे गुंजभर सोने । बाईलेच्या गोता घडी अलंकार लेणे । मायबापे श्रमोनिया मेली । एकाजनार्दनी बाईल प्रिय जाहली ।।४५०।।

**मातेचिया गळा न मिळे गळसरी** । बाईलसी सरी सोनियाची । मातेचिया हाता न मिळे अंगी चोळी । बाईलसी नेसवी चन्द्रकळा काळी । बाईल आधीन ठेविले जिणे । एकाजनार्दनी नरकी पेणे ।।४५१।।

**मातेसी न मिळे खावायासी अन्न** । बाईलेसी घाली नित्य मिष्टान्न । ह्मणे बाईल माझी संसारी बुडविला । माझ्या बाईलेने वाढविला । माता माझी अभागी करंटी । बाईल प्रत्यक्ष सभागी मोठी । एकाजनार्दनी बाईलेआधीन जाहला । मातेसी अबोला धरिला तेणे ।।४५२।।

**बाईलेचा जाईला दास** । न करी आस मातेची । नव महिने वोझे वागवून । तिचा उतरी तो शीण । बाईलेच्या बोला । धरी मातेसी अबोला । एकाजनार्दनी पुत्र । जन्मला तो अपवित्र ।।४५३।।

**बाईलेचा बोला बाईलेचा** । धरी मातेसी अबोला । बाईलेसी नेसवे घट्टी । माते न मिळे लंगोटी । बाईले षडरस भोजन । माते न मिळे कोरान्न । बाईल बैसवी आपुले घरी । माते हिंडवी दारोदारी । एकाजनार्दनी शरण । ऐसे पुत्राचे अवगुण ।।४५४।।

**बाईल सांगताचि गोठी** । ह्मणे मातेसी करंटी । जन्मापासुनी आमुचे मागे । अवदसा लागली सांगे । इचे उत्तम गुण । ऐसा बोले अभागी जाण । नरदेही ते गाढव । एकाजनार्दनी नाही भाव ।।४५५।।

**बाईलेचा जाहला दास** । करी आस मातेची । माकड जैसे गारुडयाचे । तैसा बाईलेपुढे नाचे । पिता सांगता हित गोष्टी । दु:ख वाटे तया पोटी । ऐसे बाईलेने गोविले । एकाजनार्दनी वाया गेले ।।४५६।।

**देव गुरु मातापिता** । ऐसा भाव जया चित्ता । नाही दुजा आठव काही । चित्त जडले चौघापायी । एकाजनार्दनी साचे । ऐसे मनी नित्य ज्याचे ।।४५७।।

**मातापिता देव गुरु** । ऐसा ज्याचा एक विचारू । धन्य धन्य तयाचे शरीर । नर नोहे तो ईश्र्वर । चारी दैवते समान मानी । शरण एकाजनार्दनी ।।४५८।।

**मातापितीयांसी जो करी नमन** । धन्य त्याचे पुण्य इह जनी । मातापितियाचे करी जो पूजन । धन्य तयाचे पुण्य इहलोकी । मातापितीयांची करीत जो सेवा । एकाजनार्दनी देवा वरिष्ठ तो ।।४५९।।

**बाईल आधीन होय ज्याचे जिणे** । तया अधमा नरकी येणे । बाईल मनोगते ऐसा चाले । नावडती कोणाचे तया बोल ।बाईल देवाचाही देव । ऐसा ज्याचा द्दढ भाव । एकाजनार्दनी ह्मणे मूढाला । बाईलने भुलविला ।।४६०।।

**रात्रदिवस भार वाहे खर** । बाईलचे उदर भरितसे । नेणे दानधर्म व्रत आचरण । अतिथी पूजन स्वप्नी नाही । नेणे श्राद्ध पक्ष आपुला आचार । सदा दुराचार कर्मे करी । पत्नी गृही सदा वसतसे मन । न वेची काही धन कवडी एक । एकाजनार्दनी ऐसा हीनभागी । जाडीतरो अभागी नकारवारा ।।४६१।।

**निर्धन पुरुषाची देखा** । स्त्री बोले अतिशय ऐका । दिवसा पोराची तडातोडी । रात्री तुमची वोढावोढी । नाही घरी खावया अन्न । संततीने भरले सदन । एकाजनार्दनी देवा । ऐसा स्त्रीचा हेलावा ।।४६२।।

**प्रपंचाचा कठीण लाग** । नाशासी गूळ स्त्रीसंग । भोगाचे जे जे सुख । ते ते प्रत्यक्ष घेती विख । दीपाचीया अंग रांगा । कोण सुख आहे पतंगा । पुढील निमाले देखती । पाहुनी पुढे उडी घालिती । ऐसे भुलले तया संगी एकाजनार्दनी जगी ।।४६३।।

**सदा सर्वकाळ बाईलेचा दास** । होऊनी कामास श्र्वान जैसा । नेणे भीड कधी मर्यादा स्वजनी । बाईलेचे कानी गुज सांगे । बैसता राउळी बाईले एकांत । देवापाशी चित्त न बैसेची । एकाजनार्दनी ऐसा तो पतित । अघोर भोगीत कल्पकोडी ।।४६४।।

**परदारा परधन** । येथे धावतसे मन । मन जाय दूरदेशी । वोढूनी आणा चरणापाशी । दुर्बुद्धी मनाचे ठाणे । मोडोनी टाका पुरतेपणे । एकाजनार्दनी मन । आपुले पदी राखा जाण । आपुले पदी राखा जाण ।।४६५।।

**स्त्री पुत्र दारा धन** । देखोनिया नाचे श्र्वान । जाता बळे कीर्तनी । यका ऐसा बैसे ध्यानी । लक्ष ठेउनी बाहेरी । वरवर डोले दुराचारी । एकाजनार्दनी ह्मणे । श्र्वानापरि त्याचे जिणे ।।४६६।।

**स्त्रियांचे संगती** । नोहे परमार्थ निश्र्चिती । स्वप्नी होता दरुशन । तेथेच गुंततसे मन । पहा स्त्रियांच्या अंगसंगे । भुलविला ऋषिशृंग । विश्र्वामित्र तपिया खाणी । कुत्रा करुनी हिंडे वनी । ऐसे भुलले थोर थोर । तेथे जीव किती पामर । एकाजनार्दनी भुलले । वाया स्त्रीसंगी गुंतले ।।४६७।।

**व्याही जावयाच्या कोडी** । पोषितरो अति आवडी । देहसुखाचीया चाडा । अवघे मेळविले वोढा । देही वाढवी अतिप्रीती । पुत्र दारा माझे म्हणती । जैसा जोंधळा कणा चढे । कणभारे क्षिती पडे । वृक्षा फळे येती अपारे । फळ भारे वृक्ष लवे । ऐसा भूलला स्वजनासी । एकाजनार्दनी सायासी ।।४६८।।

**कन्या पुत्रादिक घन** । हे तो जाण भ्रमवत । मागील अनुभव घेउनी कसवटी । पडलीरो तुटी रामनामी । नाथिले याचा काय तो धिवसा । कवण तो आकाशा कुंपण घाली । अभ्रीची छाया मृगजळ पाणी । काय ते रांझणी भरता येते । एकाजनार्दनी सारीमारीचे वचन । काय ते प्रमाण आयुष्याविण ।।४६९।।

**गुंतलासी मायापाशी** । कोण सोडवील तुजसी । धाये मोकलोनि रडसी । नये करुणा कवणाते । वाचे सदा नाम गाय । तेणे चुकती अपाय । सहजची सोय । नाम मुखी वदता । बंधनाची तुटेल बेडी । होईल कैवल्याची सहज जोडी । एकाजनार्दनी आवडी । रामनामी धरिता ।।४७०।।

**लेकुरात बाप खेळवी साचे** । बाईल देखता ती पुढे नाचे । माझा बाप माझी आई । बाईल देखता नाचतो पायी । धडसेनी तोंडे बोबडे बोले । आवडीने ह्मणे पाहे बाईले । सासु सासरा पहाती साला । नाचतो जावई घेउनी मुला । यापरी ममता नाचवी जन । देवव्दारी आलीया घरी अभिमान । एकाजनार्दनी सोडोनी अभिमान । संतापुढे नाचे धरुनिया कान ।।४७१।।

**आळस निद्रा सांडी** । रामनाम म्हणे तोंडी । धन चित्तमान । हे तो श्र्वान विष्टे समान । पुत्र पत्नी संसार । वाया व्यर्थची भार । हे परते सांडी मने । एकाजनार्दनी जिणे ।।४७२।।

**धन कामासाठी देख** । न मनी दोष महादोषी । कवडीये लोभे केला असे मूर्ख । नाठवेची नरक पतितासी । कवडा येऊ लाभु होता । ते श्राद्ध करी मातापिता । मी उत्तम पैलहीन । ही धनलोभ्या नाठवे आठवण । एकाजनार्दनी शरण । काय तया ब्रह्मज्ञान ।।४७३।।

**घालुनिया काखे धन** । सदा मागे जो कोरान्न । धन्य वाया जिणे पाही । श्र्वान सकूर समतेही । असोनिया दारिद्रता । सदा धर्मावरी चिंता । द्रव्य पदरी बहु आहे । अतिथी रिक्त हस्ते जाये । एकाजनार्दनी ऐसे पामर । नरक भोगिती अघोर ।।४७४।।

**घरी धनधान्य पुरून** । सदा मागे जो कोरान्न । द्रव्य असोनि नाही ह्मणे । केविलवाणे ह्मणे मी दिन । असोनि द्रव्याचीया राशी । भिक्षा मागे अहर्निशी । ऐसा संचय करून । सर्वेची पावला मरण । वाया गेला नरदेही । एकाजनार्दनी पाही ।।४७५।।

**कवडी कवडी घाली खाचे** । नित्य नूतन भिक्षावाचे । अतीतासी दान । ते तो स्वप्नी नाही जाण । पर्वकाळ विधि । न कळे अभाग्यासी कधी । ठेउनी चित्त धनावरी । सर्वेचि फिरे घरोघरी । जन्मा येवोनि अघोर । एकाजनार्दनी भोगिती पामर ।।४७६।।

**गाठी बांधोनिया धना** । क्षणक्षणा पाहे त्याते । न जाय तीर्थयात्रेप्रति । धनाशा चित्ती धरुनी । बैसलासे सर्प दरी । तैशापरी धुसधुसी । नको धनाशा मजशी जाण । शरण एकाजनार्दनी ।।४७७।।

**धनलोभ्याचे जाय धन** । शोधितसे रात्रदिन । त्याची निंदा करतील लोक । रांडा पोरे थुकती देख । भिकेलागी जेथे गेला । म्हणती काळतोंडा आला । होता धनलोभे भुलला । संचित ते बरा नागविला । ऐसे धनाचे कारण । शरण एकाजनार्दन ।।४७८।।

**हीच दोनी पै साधने** । साधने निरंतर साधणे । परद्रव्य परनारी । यांचा विटाळ मने धरी । नको आणिक उपाय । रोवी सद्‌गुरूचे पाय । ह्मणे एकाजनार्दन । न लगे आन ते साधन ।।४७९।।

**पाया शोधोनिया बांधताति घर** । ऐसे या दुस्तर नरदेही । म्हणती पुत्र माझे नातू हे कलत्र । मिळती सर्व गोत्र तये ठाई । संपत्ती देखोनि गवासिती तयाशी । माझे माझे म्हणती रांडापोरे । चाले बरवा धंदा बहिणी म्हणती दादा । आलिया दारिद्र बाधा पळुनी जाती । जनार्दनाचा एका करितसे विनंती । संतसंग चित्ति जीवी धरा ।।४८०।।

**संपत्ती देखोनी म्हणती माझे माझे** । वागवितो वाझे खरा ऐसा । क्षणीक आयुष्य क्षणीक संपत्ती । न कळे तयाप्रती अंध जैसा । जाणार जाणार सर्व हे जाणार । हरिनाम सार जपे सदा । जनार्दनाचा एका सांगतसे मातु । धरीरे सांगतु वैष्णवांचा ।।४८१।।

**मातला बोकड भलत्यावरी धावे** । तैसा भरला विषय हावे । नाठवेचि आपपर । सदा हिंडे परव्दार । शिकविले मानी वोखटे । उताणा नेटे चालतसे । कर्म धर्म नावडेची काही । विषय प्रवाही बुडतसे । एकाजनार्दनी ते पामर । भोगिती अघोर कुंभपाक ।।४८२।।

**करिता विषयाचे ध्यान** । जीव होय मनाधीन । ऐसे भुलले विषयासी । अचवले परमार्थासी । संसार सागरी वाहिला । गोड परमार्थ राहिला । गेले भुलोनिया मन । विसरला आठवण । जन्मा येवोनीया देख । एकाजनार्दनी ते मूर्ख ।।४८३।।

**सलगीने सर्प हाती तो धरिला** । परि डंश तो वाहिला करील बापा । तैसे विषयांसी सलगी पै देता। नेती अध:पाता प्राणीमात्र । विष उत्तम चांगले घातलेसे मुखी । परि प्राण शोखी क्षणमात्रे । जाणोनी जाणोनी नको भुलू वाया । एकाजनार्दनी पाया भजे आधी ।।४८४।।

**बंधनाचा फासा बैसलासे गळी** । मीनापरि गिळी सर्वकाळ । आमिष विषया भुलला पामर । भोगिती अघोर चौऱ्यायशी । गुंतताची गळी जाईल की प्राण । हे तो अधम जना न कळे काही । एकाजनार्दनी न कळेची मूढा । सांगावे दगडा किती किती ।।४८५।।

**इंद्रिये नाना छळिती पामरे** । समाधान शरीरे नोहे कधी । ज्याचा जो व्यापार करती विवंचना । परि त्या सर्वेश्र्वरा न भजती । विषयाचे कामे करिती विवंचना । परी नारायणा न स्मरती । एकाजनार्दनी कृपा नव्हती पूर्ण । इंद्रिया समाधान केवी होय ।।४८६।।

**काम क्रोध मद मत्सर शरीरी** । रात्रदिवस निर्धारी छळिताती ।अशा तृष्णा भ्रांति भुली हे वासना । सदोदित मना छळिताती । एकाजनार्दनी याचा टाकी संग । मग पांडुरंग हाती लागे ।।४८७।।

**डोळा फोडोनिया काजळ ल्याला** । नाक कापून शिमगा खेळला । वेचिता धन लक्ष कोटी । आयुध्य क्षणचि नोहे भेटी । मिथ्या बागुलाचा भेवो । बाळे सत्य मानिती पहाहो । ऐसे मिथ्या नको मनी । एकाशरण जनार्दनी ।।४८८।।

**अमृत विकुनि कांजी प्याला** । तैसा नरदेह गमाविला । लाहोनी उत्तम शरीर । वेचिले ते विषयपर । ऐशी मूर्खाची गोष्टी । एकनाथ देखोनि होतेसे कष्टी ।।४८९।।

**श्र्वानाचीये परी धावे** । विषयासक्त जीवे भावे । नेणे मान अपमान । सदा लोळे विषयावती । नाठवेचि काही धंदा । भुलला तो विषय मदा । एकाजनार्दनी देवा । नाठवी अभागी न करी सेवा ।।४९०।।

**श्र्वानाचा तो धर्म करावी वसवस** । भुले बुरे त्यास न कळे काही । वेश्यांचा धर्म द्रव्य ते हरावे । भले बुरे भोगावे न कळे काही । निंदकाचा धर्म निंदा ती करावी । भले बुरे त्यागावी न कळे काही ।।४९१।।

**सज्जनांचा धर्म सर्वाभूती दया** । भेदा मूळ छेदिता वृक्ष खुडे । तै समूळ विषय उडे । ऐसा अनुराग धरी मनी । देई विषयासी पाणी । एकाजनार्दनी गोडी । सहज परमार्थ उघाडी ।।५०२।।

**विपया होऊनी उदास** । सांडी संसाराची आस । तरीच पावाल चरण । संतसेवा घडेल जाण । होऊन उदासवृत्ती । भजन करा दिनराती । ऐसी आवड धारा मनी । शरण एकाजनार्दनी ।।५०३।।

**कल्पनेचे जळी वासना कल्लोळी** । बुडाले भवजळी नामहीन । तयाच्या धावण्या कोण धावे देव । ऐसा तो उपाव नेणेचिना । दु:खाचे डोंगर भोगिती बापुडी । कोण काढाकाढी करील त्यांची । एकाजनार्दनी संतावाचूनिया । त्या अभाग्याची दया कोण करी ।।५०४।।

**न सुटेची आशा गुंते बळे पाशे** । दु:खाचिया सरसे ह्मणे देव । ऐसे अमंगळ गुंतले कर्दमी । भोगिताती उर्मी जन्मदशा । एकाजनार्दनी संतासी शरण । गेलिया बंधन तुटे वेगी ।।५०५।।

**अविद्ययेचे भ्रांतपण** । मिथ्या दावी साच धन । तेथे गुंतसी लिगाडा । तेणे पडे पायी खोडा । जनमरण भोवरा । भ्रमे फिरसी निर्धारा । कळोनी का रे वेडा होसी । एकाजनार्दनी न पाहासी ।।५०६।।

**फजितीखोरांचे जीवी** । लाज नाही सर्वथा । सांगता ते न धरिती मनी । नायकती कानी शिकविले । ह्मैसा जैसा उन्मत्त मदे । काम छंदे तेवी नाचे । एकाजनार्दनी ते पामर । जन्म वेरझार भोगिती ।।५०७।।

**आवडी विष खाउनी मेला** । तो स्वये नरका गेला । कवणा कवण ठेवी दोष । ऐसा मूर्ख तो तामस । अमृत सांडूनी कांजी प्याला । तैसा नरदेह गमविला । लाहुनी उत्तम शरीर । गमाविले परिकर । एकाशरण जनार्दनी । कोण लाभ जाहली हानी ।।५०८।।

**हे तो अवघे फजितीचे भांड** । अंतकाळी तोंड काळे करती । चालता इंद्रिये ह्मणती माझे माझे । अंतकाळीचे वोझे न घेती हे । जरा आलिया निकट भरुनी । जाती हे पळोनि आपुले गृहा । एकाजनार्दनी धरी हा विश्र्वास । रामनामी ध्यास सुखे करी ।।५०९।।

**थोर गर्भीची यातना** । आठविता दु:ख मना । नऊ मास वरी । पचे विष्ठेचे दाथरी । जन्म होताचि जननी । सुख मानी अनुदिनी । बाळ वाढतसे सायासे । तो तो साउली संतोषे । तारुण्याचा येता भरा । मातेसी करी पाणउतारा । पावला सर्वे ह्मातारपण । नाकी तोंडी लाल जाण । नाठवेचि रामनाम । एकाजनार्दनी तो अधम ।।५१०।।

**धन मानवले नाठवीसी देवा** । अंतकाळी तेव्हा कोण आहे । यमाचे ते दंड बैसतील माथा । मग तुज रक्षिता कोण आहे । माता पिता बंधु सोईरे धाइरे । जोवरी इंद्रिये चालताती । सर्वस्व कामिनी ह्मणविसी कांता । ती ही केश देता रडू लागे । एकाजनार्दनी जातीचि शरण । स्वप्नी जन्ममरण नाही नाही ।।५११।।

**जरा पावली निजसंधी** । अनिवार येती आधीव्याधी । पायी पडतसे वेंगडी । अंधारी धरणे लागे काठी । डोळाचि पडे तोंडा लाळ । नाका येत शेंबुड वोंगळ । चुंबन देता पोराप्रती । बाऊ हह्मणोनि पोरे पळती । ऐशी दशा येईल अंगा । एकाजनार्दनी शरण रिघा ।।५१२।।

**बधिर झाले पै श्रवण** । जाले दंत उन्मळण । असुनी काय धरिसी माया । गेली इंद्रिये विलया । नाकी श्लेष्माचा खल्लाळ । तोंडावाटे पडे लाळ । ठरपुर वाजे गुदव्दार । चरणी सांडिला व्यापार । वृषण आले गुडघ्यावारी । शिश्र्न लोंबे पीठचाचरी । कफवात पै सुटला । शरीर कापे चळचळा । लहान थोर ते हासती । फे फे वाकुल्या दाविती । वाकता चाचपडे भिंती । पोरे बाऊ ह्मणोनि पळती । भार्या केलीरे आवडी । ती तुजवर बोटे मोडी । स्त्रीये पाहिजे पुरुष भोग तुज लागला खोकला रोग । तुज जाणे निरयाकडे । ती काजळ कुंका रडे । प्राण आला डोळीयासी । कैसा स्वार्थ न संडिसी । आंगण जाले रे विदेश । किती करिसी विषय सोस । आप्त ह्मणती का मरेना । पालटु जाला याचिया चिन्हा । एकाजनार्दनी निष्काम । भजा भजा रे परब्रह्म ।।४१३।।

**बारा वर्षे बालपण गेले** । परि रामनाम मुखी नाही आले । आहारे मूढा जन्मलासी दगड । गमाविले वाड आयुष्याशी । बारा वर्षे तारुण्य अवस्था । कामक्रोधे लाहो घेतला पुरता । बारा वर्षे तारुण्य अवस्था । कामक्रोधे लोहो घेतला पुरता । बारा वरुषे वृधाप्य आले समूळी । जराव्याधी देहासी कवळी । ऐसे आयुष्य गेले वायाविण । एकाजनार्दनी ह्मणे नाही घडले भजन ।।४१४।।

**देहो जै पासुनि झाला** । तै पासुनी मृत्यु लागला । साप बेडूकाते गिळी । बेडुक मुखे माशी कवळी । ऐसा काळ गिळितो जना । न कळेची बुद्धिहीना । मरण जाणती बापुडी । धरिती प्रपंची आवडी । ऐसे पामर आत्मघाती । यासी माहाहोये फजिती । असो जनी जनार्दन । एकाजनार्दनी शरण ।।४१५।।

**जन्मले ते बाळ** । परी वाट पाहे काळ । नाही संतसमागम । सदा विषयाचे काम । मुखी रामनाम नाही । सदा संसार प्रवाही । एकाजनार्दनी भुलोन । स्त्रीआधीन जाहला दीन ।।४१६।।

**आमिष देखोनी मीन गुंतलासे गळी** । तैसा काळ बळी पाश घाली । आप्त गोत्रज असोनी जवळी । नेताती वहिली यमकाळ । दात विचकोनिया म्हणती गेला गेला । ऐशा अभाग्याला काय बोध । एका जनार्दनी मनुष्य देही मूढ । प्रत्यक्ष दगड अवनी भार ।।४१७।।

**जाणार जाणार देह हा जाणार** । काय उपचार करिसी वाया । मृतिकेचे घर बांधिता खचले । तैसे परि जाहले न  कळे तुज । गृहधनदारा पुत्रपौत्र वाया । स्मरे देवराया एका भावे । एकाजनार्दनी घेई अनुतापा । चूकवी हे खेपा जन्ममृत्यु ।।४१८।।

**धनदारापुत्र अपत्ये म्हणसी माझे** । परी हे काळाचे खाजे जाणे बापा । गंगेलागी पूर अवचित आला । लोटोनिया गेला मागुती जैसा । तैसा याचा विश्र्वास न धरी तू मनी । यमाची जाचणी तुजसी होय । एका'जनार्दनी सोडोनी देई संग । नाम तू अभंग हरीचे वदे ।।४१९।।

**ज्यांचे आयुष्या नोहे लेखा** । तेही देखा निमाले । इतरांचा पाड कोण । नेमिले जाण न चुके ते । आणिले ते उसणे साचा । देणे तयाचा प्रकार । शरण एकाजनार्दनी । करी विनवणी सर्वांसी ।।४२०।।

**पितापुत्र नातु सर्व काळे ग्रासिले** । उरले ते गेले काळमुखी । सायास करूनि वाढविती माझे । परि काळाचे हे खाजे नेणती ते । बाळतरुणवृद्धदशाते पावती । परी न म्हणती रामराम । एकाजनार्दनी भुलला गव्हार । न करी विचार स्वहिताचा ।।४२१।।

**एका पाठी एक पुढा** । आहे मरणाचा हुडा । आज मेले उद्दया मरती । मागे रहाती तेही रडती । मरण जाणोनिया पाही । उगेच बोलती प्रवाही । ऐसी भुली पडली देखा । एकाजनार्दनी भुलले ऐका ।।४२२।।

**नको गुंतू मायाजाळी** । काळ उभा हा जवळी । नाही तुजलागी तत्वता । सोडविणार माता पिता । स्त्रिया पुत्र बंदीजन । करिती तुजलागी बंधन । धनवित्ते कुळे । सोडितील अमंगळे । एकाजनार्दनी मन । ठेवी गुरुपायी बांधोन ।।४२३।।

**इष्ट मित्र बंधू चुलते पुतणे** । काळाचे पोसणे सर्व देख । यमाची यातना पडता जीवा ती । कोणा काकुलती करसी मूढा । जोवरी आहे तुज जवळी धन । तोवरी पिशून म्हणती माझे । एकाजनार्दनी जवळी आला काळ । तेव्हा ते निर्बल सर्व होती ।।४२४।।

**एक एक मरती पहाती** । दुजियासी भ्रांती कैशी बापा । अरे ग्रासिले शरीर काळे देखा । पुरि तया मूर्खा न कळे काही । एकाजनार्दनी भुलला प्रपंचा। कोण दु:खा त्याच्या सोडवील।।४२५।।

**कन्यादान केल्या पाहे** । तो आपले घरा घेउनी जावे । वाया कायशी तळमळ । तेथे काही न चले बळ । आयुष्याचे अंती । पडसी काळाचीये हाती । करी काही पा विचार । कवणाचे घरदार । जनी जनार्दन एकला । एकाजनार्दनी देखिला ।।४२६।।

**पहा पहा जसा बैसलासे काळ** । भरलीसे वेळ न चुके मग । सर्वही संबंधी असता जवळी । नेईल तात्काळी तुजलागी । पाहे पा तो बोका बैसतो टपूनी । जातो उचलोनी घेउनी अंश । एकाजनार्दनी किती भाकू कीव । नायकाती जीव गुंतले ते ।।४२७।।

**काळाचे आहारी** । पडती शेवटी निर्धारी । ऐसे असोनी ठाऊक मना । परि न स्मरे रामसणां । गुंतले ते मायाजाळी । न कळे गळी लागली । एकाजनार्दनी शरण । वाचे न म्हणती नारायण ।।४२८।।

**नेमिला काळ लागला पाठी** । हे तो विठी पाहतो । एकापाठी दुसरे जाय । वाया हाय हाय उरते । न सोडी तो लागला मागे । शिणती वाउगे मुर्ख ते । शरण एकाजनार्दनी । पडती वदनी काळाचे ।।४२९।।

**अगाध जीवनी मत्स्य ते असती** । नाही दु:खप्राप्ति तया कधी । परि आलिया ढीवर घालतसे गळ । मग तळमळ करुनी काय । आमिषी देखोनी भक्षावया जाय । परि नेणे काळ आहे म्हणोनिया । एकाजनार्दनी प्राणी ते भुलले । आमिषा गुंतले मीनापरी ।।४३०।।

**देखती निमाले आपुले पूर्वज** । पितापुत्र सहज तेही गेले । नाही त्या यमासी करुणा कवणाची । भोगविता दु:खाची नाना योनी । सुकृत पदरी मूळ नाही दोरा । घालिता अंधोरा अन्त न लगे । एकाजनार्दनी नाही तेथे सुख । भोगविती दुख न सांगवे ।।४३१।।

**आयुष्य जाते पळ पळ  तुजला कैसे कळेना** । दो दिवसांची तनु हि साची अलासारे पाहुणा । चोसष्ट घडीची माजी रात्र गेला समजेना । आयुष्य खातो काळ तुझी राम कारे ह्मणाना । नरदेह पाचांचा आणिलासे उसना । काही तरी स्वहित करी व्यर्थ कारे वल्गना । राम द्दढ

धरशील तरी तुटेना यातना । भ्रांति माया काढी नको पडू बंधना । वाल्मिक तरला उलट्या नामस्मरणा । एकाजनार्दनी ह्मणे जाई साधु दर्शना ।।४३२।।

**जैसी गळी लागला मासा** । तैसा फासा यमाचा । जाणते परी वेडे होती । फेरे घेती चौऱ्यायशी । परि नेघे रामनाम । सदा काम विषयाचे । ह्मणे जनार्दनी एका । यासी सुटका कैसेनी ।।४३३।।

**घटिका भरता न लागे वेळ** । उभा काळ वाट पाहि । कोणी नेयरे सांगती । वाया होतसे फजिती । माप भरता नाही गुंती । वाया कुंथी फळ काय । शरण रिघा जनार्दनी । मोक्षदानी उदार । एका विनवी जनार्दनी । अंतकाळी नाही कोणी ।।४३४।।

**देह अवसाळी काळाची तो संधी** । पोहोचली आधी येवोनिया । कोण सोडवील तुजलागी बापा । श्रीराम जपा लवलाही । छांया जैसी हाले नाशिवंत खरी । तैशीच ही परी देहाचिया । एकाजनार्दनी भुलु नको माया । काळ तो लवलाह्या नेईल बापा ।।४३५।।

**आळस करसी नाम घेता** । जासी यमाचिया पंथा । कोण ती सर्वथा । सोडवील तुजलागी । बंधु बहिणी नये कामा । काय सांगावे तुज अधमा । गुंतलासी स्त्रीभोग कामा । तेव्हा दूर पळती ते । कोण्ही न होती कोणाचे । तू ह्मणसी मामेभाचे । एकाजनार्दनी साचे । कोणी नाही पामरा ।।४३६।।

**काळे ग्रासिले सकळ** । उरला जाऊ नेदी वेळ । घटिका आणि पळ । रामनाम स्मरे जना । अरे अलोनी संसारा । काही तरी विचार करा । आयुष्याचा दोरा । तुटे तो न कळेचि । करुणा नाही तया यमासी । काढिती वोढती जिवासी । भोगविती चौऱ्यायशी । यातना ते दुस्तर । ह्मणोनी येतसे करुणा । शरण एकाजनार्दनी । वाचे रामराम ह्मणा । मग सुख पावाल ।।४३७।।

**नरदेही सुख सोहळा संस्कार** । परि तेथे विकार दैवयोगे । बाळत्याचे सुख अज्ञान दशेत । रामनाम मुखात नये कधी । तरुण अवस्था विषयाचे ध्यान । नये ते भजन मुखी कदा । जरेने वेष्ठिले आले वृद्धपण । एकाजनार्दन भजन नेणे ।।४३८।।

**भोगोनी नाना योनी** । आलासी आता या जनी । ऐसा घरी मागील आठव । करी देहाचे वाटीव । नाही तरी जाशील वाया । पुनरपि यमालया । येता जाता शिणतोसी । एकाजनार्दनी का न भजसी ।।४३९।।

**अल्प आयुष्य नरदेही जाण** । काही तरी भजन करी वाचे । जाणार जाणार नरदेह जाणार । न चुके वेरझार जन्ममृत्यु । करी धंदा आठवी गोविंदा । वाया तू आपदा नको घेऊ । एकाजनार्दनी पंढरी पाहून । तेथे न करी मन ठेवणे देखा ।।४४०।।

**पळपळ आयुष्य खातसे काळ** । कारे होसी सबळ पोसणा तू । वाढविसी देह काळाचे भातुके । कारे तुज कौतुके सुख वाटे । नामस्मरण करिता लाजसी पामरा । भोगिसी अघोरा यमदंडा । एकाजनार्दनी सांगतसे हित । कारे न घ्या त्वरित हरीनाम ।।४४१।।

**काळाने ग्रासिले सावधान व्हारे** । सोडवण करारे हरिनामे । आयुष्य सरलीया कोण पा सांगाती । पुढे हो फजिती यमदंड । उपाय तो सोपा नामाचा गजर । न करी विचार पुढे काही । एकाजनार्दनी तू कारे अंधळा । देखतोसी डोळा सुख दु:ख ।।४४२।।

**आपुलिया हिता आपण जागिजे** । वाया न नागविजे देही देहा । हाचि अनुताप घेउनिया मना । करी पा चिंतना रामनाम । नाही काही मोल सुलभ फुकाचे । घेई सदा वाचे रामनाम । एकाजनार्दनी किती हे सांगावे । गुंतले ते हावे नायकती ।।४४३।।

**कां रे नागविसी काळा** । मानिसी संसार सोहळा । शेवटी तो गळा । यम पाश पडतील । वाचे ह्मणे रामनाम । आणीक नको दुजे काम । मोक्ष मुक्ति धाम । नामे एका जोडती । वाउगे जप तप कर्म । याचा न धरी संभ्रम । वाचे गाय सदा नाम । तेणे सर्व जोडतसे । एकाजनार्दनी नेम । कायावाचा मने सप्रेम । वाचे स्मरतसे नाम । श्रीराम सर्वदा ।।४४४।।

**अशाश्र्वत देह काळाचे भातुके** । पंचप्राण कौतुके खेळ तेथे । जीव शिव दोन्ही मध्य बैसकार । व्यापारी व्यापार सर्व त्याचा । जीव गुंतलासे विषयाचे वोढी । शिव जाणे गोडी आत्मस्वरूप । ऐसा हा खेळ अनादि पसर । एकाजनार्दनी निर्धार नाम जपा ।।४४५।।

**देहाचिया माथा काळाची तो सत्ता** । म्हणोनी सर्वथा धोका राम । आदि मध्य अंती काळ लागलाहे । क्षणक्षणा पाहे वास त्यासी । सर्व जाणोनिया अंधळे पै होती । काळ नेताचि देखती ते दुजा । परि रामनामी न धरिती विश्र्वास । निकट समयास धावाधावी । एकाजनार्दनी भुलले ते प्राणी । तया सोडवणी कोण करी ।।४४६।।

**येवोनिया काळ बैसलासे उसां** । झाकितोसी कैसा डोळे आता । वाचे नारायण वदे तू सादर । काळपाश साचार चुके जेणे । वाया हा संसार करसी हाव भरी । काळाची तो फेरी निकट आली । एकाजनार्दनी नको यातायाती । संसार फजिती जन्म दु:ख ।।४४७।।

**आलारे आला आला काळ निकटी** । रामनाम होटी केव्हा जपसी । बाळ तरुण वृद्ध दशा ती पावली । काळाची पडली छाया अंगी । यातायाती करता जन्म वाया गेला । परी नाही वदला मुखी राम । एकाजनार्दनी फजितखोर जीणे । सर्वचि मरणे पुढती जन्म ।।४४८।।

**देह हा काळाचा जाणार शेवटी** । याची धरुनी मिठी गोडी काय । जाणार जाणार हे विश्र्व । वाउगाचि सोस करसी काय । प्रपंच काबाड एरंडाचे परी । रसस्वाद तरी काही नाही । नाशिवंतासाठी रडतोसी वाया । जनार्दनी शरण निघे तू पाया । एकाजनार्दनी भेटी होता संतांची । मग जन्ममरणाची चिंता नाही ।।४४९।।

**सावधान सर्व आहे** । तुझे हात आणि पाय । तोवरी तू जाय । तीर्थयात्रेकारणे । सरलीया आयुष्यकाळ । इंद्रिये होतील विकळ । काही न चाले बळ । वाउगी ते तळमळ । डोळे कान नाक आहे । तोवरी संता शरण जाय । ही मावळलीया होय । हायहाय तुजलागी । काय म्हणशी माझे माझे । हे तो शेवटीचे वोझे । एकाजनार्दनी दुजे । तुज कोण सोडवील ।।४५०।।

**काय याची मुखी बैसे दातखीळ** । नोमोच्चारा बळ क्षीण होते । काय याचे कर्ण बधिर पै वहिले । हरिकीर्तनी जाहले पांगुळ ते । काय याचे नेत्रा अंधत्व ते आले । न देखती सावळे रूप कधी । एकाजनार्दनी ऐसा तो चांडाळ । त्याचा मज विटाळ नको नको ।।४५१।।

**सुखरूप असता ह्मणे माझे माझे** । संकट देखोनिया घाली देवावरी वोझे । पापि तो अधम मती । कदा नेणे नामस्मरण गति । नामावाचोनि गति नाही । ऐसे वेदशास्त्रे बोलती पाही । इजाजनार्दनी ह्मणे भुलला । पुनः अधम जन्मा आला ।।४५२।।

**होई शरणागत भाकिरे करुणा** । तरीच बंधना चूकशील । आपुले तू हित करुनिया घेई । सदा वाचे गाई रामनाम । जववरी आहे इंद्रिय संबंध । तोवरी तू बोध करी मना । एकाजनार्दनी मावळलिया दीप । सहजचि खेप येईल बापा ।।४५३।।

**चौऱ्यायशी लक्ष योनी फिरे** । परि मनी सोय न धरे । दोचि अक्षराचे काम । अधम नुचारी रामनाम । मरतीया हासे । आपण स्वये मरतसे । एकाजनार्दनी भांड । जन्मोनी लाजविली रांड ।।४५४।।

**चौऱ्यायशी लक्ष देहाप्रती** । कोटी कोटी फेरे होती । अवचट देह मनुष्य जन्म । तेथे साधावे परब्रह्म । जन्मोनिया मनुष्य देही । परमार्थ साधिला तो नाही । सदाविषयी अनुसंधान । भुले प्रपंची अनुदिन । तया नोहे संत भेटी । एकाजनार्दनी जाता भेटी ।।४५५।।

**देहाची तो देह जोडी** । साधी परमार्थ घडी । हेचि निकारे साधन । येणे न घडे बंधन । देही देह शुद्ध पाहे । सहज परमार्थ हाये । सांडोनिया देही आटी । एकाजनार्दन ती भेटी ।।४५६।।

**आयुष्य देहीचे जव पुरले नाही** । तवचि हृदयी राम जपा । आपुलेच देही करा सोडवण । चुकवा पतन यमलोकी । संसाराचा छंद वाउगा पसारा । यात सैरावैरा हिंडू नका । एकाजनार्दनी धरा भरवसा । श्रीराम सरसी वाचे वदा ।।४५७।।

**तू ह्मणशील बा हे माझे माझे** । वाया वाहसी वाउगे ओझे । सोडी दे टाकूनि परता येई । रामनाम वाचे सदा गाई । नामाचि जाण सत्य सार । वाया का वाहशील भार । एकाजनार्दनी नाम सार । वेदशास्त्री हा निर्धार ।।४५८।।

**जन्ममरणाच्या चूकवारे खेपा** । यासी तो सोपा राममंत्र । वेळोवेळा वाचे उच्चाराचे नाम । तेणे निष्काम प्राणी होय । सायास नाही अनायासे वर्म । वाचे रामनाम आठवावे । एकाजनार्दनी नामाविण काही । आणिक थोर नाही कलीमाजी ।।४५९।।

**सांडा वाउगे ते बोल** । वाचे ह्मणा विठ्ठल विठ्ठल । तेणे तुटती यातना । भवपाश तुटेल जाणा । बैसला जिव्हारी । व्यापुनि ठेला तो अंतरी । एकाजनार्दनी ध्यान । ध्यानी मनी विठ्ठल पूर्ण ।।४६०।।

**सीमगियाचे सुणी** । रामकृष्ण न ह्मणे कोण्ही । महाशब्द उच्चारण । कैसे भुलले अज्ञान । गजरे शब्द करी । एका जनार्दनी ह्मणा हरी ।।४६१।।

**नामाचा उच्चार करता कोण्ही हासे** । तयासी होतसे नरकवास । साबडे बोबडे गावोत भलते । परि ते सरते पांडुरंग । अभाविकाने मांडिला पसारा । तया नाही थारा उभयलोकी । एकाजनार्दनी भावाचे भजन । दंभाचे कारण नाही देवा ।।४६२।।

**नेणतेपणे पांडुरंग ध्याई** । सदोदित गाई रामनाम । मग तु सोपे मार्ग ते असती । पांडुरंग चित्ती दृढ धरी । एकाजनार्दनी कायावाचा मन । करी समर्पण देवापायी ।।४६३।।

का रे नायकसी गव्हारा । कारे न भजसी ईश्र्वरा । सोपा मंत्र विठ्ठलराज । तेणे पुरे सर्व काज । नको संसाराचे कोड । अंतकाळी यमदंड । एकाजनार्दनी कीव भाकी । रामनाम वदा सुखी ।।४६४।।

**मंत्रामाजी मंत्र विठ्ठल त्रिअक्षरी** । जपता निर्धारी सुख होय । म्हणोनिया करा लागपाठ बळे । संसारी अंधळे होऊ नका । संसारसागर भरला दुस्तर । विठ्ठल पैलपार नौका जगी ।

तापत्रये तापली भवार्णवी पीडिली । तया विठ्ठलवल्ली प्रकाशली । जाणिवेचे डोही नको पडू फेरे । विठ्ठल उच्चारे कार्यसिद्धि । एकाजनार्दनी विठ्ठलाची आण । दुआ तारी कोण मज सांगा ।।४६५।।

**एकवेळ वाचे वदे का रे नाम** । निरसे सर्व श्रम भवदु:ख । नाम हे नौका नाम हे नौका । जगी तारक देखा भाविकासी । एकाजनार्दनी नाम हे अमृत । सेविता त्वरित मुक्ति होय ।।४६६।।

**घ्यावया वोखादाची वाटी** । माता साखर चिमुटी । तेणे घोटी गोडपणे । हारे व्याधी नाना पेणे । तयासाठी घाबरी । माता होय ती निर्धारी । शरण एकाजनार्दनी । तैसा निरसे लोभे ठेवा मज ।।४६७।।

**भवरोग औषध जाण** । नाममात्रा नारायण । तेणे निरसे भवरोग । न लगे साधन अष्टांग । कामक्रोधाची झाडणी । नामे होय तक्षणी । एकाजनार्दनी नाममात्र । उध्दरील कुळगोत्रा ।।४६८।।

**सुख एक आहे हरि आठविता** । इतर जपता दु:ख बहु । ऐशी आठवण धरुनी मानसी । हरि गावा मुखासी दिननिशी । सारे दिन करा संसाराचा हेत । परी भजनी प्रीत असो द्दयावी । एकाजनार्दनी धरुनि विश्र्वास । होई का रे दास संतचरणी ।।४६९।।

**नाथिलाचि देह नाथिला प्रपंच** । नाथिली कचकच अवघे वाव । नाथिली कचकच अवघे वाव । नाथिलेचि दान नाथिलेचि धर्म । नाथिलेचि कर्म नाथिले हे । नाथिला आचार नाथिला विचार । नाथिला अविचार सर्व देही । एकाजनार्दनी नाथिलाचि देह । नाथिला संदेह मिथ्या जाणा ।।४७०।।

**स्वप्नवत देह स्वप्नवत संसार** । नाही पारावर दु:खा तेथे । काय त्याची गोडी लागलीसे मूढा । नाचतो मोकाडा गारोडयाचा । स्त्री पुत्र धन कवणाचे ते आप्त । वाया भुलले चित्त म्हणे माझे । सावध होऊनी गाये रामनाम । एकाजनार्दनी विश्राम तेणे तुज ।।४७१।।

**संसार असार जाणोनी निर्धार** । केलासे विचार सनकादिकी । नामी आतुडले नामी आतुडले । साधन साधिले हेचि एक । अर्जुना उपदेश हाचि सांगे कृष्ण । एकाजनार्दनी खूण बाणलीसे ।।४७२।।

**जिता मायबापा न घालिती अन्न** । मेल्या प्रेतावरी करिती पिंडदान । पहा पहा संसारीचा कैसा आचारु । जिता अबोला मा मेल्या उच्चारु । जित्या मायबापा न करिती नमन ।

मेल्यामागे करिती मस्तक वपन । जित्या मायबापा धड गोड नाही । श्राद्धी तळण मळण परवडी पाही । जित्या मायबापा गाली प्रदान । मेल्या त्याचेनी नावे देती गोदान । जित्या मायबापा नेदी प्याया पाणी । मेल्या पितरालागी बैसता तर्पणी । प्याया पाणी न घालिती सासरा जिता । पिंडापाशी येती मग दंडवता । एकाजनार्दनी कृपेचे तान्हे । विधिनिषेध दोन्ही आतळो नेदी मने ।।४७३।।

**वैर करुनी मन मारावे** । मनाधीन पै न व्हावे । मनामागे जाऊ नये । मन आकळूनी मन पाहे । मन ह्मणे ते न करावे । मनी मनासी बांधावे । मन म्हणेल ते सुख । परी पाहता अवघे दु:ख । एकाजनार्दनी मन । द्दढ ठेवावे आकळून ।।४७४।।

**पांथस्थ घरासी आला** । प्रात:काळी उठोनी गेला । तैसे असावे संसारी । जैसे प्राचीनाची दोरी । बाळी घराचार मांडिला । तो सर्वेचि मोडूनि गेला । एका विनवी जनार्दना । ऐसे करी गा माझ्या मना ।।४७५।।

**कैचे ध्येय ध्याता ध्यान** । अवघे विषयावरी मन । तेथे कैचे कर्माचरण । सदा विषयीच मन । कैचा दोष कैचा गुण । अवघे विषयीच मन । कैचा बोध कैचा भेद । सदाविषयी तो धुंद । ऐसा भुलोनि विषयी । एकाजनार्दनी बुडे पाही ।।४७६।।

**ऐसे लागलिया ध्यान** । अंतःकाळी ठसावे मन । म्हणोनि भोगक्षये जाण । मागील देहाचे अनुसंधान । मागील सांडीरे दगडा । का घालिसी पायखोडा । भुलोनि जाऊ नको वाया । एकाजनार्दनी लागे पाया ।।४७७।।

**लटिका संसार** । वाचे उच्चारी हरिहर । तरी दु:ख निरसन । मना होय समाधान । नित्य करी संतसेवा । शुद्धभावे भजे देवा । एकाजनार्दनी घाला । तोचि संसार तरला ।।४७८।।

**उपाय यासी एक आहे** । जो या जाय शरण विठ्ठला । मग न चले काळाचे बळ । घेता सरळ नाम वाचे । आह्मा आलीसे प्रचित । म्हणोनी मात सांगतो । शरण एकाजनार्दनी । विठ्ठल वदनी उच्चारा ।।४७९।।

**दुबळ्यासी धन** । सापडलिया नोहे जतन । अभाविकासी नाम जाण । तैशा रिती । धनलोभियाचे परी । जैसे चित्त धनावरी । तैसा न कळे आप्तजन । जैसा पारध्याधीन । मग होय । अभाविकाचे बोल । नव्हती ते फोल । एकाजनार्दनी मोल । तया नाही वेंचत ।।४८०।।

**जगाची ती रहाटी** । जैसी अंधाहाती दिली काठी । चिखलाची पाउटी । काय मार्ग दिसे । तैसे भुलोनिया जन । गेले ह्मणती माझे जाण । वा कणवाचे कवण । कामा नये शेवटी । चालतो पाहतो ऐकतो कानी । दुजियाचे गुणदोष मनी । नका आणू चुकवा पतनी । पुढील पैंणे अंतरु नका । हेचि बोधाचे लक्षण । धरा हृदयी याची खुण । शरण एका जनार्दन । वारंवार विनवितसे ।।४८१।।

**देह अशाश्र्वत नाम हे शाश्र्वत** । म्हणोनी विवादत श्रुति शास्त्रे । नशिवंतासाठी रामनाम तुटी । संसाराची आटी करिती जन । जडत्व पाषाण नामेचि तरले । अभेदे भरले देह ज्याचे । शुद्धभाव पोटी वासना निर्मळ । संकल्प वरळ नव जाती । एकाजनार्दनी द्दढ हा निश्र्चय । राम सखा होय तयालागी ।।४८२।।

**नाकळे जो आकळ** । भक्ति प्रेमाचा वत्सल । रूप धरुनि कोमळ । भीमातटी उभा । त्याचा छंद असो जनी । कायावाचा आणि मनी । संचिताची हानी । कदा काळी न होवो । जे जे होत कर्माकर्म । अथवा उत्तम ते धर्म । प्राचीन ते कर्म । तया पासूनी सोडवी । एकविध धरी भाव । मागे देवापदी ठाव । संचिताची हाव । तयापाशी नुरेची । ऐसा बळकट करी नेम । धरी संतसमागम । एकाजनार्दनी धाम । पावसी तू वैकुंठ ।।४८३।।

**प्रपंची सदा सक्त** । रामनामी नाही चित्त । तया ह्मणावे ते काय । व्यर्थ शिणविली माय । वाया जिणे पै तयाचे । सदा मान दंभी नाचे । एकाजनार्दनी शरण । तया सोडवील कोण ।।४८४।।

**जोडोनिया धन नाशी वेश्या घरी** । अतिथी आलिया व्दारी नाही म्हणे । वेश्या ती अमंगळ जग भुलवणी । पडे निशिदिनी तेथे श्र्वान । घरी कोणी अभ्यागत आलिया मागता । धावतो सर्वथा श्र्वानासम । एकाजनार्दनी ऐसा दुराचार । नरक अघोर भोगिताती ।।४८५।।

**वेश्येचिया घरा जातो उताविळा** । जातांची देऊळा रडतसे । काय ऐशा पामरा सांगावे गव्हारा । भोगिती अघोरा नरकवासा । एकाजनार्दनी नको त्याचा संग । अंतरे पांडुरंग तयाचेनी ।।४८६।।

**कन्येचा करी जो नर विकरा** । चांडाळ तो खरा अधमचि । तयाचिया मुखी श्र्वानाची ते विष्ठा । पातकी वरिष्ठा सर्वाहुनी । पंचमहापातकी विश्र्वास घातकी । या परता दोष की तया अंगी । एकाजनार्दनी त्याचे नाम घेता । सचैल सर्वथा स्नान कीजे ।।४८७।।

**गौ आणि कन्या कथेचा विकरा** । चांडाळ निर्धारा पापराशी । तयाचे ते मुख न पाहती जन । अपवित्र दुर्जन पातकी तो । एकाजनार्दनी दोषा न परिहार । भोगिती अघोर कल्पकोटी ।।४८८।।

**डोळा न दिसे न्याहारी** । दृष्टी जाली पाठीमोरी । अझुनी काईसा रे मोहो । मिथ्या विषयाचा संदेहो । कानी बैसलीसे टाळी । आली यमाची उथांळी । अंग वाळले काचरी । चंद्रबिब चढले शिरी । शिस्न अंगुळी सांडू मागे । मूखी चोरपान्हा लागे । नाना विषयी करीन सुखी । ह्मणता स्त्री प्रत्यक्ष थुंकी । वेश्या धन घेउनी सांडी बोला । स्त्री वार्धक्ये घाली टोला । अग्नि आवचल्या पोळी । पुत्र नाना स्नेह जाळी । लाळ सुटलीसे तोंडे । तरि खेळवी नातुंडे । बळ प्रौढी स्त्री ने धन । क्षीण जाल्या उदासीन । पाठी बैसविली आवडी । शेखी नागउनी सोडी । पुरुष वार्धक्य नावडे । मेल्या कानकेशा रडे । दात पडोनी सांगे गोष्टी । नाक लागतसे हनुवटी । मोह ममता सांडी काम । अखंड जपे रामनाम । रामनामे होईल हित । येरव्ही बुडाले स्वहित । एकाजनार्दनी पुरा । बालतारुण्य न रिघे जरा ।।४८९।।

**नाशिवंत सकळीक** । शाश्र्वत माझा नायक । बरवे मजला कळले । पूर्वपुण्य ते फळले । प्रपंच अवघा दु:खरूप । सुखरूप आत्मस्वरूप । स्वरूप रमल्या भय नाही । एकाजनार्दनी पायी ।।४९०।।

**अवघा वाया संसार** । अवघा सार विठ्ठल । अवघे आले वाया जाती । फजिती हे समजेना । अवघे नरदेही चोर । अवघा सार विठ्ठल । अवघे वाया जाते जन्म । अवघे कर्म चुकेना । अवघा लटिका साच नव्हे । अवघा वाया जात असे । अवघा जनी भरला । एकाजनार्दनी उरला ।।४९१।।

**शिणल्या भागल्या विठोबाचे नाम** । विश्रातीचे धाम पंढरपूर । म्हणोनिया करा नामाचाचि लाहो । पंढरीचा नाहो पहा डोळा । एकाजनार्दन पुरवील आशा । पंढरीनिवासा पहाताची ।।४९२।।

**तोचि एक संसारी** । वाचे हरिनाम उच्चारी । न करी आणिक पै धंदा । नित्य आठवी गोविंदा । हरिनाम चिंतना । ज्याची रंगली रसना । एकाजनार्दनी संत । ज्याचे समाधान चित्त ।।४९३।।

**चौऱ्यायशी भोगिता** । दु:ख न सरे सर्वथा । संतसमागम घडता । दु:ख नासे तात्काळ । नको गुंतू या संसारी । पडसी काळाचे आहारी । संतसमागम धरी । तै यातना चुकती । मागे बहुतांचा उद्धार । संती केलासे साचार । तोचि हा धरी निर्धार संतसंग सर्वदा ।

एकाजनार्दन शरण । संतसंग सुलभ जाण । भोळ्याभाविका तारण । समागम संतांचा ।।४९४।।

**आशापाश सोडोनी देई** । संतांसी तू शरण जाई । चौऱ्याशीचे भय नाही । प्राणिया तुज । आवडी धरी संतसंग । कमक्रोधा होय भंग । षडवैरीया मार्ग । मोकळाची । संतसंग धरता चित्ती । उपाधी ते सर्व तुटती । भावे होय मोक्षप्राप्ती । क्षणमात्रे । नाही आणीक साधन । संतसंगतीवाचून । शरण एकाजनार्दन । सतसंग धरी ।।४९५।।

**पळभरी संतसंगती** । कोटीयुगे तया विश्राती । ऐसे बोलतसे श्रुती । पाहे पा जना । वेदशास्त्र पुराण । महिमा संताचाचि जाण । शुक्रादिक रंगून । रंगले रंगी । अर्गुना उपदेशिले । उद्धवाते बोधिले । व्यासादिक रंगले । हृदयी सदा । ते द्दढ हृदयी धरी । आणीक नको पडू फेरी एकाजनार्दनी धरी । हृदयामाजी ।।४९६।।

**देही धर्म विहित करी** । अव्दैत भाव चित्ती धरी । सर्वभावे नमस्कारी । एक आत्मा ह्मणोनी । तेणे तुटे ते बन्धन । वाचे जपे जनार्दन । आणिक नकोरे साधन । रामकृष्ण स्मर सुखे । पवित्र त्याचे हे कुळ । आचार त्याचाची सुशीळ । अखंड जे सर्वकाळ । नाम जपती । एकाजनार्दनी नाम । परब्रह्म ते निष्काम । हरे भवश्रम । जन्मजराव्याधी ।।४९७।।

**येणे पंथे बहुत तरले निश्र्चिती** । आवडी जे गाती विठोबासी । तारक हा मंत्र सोपा पै सर्वासी । उच्चारिता अहर्निशी सर्वसिद्ध । पापा प्रायश्र्चित्त कलीयुगी नाम । आणिक सोपे वर्म संतसेवा । न लगे दंडन मुंडन ते आटी । नाम घेता होटो सर्व जोडे । एकाजनार्दनी संतासी शरण । चुके जन्ममरण नानापीडा ।।४९८।।

**भाव धरी का रे साचा** । उच्चार करी नामाचा । पंथ विठोबाचा । द्दढ धरी । विठ्ठल विठ्ठल वाचे । वदे का रे तू साचे । दोष जातील जन्माचे । संदेह नाही ।  क्षणभरी । वाचे उच्चारी श्रीहरी । यमयातना बोहरी । तेणे होय भक्ति द्दढ नामी । पडू नको वाउगा श्रमी । विठोबाचे नामी । विश्र्वास धरी । पतीत पावन । नाम हे सत्य वचन । एकाजनार्दनी चरण । द्दढ धरी ।।४९९।।

**दस्तुर सायास न करी** । वाचे ह्मणे हरीहरी । वैभव कुंठ पायरी । सोपी तेणे । ते नाम विठोबाचे । सुलभ वदे का रे वाचे । अनंता जन्माचे । दोष जाती । प्रचीत पाहे अर्धक्षण । नाम उच्चारीरे जाण । तेणे तुटे भवबंधन । यमदूताचे । नाम घेता उठाउठी । पातकाच्या

पळती थाटी । पूर्वज उध्दरती कोटी । बेटाळीसासहित । एकाजनार्दनी प्रेम । गाई तू विठ्ठलनाम । आणिक सोपे वर्म । नाही नाही ।।५००।।

**घाली देवावरी भार** । आणिक न करी विचार । योग क्षेम निर्धार । चालविल तुझा । वाचे गाय नामावळी । वासुदेवी वाहे टाळी । प्रेमाचे कल्लोळी ।नित्यानंदे सर्वथा । सोस घेई कारे वाचे । रामकृष्ण वदता साचे । धरणे उठते यमाचे । नि:संदेह । शरण एकाजनार्दनी । करी रामनाम ध्वनी । कैवल्याचा दानी । रक्षी तुज निर्धारे ।।५०१।।

**नेमधरी विठ्ठलनामी** । पडू नको वाउगा भ्रमी । सांगतसे गृहस्थश्रमी । साधन सोपे । करी नामस्मरण । वाचे ह्मणे नारायण । चुकेल पतन । यातायाती । इहलोक परलोक । धन्य होती सकळीक । उभय कुळ पावन देख । नाम स्मरता । कलीमाजी सोपे वर्म । उच्चारी तू श्रीराम । आणिक नको श्रम । वाउगाची । जाऊनी पाहे तू पंढरी । उभा असे विटेवरी । एकाजनार्दनी धरी । चरण त्याचे ।।५०२।।

**बहु जन्मांचे सायास** । विटे उभा हृषीकेष । पाहे पुंडलीकास । समचरणी । जाई जाई पंढरपुरा । स्नान करी तू भीवरा । जन्माचा तो फेरा । तेणे चुके । व्रत करी एकादशी । **जागरण अहंनिशी** । संतसभे सरसी । टाळी वाहे । आळस तू न करी । वाचे ह्मणे विठ्ठल हरी । सांडोनिया थोरी । नाम घे आवडी । जनी वसे जनार्दन । एका द्दढ धरी चरण । अर्पियेले तनमन । विठ्ठल वाचे ।।५०३।।

**जया म्हणती नीचवर्ण** । स्त्री शुद्रादी हीनजन । सर्वाभूती देव वसे । नीचा ठाई काय नसे । नीच कोठोनी जन्मला । पंचभूता वेगळा जाला । तया नाही का जनन । सर्वेची होत पतन । नीच ह्मणोनि काय भुली  । एकाजनार्दनी देखिली ।।५०४।।

**शास्त्रज्ञ पंडित हो का वेदवक्ते** । परी हरीभजनी रत वंद्दय सदा । भक्तिच कारण तेणे सरतेपण । वाउगाची शीण जाणिवेचा । मी एक जाणता पैल तो नेणता । ऐसा विकल्प भाविता पतन जोडे । एकाजनार्दनी विकल्प त्यजोनि । विठ्ठल चरणी मिठी घाली।।५०५।।

**साधिता साधन योगी शिणताती** । तेथे तुझी मति काय बापा । उलट उलट न करी गोल्हाट । आहे तोचि नीट पाहे बापा । पंचाग्नी साधन धुम्र पान यज्ञ । आहे तो संपूर्ण उभा बापा । साधन खटपट वाउगा बोभाट । एकाजनार्दनी नीट उभा बापा ।।५०६।।

**शिणसी कारे वाया** । वाचे वदे पंढरीराया । मग तुज नाही रे बंधन । पारुषे पा कर्माकर्म । कर्म धर्म न करी तू सोस । अवघा विठ्ठलचि देख । नको करू कुंथाकुंथी । तेणे हो तसे फजिती । अनुभव घेई देखा । एकाजनार्दनी सुखा ।।५०७।।

**जरी न बनेची गुरुवचनी** । तरी बैसोनि सहजासनी । हेचि एक निर्वाणी । साधीजे सुख । सकळी सफळपणे । अखंडरूप पहाणे । साध्य तेचि साधने । करुनी घेई । जया संतचरणी नाही भावो । त्यासी लडिवाळ संदेहो । तेथे साधनामाजी देव । दिसे कैसा । हेतु मातु अनुमाना । आकळी द्दढ एकमाना । अधिकचि कल्पना । वाढविली । जाणीव नेणीव हे वाड । कल्पनेचे समूळ झाड । तुझे तुजचि आड । उभे ठाकती । नाना हेतु विवंचना । सांडूनिया कल्पना । एकाजनार्दन । शरण रिघे ।।५०८।।

**लक्ष चौऱ्यायशी फिरता** । अवचिता लाभ हाता । उत्तम पावला नरदेह । त्याचे सार काही पाहे । नको श्रमू विषयकामा । काही तरी भजे रामा । मरण जन्माच्या खेपा । निवारी निवारी रे बापा । एकाजनार्दनी गूज सोपे । रामनाम सदा जपे ।।५०९।।

**देह सांडावा ना मांडावा** । येणे परमार्थुची साधावा । जेणे देही वाढे भावो । देही दिसतसे देवो । ऐसे देही भजन घडे । त्रिगुणात्मक देहो वावो । एकाजनार्दनी धारा भावो ।।५१०।।

**देहा ऐसे वोखटे** । पृथ्वीमाजी नाही कोठे । वोखटे म्हणोनी त्यागावे । मोक्ष सुखार्थ नागवावे । जैसे भाडियाचे घोडे । दिनु सरल्या पंथ मोडे । हेतु ठेवुनि परमार्था । एकाजनार्दनी ठेवी माथा ।।५११।।

**देह आहे तुम्हाआधीन** । तोवरी करा भजन । पडोनी जाईल शरीर । मग कराल विचार । यातना यमाची अपार । कोण तेथे सोडवणार । आला नाही अंगी घाव । तव भजा पंढरीराव । एकाजनार्दनी सांगे । वाउगे मार्गे नका जाऊ ।।५१२।।

**आलासी पाहुणा नरदेही जाणा** । चूकवी बंधनापासूनिया । वाउगाची सोस न करी सायासा। रामनाम सौरसा जप करी । यज्ञमागादिक न घडती साधने । न्यून पडता पतन सहज जोडे । एकाजनार्दनी चुकवी येरझार । करी तू उच्चार अखंड वाचे ।।५१३।।

**काय मनुष्य देहाचे होय** । नाशिवंत जाय शेवटी । हे तो काळाचे खाजे सहजी । काहीतरी राजी हरि करा । जाता आयुष्य न लगे वेळ । स्मरे घननीळ रामराणा । एकाजनार्दनी भाकी कीव । वाया हाव धरू नका ।।५१४।।

**आयुष्य सरता न लगे वेळ** । यम काळ उभाचि । म्हणोनिया लाहो करा । विश्र्वंभरा आळवावे । धरा संत समागम । करा सप्रेम कीर्तन । जावे मुखे पंढरीसी । नाचा सरसे वाळुवंटी । एकाजनार्दनी विठ्ठल भेटी । होता लाभा नोहे तुटी ।।५१५।।

**काळाची तो ऐसी सत्ता** । भरता न पुरे एक क्षण । यात काही हित करा । राम स्मरा निशिदिनी । नुमगे शेवट घडी येती । गुंतती तत्वता देह आशा । शरण एकाजनार्दनी । करा सोडवणी देहाची ।।५१६।।

**काळे काळ वाया जातु** । तेणे होये आयुष्य अंतु । जाणोनिया रक्षी कोण । सांडी देहाचा अभिमान । अभिमान सांडोनी झडकरी । एकाजनार्दनी दास्य करी ।।५१७।।

**अद्दष्टी असेल जे जे वेळे** । ते ते मिळेल ते ते काळे । ऐशी प्रारब्धांची गती । ब्रह्मादिका चुकती । जे जे होते ज्या संचिती । ते तयासवे चालती । जैशी जैशी कर्मरेषा । तैसे भोगणे सहसा । एकाजनार्दनी भोग । भोगविल्याविण न चुके सांग ।।५१८।।

**चित्त समाधाने** । सुख दु:ख सम जाणे । न करी आणीक उपाधी । निवारली आधिव्याधि । वृत्ति झाली समरस । सेवी नित्य ब्रह्मरस । एकाजनार्दनी चित्त । ब्रह्मरसे झाले शांत ।।५१९।।

**होणार जाणार न चुके कल्पांती** । वाउगे कुंथाकुंथी करुनी काय। लिहिले संचित न चुके कल्पांती । वाउगाचि भ्रांती फळ काय । एकाजनार्दनी प्रारब्धाचा भोग । करिता उद्रेग न टळेची ।।५२०।।

**नेणती ब्रह्मादिक ऐसे याचे कर्म** । द्दढाद्दढ वर्म सबळ मागे । न चुके न चुके भोगिल्या वाचुनी । वायाचि तो मनी शिण वाहे । एकाजनार्दनी शरण एकपणी । गाय चक्रपाणी एकभावे ।।५२१।।

**प्रारब्ध क्रियमाण संचिताचा भोग** । भोगिल्याची भोग तो न सुटे । ज्या जैसी कल्पना त्या तैसी भावना । अंती ते वासना जडोनी ठेली । एकाजनार्दनी वासना टाकुनी । हरीचे भजनी सावध होई ।।५२२।।

**स्वप्नी चालता लवलाही** । आढामध्ये पडिला पाही । धाबरूनी म्हणे धावा । तैसे भुलले जीवजीवा । मृगजळ भासे नीर । वाया मायेचा पसर । सावध होऊनि जव पाहे । वाया स्वप्न मिथ्या आहे । एकाजनार्दनी भुलले । वाया गेले अधोगती ।।५२३।।

**आंबिया पाडू लागला जाण** । अंगी असे आंबटपण । सेजे मुराल्याची गोडी । व्दैताविण ते चोखडी । टीकाळलेसे जे घालिती । तयासंगे दुजे नासती । अग्निपोटी निपजे अन्न । वाफ न जिरता परमात्र । एकाजनार्दनी गोडी । तोडा लिगाडीची बेडी ।।५२४।।

**मनासी खोचीले  मायेसी मोकलिले** । ते शस्त्र आपुले सज्ज करी । यापरी सैरा होय कारणी । मायाममता दोन्ही मारुनिया । जागृती स्वप्न निवटले पाहे । सुशुप्ती सळीयेली सुखाचे धाये । एकाजनार्दनी मांडीयले खळे । धुरेची जिंकिली अंगीचेनी बळे ।।५२५।।

**जेथे पापपुण्यकर्माचरण** । वाढविताहे जन्ममरण । जया पुण्याचीया गोडी । स्वधर्म जोडीताती जोडी । जया नाही हा विश्र्वास । असोनी न दिसे जगी भाव । एकाजनार्दनी डोळा । असोनी देही तो अंधळा ।।५२६।।

**देहबुद्धि खुंटली तेथे माया तुटली** । देहाची स्थिति दैवाधीन ठेली । देवाचेनी बळे देहीचे कर्म चळे । स्वसुखाचे सोहळे विदेह भावे । भोगी का त्यागी अथवा हो योगी । देही देहपण न लगे त्याच्या अंगी । एकाजनार्दनी एकपणाच्या तुटी । सहज चैतन्यासी मिनला उठाउठी ।।५२७।।

**नरदेह परम पावन** । तरी साधी ब्रह्मज्ञान । ब्रह्मज्ञानाविण । वाया होत असे शीण । ब्रह्मज्ञान प्राप्ति नाही । वाया देहत्व असोनी देही । एकाजनार्दनी ज्ञान । तेणे होय समाधान ।।५२८।।

**नरदेही येउनी करी स्वार्थ** । मुख्य साधी परमार्थ । न होता ब्रह्मज्ञान । श्र्वान सुकरा समान । पशुवत जिणे । वाया जगी लाजिरवाणे । सायं प्रातचिंता । नाही पशुसी सर्वथा । मरणा टेकले कलीवर । परी न सांडी व्यापार । एकाजनार्दनी पामर । भोगिती अघोर यातना ।।५२९।।

**ब्रह्मस्थितिचे हे वर्म** । तुज दावितो सुगम । सर्वाभूती भगवभ्दाव । अभेदत्वे आपणचि देव । संसार ब्रह्म स्फूर्ति । सांडोनिया अहंकृति । शरण एकाजनार्दन । कृपे पावला परिपुर्ण ।।५३०।।

**लहानाहुनी लहान न धरी अभिमान** । तेणे हो कारण सर्व बापा । उंचपणे पाहता वेळूचिये परि । लोहळा अंतरी नम्र होये । भक्ति करता मुक्ति संतांचे संगती । मग मनी विश्रांति हरि जोडे । एकाजनार्दनी संतांसी शरण । धरुनिया कान नाचू व्दारी ।।५३१।।

**सानपणासाठी** । गर्भवास सोसी जगजेठी । सानपण भले सानपण भले । सनपण भले संतापायी । एकाजनार्दनी सानपणावाचुनी । कैवल्याचा धनी हाता नये ।।५३२।।

**सानपणे धुरू अढली बैसला** । सानपणे केला कृतकृत्य । सानपणे प्रल्हादे साधियेले काज। । सानपणे सहज बळी पूजी । सानपणे बिभीषण शरण आला । राज्यभर केला श्रीरामे त्यासी । एकाजनार्दनी सानपणावाचुनी । ब्रह्मज्ञान जनी नातुडेचि ।।५३३।।

**उपमन्यु सान देवासी कळवळ** । क्षीरसिंधु तात्काळ दिला त्यासी । सानपणे अर्जुने साधियेले काज । श्रीकृष्ण निजगूज सांगतसे । सानपणे उद्धव झालासे विमुक्त । सानपणे तो निश्चित तरियेला । सानपणे सुख गोपाळ गौळणी । एकाजनार्दनी सदोदित ।।५३४।।

**सानपणे तरले अनंत भक्त अपार** । जाणिवेचा भार टाकुनिया । सानपणे शुक व्यास नारदमुनी । जाहले मुकुट मणी सानपणे । सानपणे गज तारिली गणिका । उध्दरीला देख अजामिळ । एकाजनार्दनी सानपणावाचुनी । न चुके आयणी प्रपंचाची ।।५३५।।

**सानपणे साधे सर्व येत हाता** । जाणिवेने तत्वता नागवशी । महापुर येता वृक्ष तेथे जाती । लव्हाळे राहती नवल कैचे । चंदनाचे संगे तरुवर चंदन । सानपणा कारण संगतीचे । संतांचे संगती अभाविक तरती । एकाजनार्दनी निश्चिती सानपणे ।।५३६।।

**जाणिवेच्या मागे होत कुंथाकुंथी** । हे तो प्रवृत्ति निवृत्ति मार्ग दोन्ही । जाणीव शाहाणीव येथे नाही काम । वाचे वदता नाम सर्व साधे । जाणिवा जाणपण नेणिवा नेणपण । दोहींचे अधिष्ठान एकनाम । एकाजनार्दनी नामापरते आन । दुसरे साधन सीण जगी ।।५३७।।

**विवाद वाद हे तो अधम लक्षण** । भक्तिचे कारण न साधे येणे । मुख्य एक करी एकविधपण । सम दरुशने देखे जगी । नर अथवा नारी असो भलते याती । वंदावे विभुती

म्हणोनिया साना सानाहुनी ।।५३८।।

**धावू नको सैरा कर्माचियासाठी** । तेणे होय द्वष्टि उफराटी । शुद्ध अशुद्धाच्या न पडे वेवादा । वाचे म्हणे सदा नारायण । एकाजनार्दनी ब्रह्मार्पण कर्म । तेणे अवघे धर्म जोडतील ।।५३९।।

**करिता वेदशास्त्र श्रवण** । गर्वाचे भरते होय गहन । करू जाता निजकर्म । कर्मक्रिया अति दुर्गम । कर्म केवल देह असे । एकाजनार्दनी ते नसे ।।५४०।।

**आशेपाशी नाही सुख** । आशेपाशी परम दु:ख । आशा उपजली देवासी । तेणे नीचत्व आले त्यासी । आशेसाठी जगदानी । मागे बळीसी स्वये पाणी । एकाजनार्दनी आशा । तिने गुंतविले महेशा ।।५४१।।

**निराशियाचे भेटी पाहे** । वैकुंठीचा राव धावे । निराशेपाशी नये व्याधी । निराशेपायी सकळ सिद्धी । निराशेचे जेथे नाव । तेथे देव घेतसे धाव । निराशेचा जिव्हाळा । एकाजनार्दनी पाहे डोळा ।।५४२।।

**नि:शेष काही नेणिजे** । ते शुद्ध ज्ञान ह्मणिजे । मा सर्व जेणे जाणिजे । ते अज्ञान कैसे बा । ज्ञान ते कवण । अज्ञान ते कवण । दोहीचे लक्षण । पाहते पहा । ज्ञानाचे जे ज्ञातेपण । तया नावची अज्ञान । अज्ञानाचे जे ज्ञान । तया नाव शुद्ध ज्ञान । ज्ञान ते अज्ञाना आले । अज्ञान ते ज्ञाना गेले । एकाजनार्दनी मुले । बागुलाची दोनी ।।५४३।।

**एक म्हणती आत्मा सगुण** । एक म्हणताती निर्गुण । एक प्रतिपादिती भेद । एक प्रतिपादितसे अभेद । एक ह्मणती मिथ्या भूत । प्रत्यक्ष दिसत जो येथे । ऐसे नानाभेद वाद सकळ । विचारीता अज्ञान मूळ । अज्ञान ते मिथ्या जाणा । शरण एकाजनार्दना ।।५४४।।

**सुटलो ह्मणता बांधता होता** । मुक्त ह्मणे त्याचे अंगी ये बद्धता । बद्धता नाही तेथे मुक्त ते काई । भ्रांती दो ठाई झोंबतसे । स्वप्नीचेनि सुखे सुखासनी बैसे । जागा जालिया काहीच नसे । एकाजनार्दनी एकपणा तुटी । बद्ध मोक्षाची तेथे वार्ताही नुठी ।।५४५।।

**अविश्र्वासा घरी** । विकल्प नांदे निरंतरी । भरला अंगी अविश्र्वास । परमार्थ तेथे सदा भूस । सकळ दोषांचा राजा । अविश्र्वास तो सहजा । अविश्र्वास धरिता पोटी । एकाजनार्दनी नाही भेटी।।५४६।।

**मूळ नाशाशी कारण** । कनक आणि स्त्री जाण । जो न गुंते येथे सर्वथा । त्याचा परमार्थ पुरता । जया सुख इच्छा आहे । तेणे एकांतासी रहावे । द्दष्टी नाणी मनुष्यासी । तोचि परमार्थाची राशी । एकाजनार्दनी धन्य । त्याचा परमार्थ पावन ।।५४७।।

**अविश्र्वासापुढे** । परमार्थ कायसे बापुडे । अविश्र्वासाची राशी । अभिमान येतेसे भेटीसी । सदा पोटी अविश्र्वासाची । तोचि देखे गुणदोषांसी । सकळ दोषां मुकुटमणी । अविश्र्वास तोची जनी । एकाजनार्दनी विश्र्वास । नाही त्यास भय काही ।।५४८।।

**परमार्थ सोयरा अहोरात्र करी** । गाई निरंतरी रामकृष्ण । नरदेह यातना चुकतील फेरे । वायाहावभरी होऊ नको । रात्रदिवस करी नामाचाचि पाठ । मोक्षमार्ग फुकट प्राप्त होय । एकाजनार्दनी नामापरते सार । न करी विचार आन दुजा ।।५४९।।

**शुद्धभावे गावे नाम श्रीहरीचे** । भेदभाव साचे टाकुनिया । भोळे भाविक ज्याचा आहे देव जवळा । टवाळास निराळा भास दिसे । अविश्र्वासीयासी होय बोध वाया । ब्रह्मज्ञान तया सांगून काय । एकाजनार्दनी अभाविक खळ । बोध तो सकळ जय वाया ।।५५०।।

**पक्षी अंगणी उतरती** । ते का गुंतोनिया राहती । तैसे असावे संसारी । जोवरी प्राचीनाची दोरी । वस्तीकर वस्ती आला । प्रात:काळी उठोनी गेला । शरण एकाजनार्दन । ऐसे असता भय कवण ।।५५१।।

**विषयी होऊन उदास** । सांडी संसाराची आस । ऐशी मुक्ताची वासना । मुमुक्षु चिंती तुझ्या चरणा । ब्रह्मज्ञान लाळ घोटी । येरा वाउगी ती आटी । शब्द नि:शब्द खुंटला । एकाजनार्दनी देखिला ।।५५२।।

**विषयवासना भाजी त्याचे मूळ** । मग सुख कल्लोळ प्राप्ति तुज । आशेचे काबाड कल्पना सगळी । उपटोनि मुळी टाकी परती । भेदाचे भांडे वैराग्याचे हाते । धुवोनी सरते करी बापा । शांतिचेनि सर्वे धरी वेगे सोय । एकाजनार्दनी पाय पावशील ।।५५३।।

**विकल्प वासना समूळ दे टाकुनी** । मग तुज भजनी सुख बापर । आशापाश मोह सांडी तू निराळा । भजन ते गोपाळा प्रिय वाटे । भेद अभेदाचे मूळ आधी खंडी । भजन ते तोंडी मग गोड । एकाजनार्दनी शुद्ध हे वासना । तै नारायणा प्रिय भक्ति ।।५५४।।

**विषयांच्या व्यथे दु:ख भोगिती अघोर** । तया दुजा थार कोठे नाही । शुद्ध करुनि मन घ्यावे रामनाम । संतांचे पूजन क्रिया हेचि । उपदेश किती सांगावा वेळोवेळा । अमंगळ अंधळा नेणे काही । एकाजनार्दनी विषयाच्या संगे । कर्मकांड लागे भोगणे तेथे ।।५५५।।

**भुलले पामर नेणती ते शुद्धी** । बुडतील भवनदी माजी जाणा । ह्मणवोनि येते करुणा । परी संतचरणा न लागती । खरे खोटे ऐसे न कळचि जीवा । का न भिती भेवा यमाचिया । एकाजनार्दनी किती हे सांगावे । उगवेना दावे गळा बंध ।।५५६।।

**देहबुद्धि सांडी कल्पना दंडी** । वासनेचि शेंडी वाढवु नको । तू ते तूचि पाही तू ते तूचि पाही । पाहुनिया राही जेथीच्या तेथे । तू ते तूचि पाही जेथे देहो नाही । मीपणे का वाया गुंतलासी । एकाजनार्दनी मीपण तूपण । नाही नाही मज तुझेची आण ।।५५७।।

**निज द्दष्टीवरी जाण** । काम निवारी दारूण । याचा नको घेऊ वारा । सैर सांडी हा पसारा । कामक्रोधाचे हे बंड । याचे छेदी विवेके तोंड । शांति क्षमा धरुनि आधी । ब्रह्मज्ञान मग साधी । हेचि भक्ताचे लक्षण । सांगे एकाजनार्दन ।।५५८।।

**सर्वभावे सुख असता घेई अनुताप** । मग करी संकल्प भजनाचा । ऐसा अनुताप घडता मनासी । भजन ते मुखासी येत स्वभावेचि । एकाजनार्दनी अनुतापाविण । भजन प्रमाण नोहे देवा ।।५५९।।

**अनुताप नाही ज्यासी** । विवेक नुपजे मानसी । मुख्य पाविजे अनुताप । तेणे निरसे त्रिविध ताप । अनुतापावाचून । ब्रह्मज्ञान होय दीन । एकाजनार्दनी शरण । तैच अनुताप बाणे पुर्ण ।।५६०।।

**वैराग्य अनुताप जाहलियावाचून** । रामनाम वदनी नये बापा । मुख्यत्वे कारण साधी हे भजन । येणे समाधान होय बापा । विरक्ती हेही जाहलियावाचुनी । शांति समाधानी नये बापा । एकाजनार्दनी सत्संगावाचुनी । जन्माची आयणी न चुके बापा ।।५६१।।

**अनुतापावाचुनी नाम नये मुखा** । वाउगाचि देखा शीण होय । मुख्य तो संकल्प अनुताप वाहे । मग चित्त होय शुद्ध तेणे । अनुताप जाहलिया सहज समाधी । तुटेल उपाधी सहजचि । एकाजनार्दनी अनुतापे पाहे । मग देव आहे जवळी तया ।।५६२।।

**मुख्य पाहिजे अनुताप** । हेचि वैराग्याचे रूप । कोरडया त्या ज्ञान गोष्टी । अनुताप नाही पोटी । अनुतापाविण ज्ञान । कदा नोहे समाधान । एकाजनार्दनी तप । अनुताप हेचि देख ।।५६३।।

**सावध पहाता तुम्ही ज्ञानाचे अज्ञान** । मानु तोचि म्हणे महंता महाधन । ज्ञानाचे अज्ञान कवण ज्ञाता फेडी । अनुतापाची जव जीवी नाही आवडी । नश्र्वर देह म्हणोनी ज्ञानेचि निंदिजे । तोचि देह घेउनी ज्ञातपणे फुंजे । सच्चिदानन्द माया या नावे । याहुनी परती स्थिती ते ते ज्ञान जाणावे । एकाजनार्दनी अनुतापाची गोडी । ज्ञाना ज्ञानाची तोडोनी सांडिली बेडी ।।५६४।।

**प्रकाशभासे सर्पाकार** । सर्प नसोनी जेवी दोर । कृष्णवर्ण रक्त श्र्वेत । स्फटिकी जेवी भासत । ऐशी त्रिगुणाची मिळणी । शरण एकाजनार्दनी ।।५६५।।

**साधक सर्वदा पुसती** । कोण बाधा चित्तवृत्ती । एकाचेगुण जै पुरता जोडे । तै एकविधा वृत्ति वाढे । एकचि न जोडे गुणावस्था । यालागी नोहे एकविधता । एकाजनार्दनी पुर्ण । चित्तचैतन्य संपूर्ण ।।५६६।।

**पहा कैसा देवाचा नवलावो** । पाहे तिकडे अवघा देवो । पहाणे परतले देवे नवल केले । सर्वही व्यापिले काय पाहो । पहाणियाचा ठाव समूळ फिटला । अथवा देही दाटला देव माझ्या । एकाजनार्दनी कैसे नवल जाहले । दिशाद्रुम दाटले देहे सहजी ।।५६७।।

**तेजाचे जे तेज तेचि परब्रह्म** । परम मंगलधाम त्यासी हाणती । तेचि नमियेले कर । व्यापुनी चराचर भरलेसे । एकाजनार्दनी तोचि पुरूषोत्तम । मनासी आराम तया ठाई ।।५६८।।

**चतुर्भुज श्याममूर्ति** । शंखचक्र ते शोभती । पितांबर वैजयंती । रुळती गळा । देव देखिला देखिला । तेणे संसाराचा ठावो पुशिला । विदेही तो भेटला । भक्त तयाते । दोघा होताचि मिळणी । नुरे देव भक्तपणी । फिटली आयणी । सर्व कोड कठीण । छंद पाहिजे नामाचा । निश्र्चयो कायामने वाचा । एकाजनार्दनी त्याचा । देव होय अंकित ।।५६९।।

**ब्रह्मादिक देव त्यांचे रंगी नाचती** । सनकादिक त्याचे ध्रुपद धरिती । त्यापुढे गीत नृत्य करिती । त्यापुढे मानव केवी ताल धरिती । हरिहरिहरि ह्मणता वाचे । हरिरंगी नाचे तोचि धन्य । शास्त्राची व्युत्पत्ती प्रसन्न वागेश्र्वरी । ती सारजा मुख्य करी नृत्य तेथे । शास्त्र अभिमाने चढला ताठा । मुक्ती ते फुकटा अंतरले । एकाजनार्दनी स्वहिता तू नाचे । बोलणे अभावाचे बोलू नको ।।५७०।।

**हरिकीर्तनालागी प्रल्हादगाढा** । व्दंव्दाचा रगडा तेणे केला । कोरडिया काष्टी प्रकटले हरि । म्हणवोनी नृत्य करी तयापुढे । विणा वहातु गातु नारदु नाचे । न कळे तयाचे महिमान । जनाभिमाने धरिली प्रतिष्ठा । वंचला करंटा मुक्तीसीच । साच अथवा लटिके नाचतु रंगी । अभिमान भंगी पै होय । निराभिमानिया जवळीच देवो । एकाएकी भावो जनार्दनी ।।५७१।।

**जाणा याचा तुम्ही भाव** । देही देव प्रकटे । एकविध भक्ति करा । तेणे भरा धावतो । सर्वभावे अर्पा मन । हेचि साधन तुह्मासी । संसाराचा नका धोक । सर्व देख पुरवितो ।

लाजतसे आपुल्या नावा । म्हणोनी सेवा करी त्याची । ब्रीद साच हे जगी । नुपेक्षी यालागी दीनाते । एकाजनार्दनी ठाव धरा भाव द्दढ मनी ।।५७२।।

**कायीक वाचिक मानसिक भाव** । ठेवी हा नि:संदेह देवापायी । काय उणे मग न लगे साकडे । उगवेल कोडे व्दैताचे ते । आशा मनीशा तृष्णा पडतील वोस । धरिता उल्हास रामनामी । एकाजनार्दनी विश्र्वास हो मनी । प्रत्यक्ष पुराणी बोलिले ते ।।५७३।।

**आधी शुद्ध करा भाव** । पाठी पहा मग देव । नका पडू वाया भरी । चित्त नागवे निर्धारी । भाव जाहलीया शुद्ध तत्वता । मग देव होय प्राप्ता । एकाजनार्दनी देव । जेथे जाय तेथे आहे ।।५७४।।

**देव देव म्हणोनी फिरताती वेडे** । चित्त शुद्ध नाही तव देव केवी जोडे । पाहे तिकडे देव आहे । दिशा व्यापोनी भरला आहे । एकाजनार्दनी आर्तभूत । देव उभा असे तिष्ठत ।।५७५।।

**देहीच देही बिंबला देवो** । न कळेची पामरा पडिला संदेहो । आहे नाही संशयबुद्धि । तेणे ते गुंतले कर्माचे सिद्धी । एका भरला देव । तयाविण रिता नाही ठाव ।।५७६।।

**देवासी तो भाव पुरे** । तेणे देव सदा झुरे । भक्तालागी सरे । वैकुंठासी । भाव धरावा बळकट । आणिक नको काही कष्ट । साधन हे श्रेष्ठ । कलीमाजी । भावे प्राप्ती होय देव । अभक्तासी संदेह । जवळी असोनी देव । नाही म्हणती । भावे देव घरी नांदे । एकाजनार्दनी आनंदे । म्हणोनी संतवृंदे । तया न विसरती ।।५७७।।

**मेघ वर्षे निर्मळ जळ** । जैसे बीज तैसे फळ । तया परी भक्ति कीजे । बीजासारखे फळ घेईजे । उत्तम अलंकार गोमटे । तेथे नाक असे नकटे । भजना जाता लाज वाटे । वेश्याघरी भंग घोटे । एकाजनार्दनी नर । प्रत्यक्ष जाणावा तो खर ।।५७८।।

**एक निष्ठा धरी बाप्पा** । मार्ग सांगतो हा सोपा । देही भाव धरी भोळा । पाहे विठ्ठल सावळा । मन करिता चंचळ । देव नयेचि जवळ । ऐसा कल्पनेचा संग । तिळभरी नको अंग । सच्चितानंद निरंजन । शरण एकाजनार्दन ।।५७९।।

**तळी पृथ्वीवर गगन** । पाहता दोन्हीही समान । रूप नाम वर्णाश्रम । कर्म अकर्म बद्धता । धर्म अर्थ काम मोक्ष । ऐशी वेद बोले साक्ष । एकाजनार्दनी शुद्ध । नाही भेद भूतमात्री ।।५८०।।

**गजाचे भार वोझे** । गाढवा ते न साजे । तैसे भक्त अभक्त दोन्ही । वेगळीक वेगळेपणी । मेघ वरुषे निर्मळ जळ । परी जैसे बीज तैसे फळ । एकाजनार्दनी गुण । चंदन वेळू नोहे समान ।।५८१।।

**देव नाही ऐसे स्थळ** । रिते कोठे आहे सकळ । पाहता सर्वाठाई देव आहे । अणुरेणु भरुनी उरला पाहे । एकाजनार्दनी देव । पाहता समूळ एकभाव ।।५८२।।

**एक धरलिया भाव** । आपणचि होय देव । नको आणीक सायास । जाय जिकडे देव भास । ध्यानी मनी शयनी । देव पाहे जनी वनी । अवलोकी जिकडे । एकाजनार्दनी देव तिकडे ।।५८३।।

**त्रिभुवनी ज्याची सत्ता** । लाज वाटे त्यासी गाता । ह्मणा कायावाचा त्याचे दास । न करा आणिकांची आस । एकाजनार्दनी भाव । त्याचे पायी ठेवा जीव ।।५८४।।

**मातेचा आठव बाळावरी स्नेहो** । तैसा धरा देवो मनी सदा । बाळा पाहुनिया माता संतोषत । तैसा धराहेत देवावरी । बोबडे साबडे असोच ते बाळ । तैसा धरा कळवळ देवावरी । एकाजनार्दनी देव धरा मनी । आसनी शयनी विसरू नका ।।५८५।।

**वत्सांलागी गोप धाउनी वोरसे** । तैसे असो पिसे देवा ठायी । पाडसा चुकली हरीण पाहे वास । तैसी धरा आस देवा ठायी । मातेलागी चुके बाळ एकुलते । तैसे देवापरते न धरा मनी । एकाजनार्दनी देव करा सखा । प्रपंच परिखा सहज तेणे ।।५८६।।

**नमस्कारी जव अष्टांगे** । तव देवचि जाला अंगे । आता नमन कैसे हो कैसे । स्तववावया दुजे नसे । आता भजन कैशापरी । संसारा नुरेचि उरी । एकाजनार्दना शरण । तव तो जाला जनार्दन ।।५८७।।

**निकट असताची देव** । नेणती ते अहंभाव । ऐसे व्यापले मूढपणे ।  विंसरले जनार्दने । जे पासाव सर्व युक्ती । तयाते मुमुक्षु वदती । ऐसा ज्ञानियाचा भाव । तया देवपण दिसे वाव । ज्ञानविज्ञान नको देवा । मज चरणाजवळी ठेवा । एकाजनार्दनी वाणी । दुजी नको अंतःकरणी ।।५८८।।

**ऐसा रोगाचा पवाडु** । परमार्थ गोड तो जाहला कडु । कामक्रोधाचा उफाडा । शांति क्षमेचा दिला काढा । देता नाममात्रा रसायन । प्रपंच रोग जाहला क्षीण । निधडा वैद्दय जनार्दन । एकाजनार्दनी शरण ।।५८९।।

**प्रपंच परमार्थ एकरूप होत** । आहे ज्याचा हेत रामनामी । परमार्थे साधे सहज संसार । तेथे वेरझार नाही जना । सहज संसार घडे परमार्थ । लौकिक विपरीत अपवाद ।।एकाजनार्दनी नाही तया भीड । लौकिकाची चाड कोण पुसे ।।५९०।।

**सुखे संसार हा करी** । वाचे उच्चारावा हरी । दु:खरूप हा संसार । रामनामे सुख साचार । रामनामाचे स्मरण नाश पावे जन्ममरण । जयापाशी नाम असे । नारायण तेथे वसे । एकाजनार्दनी नामे । संसार हा परब्रह्म ।।५९१।।

**निवांत बैसे तू अचळ** । मन करुनी निश्र्चळ । नको काही तळमळ । नाम गाय सर्वदा । सोडी मागिलाची आस । द्दढ मना घाली कास । भक्तिभाव समरस । रामनामी तू धरी । नको समाधि उन्मनी । धावू नको सैरा रानी । एकाजनार्दनाचे चरणी । द्दढभावे विनटे ।।५९२।।

**नित्य धाता हरीचे चरण** । करी भक्त दु:ख हरण । चरणरज पवित्रता । सदा घ्यावेची माथा । लागला पाषाणा चरण । ती स्त्रीच जाली पावन । ऐसे चरणीचे मान । शरण एकाजनार्दन ।।५९३।।

स्वगोत्र परगोत्र यांचा भरवसा । मानू नये सहसा अरे मूढा । वेदीचे वचन वेदी ते प्रमाण । एक नारायण सार जप । शास्त्रांचा प्रभाव शास्त्रिकांचा ठावा । उघड जपावा राममंत्र । न करी आळस नको पडो भरी । एकाजनार्दनी हरी स्मरे देही ।।५९४।।

**चिंतातुर मन नसावे कदाकाळी** । हृदयी नामावळी जप करी । श्रीअनंता माधवा गोविंदा । हाचि जप सदा चित्तामाजी । वारंवार चिंतावी देवाची पाऊले । तेणे जन्मजाळे उकळेल । एकाजनार्दनी आलासे प्रत्यय । सर्वभाव गाय नाम त्याचे ।।५९५।।

**गोविंद गोपाळ वदता वाचे** । पायी यमदूताचे भय नाही । नित्य जया ध्यान गोविंद स्मरण । संसारबंधन तया नाही । उठता बैसता खेळता हांसता । गोविंद गीती गाता मोक्ष जोडे । गोविंदाचे नाम सदा ती समाधी । एकाजनार्दनी उपाधी तुटली त्याची ।।५९६।।

**सांडा सांडा वाया छंद** । धरा गोविंद मानसी । नका भरू भरू आडरानी । सोडविता कोणी मग नाही । पडाल यमाचे पीडनी । लक्ष चौऱ्यायशी पतनी । एकाजनार्दनी शरण । एकपणे जनार्दन ।।५९७।।

**वेरझार खुंटे नाम वदता वाचे** । आणिक सायासाचे न करी कोड । तुटेरे बंधन नोहेचि पतन । वाचे जनार्दन जप करी । एकाजनार्दनी वाचे जपे नाम । आणिक दुर्गम साधन नको ।।५९८।।

**हित अनाहिताची असती वचने** । तेथे अनुमोदन देता भले । परमार्थाचे वचनी द्दयावे अनुमोदन । तेणे नारायण संतोषत । विषयिक वचना देता अनुमोदन । तेणे नारायण क्रोध पावे । भक्तिप्रेम वचना द्दयावे अनुमोदन । तेणे नारायण संतोषत । दुर्बुद्ध वचना देता अनुमोदन । तेणे नारायण संतोषत । दुर्बुद्ध वचना देता अनुमोदन । तेणे नारायण क्रोध पावे । संतांचे वचना द्दयावे अनुमोदन । तेणे नारायण संतोषत । असंताचे वचनी देता अनुमोदन । तेणे नारायण क्रोध पावे । एकाजनार्दनी वचनी द्दयावे अनुमोदन । तेणे जनार्दन संतोषतो ।।५९९।।

**दाता तोचि ह्मणावा** । नामावाचुनी नेणे जीवा । थोर तोचि ह्मणावा । नेणे भुताचा तो हेवा । लहान तोचि हमणावा । कायावाचा भजे देवा । एकाजनार्दनी ह्मणे । देवावाचुनी काही नेणे ।।६००।।

**उत्तम पुरुषाचे उत्तम लक्षण** । जेथे भेद शून्य मावळला । भेदशून्य जाला बोध स्थिरावाला । विवेक प्रकटला ज्ञानोदय । जिकडे पाहे तिकडे उत्तम दरुशन । दया शांति पूर्ण क्षमा अंगी । एकाजनार्दनी उत्तम हे प्राप्ती । जेथे मावळती व्दैताव्दैत ।।६०१।।

**कनक कांता नये चित्ता** । तोची परमार्थी पुरता । हेचि एक सत्य सार । वाया व्युत्पत्तीचा भार । वाचा सत्यत्वे सोवळी । येर कविता वोवळी । जन तेचि जनार्दन । एका जनार्दन भजन ।।६०२।।

**जेथे सत्वाचे प्राधान्य** । जेथे सात्विकाचे आचरण । तो परलोक साधून । साधुनी गेला । जेथे रजाचे प्राधान्य । त्याचे लोभी वसे मन । ज्ञान सांगे मुख्य करून । परि निष्ठा नाही । जेथे प्राधान्य तामस । तो व्देषी आणि कर्कश । ज्ञान सांगे अपरोक्ष । परि अंतरी कठीण । जेथे प्राधान्य तूर्या । तेथे सत्व शांति दया । विवेक वैराग्य करुनिया । सर्वासी भजे । जो वस्तु झाला केवळ । त्याचे अंतर केवळ । भुतमात्री दयाळ । सर्वापरी भजत । जेथे रजतम वसती । तेथे व्देष लोभ नांदती । त्याचे संगे ज्ञानज्योति । विझोनि जाये । एकाजनार्दनी शरण । जेथे शुद्ध सत्वाचे प्रधान्य । तो वस्तुसी जाय मिळोन । सहजीसहज ।।६०३।।

**ह्मणा तुम्ही विष्णुदास** । तेणे पुरे तुमची आस । काळा पडे त्रास । नामस्मरणे करुनी । उघडा मन्त्र विठ्ठल हरि । सदा वाचे जो उच्चारी । होतसे बोहरी । पातकासी तात्काळ । न

लगे काही साधन । वाचे म्हणा रामकृष्ण । एकाजनार्दनी शरण । कायावाचा मनेसी ।।६०४।।

**आपुला न टाकी पा आचार** । उपजले कुळीचा वेव्हार । स्वधर्म तो सार । पाळी पाळी बापा । त्याते म्हणणे संसार । येर बोलणे असार । निष्ठावंत जे नर । देवाचि समान । अतीतासी द्यावे अन्न । गोब्राह्मणाचे पूजन । मुखी नामस्मरण । तोचि एक संसारी । सांडोनिया गृह दारा । धाव घेतली डोंगरा । अंतरी भरला सारा । विषयीक भाव । बकाचे परि ध्यान । नको नको अनुष्ठान । एकाजनार्दन मन । स्थिर करी सर्वदा ।।६०५।।

**नित्य नैमेत्तिक कर्मे आचरावी** । तिही ते पाववी चित्त शुद्धि । चित्त स्थिर होण्या करी उपासना । भजे नारायणा एका भावे । विवेक वैराग्य प्राप्ति तत्पसादे । चित्ता लागे वेध सद्गुरूचा । सद्गुरू कृपेने पुर्ण बोध होय । नित्य त्यांचे पाय हृदयी धरी । एकाजनार्दनी ठेवुनिया मन । मनाचे उन्मन पावलासे ।।६०६।।

**न कळे जयाचे विंदान** । हरिहर नेणती महिमान । शिणले शेषाचे वदन । तो तटस्थ राहिला । ऐसा आकळ त्रिभुवनी । न कळे वेदशास्त्रा मनी । पुराणांची आयणी । कुंठित जाहली । तो सोपा नाममंत्र । वाचे वर्णिता पवित्रे । एकाजनार्दनी वक्त्रे । म्हणा रामकृष्ण हरी ।।६०७।।

**कायावाचा मने छंद** । धरा गोविंद हृदयी । नका जाऊ लिगाडामागे । ऐसे सांगे वेदशास्त्र । पुराण पठन यज्ञयाग । नोहे भाग कलीमाजी । एकाजनार्दनी नाम सार । उतरील पार भवसागरी ।।६०८।।

**निवांत श्रीमुख पहावे डोळेभरी** । तेणे नुरे अंतरी इच्छा काही । चरणी ते मिठी घालावे दंडवत । तेणे पुरे आर्त सर्व मनीचे । ध्यान ते दृष्टी भरुनि पहावे । आलिंगन द्यावे वेळोवेळा । हृदयकमळी पाहावा तैसा ध्यावा । एकाजनार्दनी विंसावा सहजचि ।।६०९।।

**शरणागत आलिया नुपेक्षी सर्वथा** । ऐसा बोध चित्ता आहे माझ्या । सर्वभावे जावे नाम वाचे गावे । जिवलागा भेटावे विठोबासी । साधुसंत गाती आनंदे नाचती । क्षेम तया प्रति द्यावे सुख । एकाजनार्दनी पाहता विठ्ठल । जन्ममरण निवारेल हेळामात्रे ।।६१०।।

**व्यापुनिया भरला देव** । रिता ठाव कोठे पा । तयाचे करारे चिंतन । मग तुम्हा न पडे न्यून । वाचे वदा विठ्ठल साचा । सोईरा साचा अंतःकाळी । मागे पुढे उभा असे । एकाजनार्दनी दिसे ।।६११।।

**भुक्ति मुक्तीचा पांग अमुचीये गावी** । जनी जनार्दन वागवी देह सर्व । भुक्ति आणि मुक्ति कासया ते वोझे । जनार्दन सहजे निर्दाळिले । कल्पिक कल्पना आवरुनी ठाई । जनार्दन पाही सबराभरित । त्याचियेनि सत्ते जाहलीसे मिळणी । एकाजनार्दनी एकमय ।।६१२।।

**विश्र्वपाळीता हे हरि** । दासा केवी तो आव्हेरी । नवमास गर्भवास । नाही भागला आम्हास । बालपणी वाचविले । स्तनी दुग्ध ते निर्मिले । कीटक पाषाणात वसे । त्याचे मुखी चारा असे । धरा धरा हा विश्र्वास । एकाजनार्दनी त्याचा दास ।।६१३।।

**जनार्दन पाया धरुनिया राहे** । संसार तो काय करील तुझे । स्वरूपाचे ज्ञान नोहे अनायासे । ज्याचे श्रुति पिसे लागलेसे । जाणीव नेणीव सांडोनिया मागे । शरण रिघे वेगे एकाजनार्दनी ।।६१४।।

**मेघदर्शने मयूर नाचती** । चन्द्र दरूशने चकोर सुखावती । घेनुदर्शने वत्से सुखावती । साधुदर्शने जीवा आनंदवृत्ती । सुर्यदर्शने जीवाते सुख होय । पितृदर्शने सुपुत्रा आनंद होय । मातृदर्शने कन्या सुख माने । मित्रदर्शने सुमित्रा आनंदी ठाणे । या रिती सतत चिंतिती हरि । एका जनार्दनी धन्य संसारी ।।६१५।।

**स्वामीदर्शने पतिता आनंद** । देवदर्शने संतोषे भक्तवृंद । यापरी आनंद सदा मनी हरी । वाचुनी छंद दुजा नाही मनी । एकाजनार्दनी प्रेमयुक्त छंद । गीती गाता आवडी गोविंद ।।६१६।।

**होऊनी उदास** । मागा प्रेम सावकाश । उभा विटेवरी उदित । देता न पाहे चित्त वित्त । जे जे पाहिजे जयालागी । ते ते देतो त्या प्रसंगी । न ह्मणे उत्तम चांडाळ । ऐसा भक्तीचा भूपाळ । ऐसा भक्तीचा भुकाळ । एकाजनार्दनी ह्मणा दास । करा आस निर्भय ।।६१७।।

**अगाध चरणाचे महिमान** । वेदशास्त्रा पडिले मौन । चरणे तारिले पाषाण । चरणे तारिले भक्तजन । तारियेले प्रल्हादासी । उद्धरिले अजामेळासी । एकाजनार्दनी शरण । चरण तिही लोकी पावन ।।६१८।।

**चरणांची थोरी** । जाणे गौतम सुंदरी । हृदयाची थोरी । भक्त जाणती परोपरी । करांची ती थोरी । जाणे सुदामा निर्धारी । समचरणाची शोभा । एकाजनार्दन उभा ।।६१९।।

**चरण वंदिती का निंदिती** । तेही हरिपदा जाती । एक तरले चरण पूजिता । कोणी तरले चरण ध्याता । चरण वंदिता तरली शिळा । निंदिता तारिले शिशुपाळा । ऐसे चरणाचे महिमान । एकाजनार्दनी शरण ।।६२०।।

**नवजो योगीयाचिया वाटा** । न चढो आगम निगम ताठा । न लागो जपमाळा खटपटा । आत्मनिष्ठा होऊनी असो । विठ्ठल उघडा विरचित । सबाह्याभ्यंतर नांदत । कर्मे करुनी नेव्हो कर्मठा । निष्कर्गाच्या न लागो झटा । संतरज आमुचा वाटा । मुक्ति फुकटा तेणे लाभे । न करू दुस्तरे ती तपे । न पडो अध्यात्म खरपे । एकाजनार्दनी कृपे । आत्मसुख अमुप विचरिजे ।।६२१।।

**शहाणा जो जाणरे** । उद्धवा आत्मत्वे पाहेरे । नेणता तो जाणरे । उद्धवा देहबुद्धीस वोहेरे । उद्धव ह्मणे कान्होबा सांगरे । गोडा गोडा गोष्टी स्वभावरे । निज गोडा गोष्टी ऐकता । चित्त चैतन्य फावेरे । सज्ञान तोचीरे उद्धवा । ज्याची जाणीव विरे । अज्ञान तोचीरे उद्धवा । ज्ञानगर्वे हुंबरे । साधू तोचिरे उद्धवा । ज्ञानगर्वे हुंबरे । साधु तोचिरे उद्धवा । जो राव्दस्तुते दावी । असाधु तोचीरे उद्धवा । देही प्रपंची गोवी । धर्गिष्ट तोचीरे उद्धवा । जेथे मी तू पण नुरे । दु:ख ते जाणरे उद्धवा । काम सुखासी झुरे । शम तो जाणरे उद्धवा । ज्याची आत्मत्वे बुद्धि । दम तो जाणरे उद्धवा । जो त्यागी उपाधी । धृतीची धारणारे उद्धवा । जिव्हा उपस्थ जिंके । सोलीव करंटा तोचीरे उद्धवा । जिव्हा उपस्थी आटके । तप ते जाणरे उद्धवा । नित्य नामस्मरण अभागी तोचीरे उद्धवा । नामी विन्मुखपण । बळिया बलिष्ठ तोचीरे उद्धवा । निज मानसी जिंकणे । नपूसक तोचीरे उद्धवा । मनामागे धावणे । लाभ तो जाणरे उद्धवा । नित्य भगवद्भक्ति उद्धवा । अलाभ सम ब्रह्म देखणे । असत्य तेचीरे उद्धवा उद्धवा । जो देह मी ह्मणे उद्धवा । वाचा सत्य अनुवादणे उद्धवा । ते लोक सत्य उद्धवा । सम ब्रह्म न देखणे । ते अलस्य निर्धूत उद्धवा । उत्तम धर्म तोचीरे उद्धवा । निजधर्म ज्या गाठी उद्धवा । अधम तोचीरे उद्धवा । धनलोभिया दृष्टी । पावन यज्ञ तोचीरे उद्धवा । व्दिजमुखे अर्पे । अभय यज्ञ तो उद्धवा । लोभावरी समर्पे । वरिष्ठ लक्ष्मी ती जाणरे उद्धवा । वैराग्य बाणे । अभाग्य तेचीरे उद्धवा । जो देही मी ह्मणे । ईश्र्वर तोचीरे उद्धवा । ज्याची सर्व सत्ता । अनीश्र्वर तोचिरे उद्धवा । कर्मी ब्रह्म प्रीति । अपवित्र तोचिरे उद्धवा । कर्मी बद्धप्राप्ति । पंडित तोचिरे उद्धवा । जो देह अहंता छेदी । मुर्ख तोचिरे उद्धवा । देह अभिमानी बुद्धि । संन्यासी तोचिरे उद्धवा । सर्व संकल्प त्यागी । परगृही तोचिरे उद्धवा । मोह ममता अंगी । स्वर्ग तो जाणरे उद्धवा । नित्य संगसंती । नरक तो जाणरे उद्धवा । नित्य अधर्मी वृत्ती । सखा तो जाणरे उद्धवा । स्वये सदगुरुराव । वैरी तो

जाणरे उद्धवा । देही अहंभाव । वैरी तो जाणरे उद्धवा । द्रव्यदारा आसक्ती । एकाजनार्द्नी कवित्व । चित्ती चैतन्य गोड । एकी एकही धरिता । पुरे सर्वही कोड ।।६२२।।

**भावे जनार्दन बोले उद्धवासी** । बारे तू परीयेसी गुह्य गोष्टी । गुह्य गोष्टी तुज सांगतो निभ्रांत । हृदये फुटत आनंदेसी । आनंदाचा रस न संडी प्रसंग । होसी जीवलग ह्मणोनिया । ह्मणोनी उद्धवा तुजसी बोलता । भेदाचीये वार्ता नाही मज । मज तुज काही नाही भिन्न भेद । कैवल्याचा सिद्ध तूची एक । तूची एक भक्तामाजी शिरोमणी । आवडसी मनी सर्व काळ । सर्वकाळ तुज ध्याई अहर्निशी । आनंद मानसी समाधान । समाधी विश्रांति मंडण ज्ञानाचा । नाही प्रपंचाचा लेश काही । काही एक कृष्णमुखी गोष्टीलागी । उद्धव सर्वांगी श्रवणार्थ । श्रवणी सादर हरिमुख न्याहाळी । सुखाचे कल्लोळी प्रेमयुक्त । प्रेमयुक्त पाहे सावळे रुपडे । तेज चहूकडे फाकतसे । फाकतसे तेज कुंडलाचे दाटी । वैजयंती कंठी वनमाळा । वनमाळा मुद्रिका चिद्रत्ने मुकुटा । कासेसी गोमटा पितांबर । पीतांबरधारी श्रीमुख सुंदर । चरणी तोडर गर्जतसे । गर्जती नेपुरे आरुणे रंगीला । टिळक रेखिला केशराचा । केशराचा टिळक कुंकमाची पदे । उद्धव स्वानंदे लोळतसे । लोळता मज चाड नाही तपसाधनी । नामसंकीर्तन प्रीत सदा । सदा माझे नाम गाती जे भावेसी । त्यासी मी मानसी न विसंबे । न विसंबे भक्ता नाम जया मुखी । सरता तिही लोकी होय जाणा । जाणा नामासरी न पवे ब्रह्मज्ञान । तीर्थादि भ्रमण व्यर्थ पाही । पाहे पा प्रल्हाद आसनी शयनी । नामाहीवाचोनी दुजे नेणे । दुजे नेणे एक द्रौपदी बहिणुली । हर्षे ते वेल्होळी नाम स्मरे । नाम स्मरता गजेंद्रा तुटले बंधन । पतीतपावन नाम श्रेष्ठ । नाम सुखानंदे भवानी शंकर । जपे निरंतर नाम माझे । माझ्या नामरंगी गोपाळ गजरी । घालती घुमरी आल्हादेसी । आल्हादे नाचती प्राण माझे ठाई । सर्वांसी मी पाही त्यासारिखा । सारिखाची होय थोरा आणि साना । जैसी हे वासना जनार्दनी । जनार्दना गाता धाक यमदूता । येणे जाणे वार्ता तेथे कैची । कैचा कळीकाळ पळे दशदिशा । माझ्या नामासरिसा न राहेची तो । चित्त मने शुद्ध गाती माझे नाम । त्याचे दासीकाम करीन सत्य । सत्य वोळंगणे भक्ताचे रंगणी । वंदी पायवणी निजभावे । कायावाचा मी भोक्ता नावडेची काही । नामालागी पाही अंकीत मी । अंकीत मी होय श्रवणी संतुष्ट । तयासी वैकुंठ आईतेची । आई ज्याची ठेवी जीव तयावरी । निंबलोण करी वेळोवेळी । वेळोवेळा त्याचे व्दारीच तिष्ठत । नाहीच पहात मानामान। मानामान सर्व सांडिले उद्धवा । भक्तिप्रेमभावा लागोनिया । लागवेग मज सप्रेम कीर्तने । लक्ष्मी डावलोनि नामप्रेम । प्रेम नाही मज योगी हृदय कमळी । सविता मंडळी स्थिर नव्हे । नव्हे मी संतुष्ट महा यज्ञदानी । पंचाग्नि साधनी चाड नाही । चाड असे जेथे हरीनाम गाती । त्यांच्या पुण्यामिती ब्रह्मा नेणे । ब्रह्मयाचा सुत नारद विख्याद । स्वबोधे डूल्लत नामबळे । नामबळे देखा तरला चांडाळ । नेला अजातमेळा मुक्तिपंथा । मुक्तिपंथे

नेली नाम घेता वाणी । तात्काळ कुंटणी तारियेली । तारिल्या गोकुळी गोपिका सुंदरी । तयाचे शारीरी मीच वसे । वसे घरोघरी प्राण माझे ठायी । न विसंबती पाही क्षण मज । मज आठविती उठता बैसता । दळीता कांडिता नाम माझे । मज आठविती चालता बोलता । गाईते दुहिता नाम माझे । माझिये स्मरणी सुखाचे शेजारी । प्रीति पडिभरी चित्त त्याचे । चित्ताचा चोरटा ज्यासी जैसा भाव । त्यासी मी वासुदेव तैसा होय । होय ज्यासी माझे भजनी संभ्रम । त्यासी मी आत्माराम प्रियकर । प्रियकर आत्मा म्हणोनिया जाण । केले निरुपण भक्तराया । भक्तासी उपाव नामीच विस्तार । नाही आन थोर नामेविण । नाम सारासार ओविया चौपन्न । करिती पठण निज भावे । भावे उच्चारी होय पाप धुणी । एकाजनार्दनी संकीर्तन ।।६२३।।

## मनास उपदेश

**मन एके ठायी** । राहे ऐसे करी काही । सर्व साधनांचे सार । मनी करावे विचार । एकाग्रते मन । करूनि करावे भजन । मन जिंकावे पा आधी । तेणे तुटेल उपाधी । एकाजनार्दनी मन । दृढ ठेवावे बांधून ।।६२४।।

**मने करुनि विश्र्वास** । संतचरणी व्हारे दास । क्षणीक न लागे साधन । मन आवरुनी करी भजन । मन धरी मुष्टीमाजी । वाउगा तू न शिणे सहजी । मन दृढ देवापायी । एकाजनार्दनी पाही ।।६२५।।

**मने कल्पोनिया केली विटंबना** । हिंडविले राना वासनेच्या । तैसे नका करू वाउगे चिंतन । मन आकळून कार्य करा । मनाचे आकलन करावे पा आधी । वाउगी उपाधी तुटतसे । एकाजनार्दनी आवरून मन । मन करी भजन सुखरूप ।।६२६।।

**नका धाऊ तुम्ही सैरा** । मना मागे या सत्वरा । मन करा पै आधीन । तेणे जोडे संतचरण । मन आहे महापापी । लावावे ते हरिरूपी । मन स्थिर करुनी निश्र्चये । एकाजनार्दनी पाहे ।।६२७।।

**करिता अनुष्ठान** । मन धावे सहज जाण । मंत्र तंत्र यंत्र भेद । मने केला वादावाद । आधी मनाते जिंकावे । सहज रूप मग पहावे । मन करी आधीन आधी । एकाजनार्दनी तुटे व्याधी ।।६२८।।

**मन करुनिया सावध** । वाचे स्मरे तू गोविंद । तेणे साधे सर्व काज । सकळ साधनांचे निज । मन धरी एकमुष्टी । वाचे जपे नाम गोष्टी । मन धावे भलतीकडे । साधन वाया जाय

कोडे । मन आवरुनी साधन । तेणे पावसी निजखूण । खूण संतावाचुनी । एकाजनार्दनी ध्यानी ।।६२९।।

**न करी सायास आणिक संकल्प** । वायाचि विकल्प न धरी मनी । मनाचे जे मन करी ते स्वाधीन । तेणे नारायण कृपा करी । एकाजनार्दनी टाकूनि कल्पना । श्रीसंतचरणा शरण जाई ।।६३०।।

**मन करुनिया स्थिर** । हृदयी ध्याई तो साचार । मग सुखाची वसती । सदा समाधान चित्ती । समाधी समाधान । सहजघडे ब्रह्मज्ञान । तुटे संसाराचा कंद । वाचा नामस्मरण छंद । हेचि साधनांचे सार । सदा चित्ती परोपकार । एका जनार्दनी ध्यान । ध्यानी मनी जनार्दन ।।६३१।।

**अखंड सदा ध्यान** । पांडुरंगी लावा मन । ऐसा उदार हा हिरा । टाकुनी वेचिताती गारा । अमृत सांडोनी । बळे घेती कांजीवणी । कामधेनु कल्पतरू । एकाजनार्दन आगरु ।।६३२।।

**मन मनासी होय प्रसन्न** । तेव्हा वृत्ति होय निरभिमान । पावोनी गुरु कृपेची गोडी । मना मन उभवी गुढी । साधके संपूर्ण । मन आवरावे जाण । एकाजनार्दनी शरण । मने होय समाधान ।।६३३।।

**संकल्प विकल्प जाण** । हेचि मनाचे लक्षण । सुखदु:ख उर्मी । मन वर्ते धर्मोधर्मी । स्वर्ग नरक बंध मोक्ष । मन जाणते प्रत्यक्ष । शुभ अशुभ कर्म । मनालागी कळे वर्म । करा नि:संकल्प मन । ह्मणे एकाजनार्दन ।।६३४।।

**मनाचा सविस्तर** । ऐका तुह्मी वो निर्धार । मने केले सगुण निर्गुण । मने दाखविले चैतन्य । मने नागविले देवा । मने लोळविले जीवा । मन अज्ञानाची राशी । मन धावे ते सायासी । एकाजनार्दनी मन । द्दढ ठेवावे बांधोन ।।६३५।।

**मना तू परम चांडाळ** । अधम खळाळूनि खळ । विषयी तळमळ । बहु करसी पापिष्टा । धरी विठ्ठली विश्र्वास । आणिक नकोरे सायास । वाउगा तो सोस । सांडी सांडी अधमा । करी संतांचा सांगात । पूर्ण होती मनोरथ । न धरी दुजा हेत । विठ्ठलावाचुनी । बहु सांडी तू भाषण । आणिक न करी साधन । एकाजनार्दनी शरण । विठ्ठलासी निघे पा ।।६३६।।

**मना तू अधीर अधीर** । बहू पातकी पामर । न रहासी स्थिर । क्षणभर निश्र्चये । किती शिकवावे तूते । नायकसी एक चित्ते । बहु गुणे बोलता तूते । नायकासी पामरा । एकपणे धरी भाव । द्दढ चिंती विठ्ठलराव । वाउगा तो भेव । नको धरू आणीक । हेचि घरी

शिकविले । काही नको आन दुजे वहिले । एकाजनार्दनी बोले । करुणा भरीत मनासी ।।६३७।।

**बसता निश्र्चळ** । मन करी तळमळ । ध्यान धारण ते विधि । मने न पायेची सिद्धी । जप तप अनुष्ठान । अवघे मनेची मळीन । दया शांती क्षमा । मने न येती समा । ऐशा मना काय करावे । कोठे निवांत बैसावे । एकाजनार्दनी शरण । मन धावे सहजपणे ।।६३८।।

**कौतुक वाटते मनाचे** । नामस्मरण नेघे साचे । का रे मानिशी कंटाळा । मना खळा अधम तू । नायकाशी  शिकविले । धावशी वहिले स्वइच्छा । सांगतो ते नायकसी । एकाजनार्दनी ह्मणे तुजसी ।।६३९।।

**सांडी मांडी नको करू** । वाउगा भरू श्रमाचा ।  जेथे तेथे धावे मन । करा खंडन तयाचे । नका घालू गोवागुंती । तेणे फजिती मागे पुढे । एकाजनार्दनी भाव । अवघा दिसे दिवाधिदेव ।।६४०।।

**देही शत्रु वसती दूर देशी** । येता बहु दिवस लागती तयासी । बाह्य शत्रूचे अल्प दु:ख । मन शत्रूचे वर्म अशेख । आरानी शयनी एकांती । जपी अथवा ध्यान स्थिती । ऐशिया मनाते न जिंकता । देवपणाचे भुलले हावे । एकाजनार्दनी नेणती देवे ।।६४१।।

**मने ब्रह्मादिका केलीसे थोडकी** । तेथे परवडी कोण मानवाची । इंद्रिये न चाले मनाविण देखा । मनाची मनरेखा नुलंघवे । शस्त्रे ते न तुटे जळे ते न बुडे । ऐसे ते पोवाडे मने होती । एका जनार्दनी मन ते स्वाधीन । करिता सर्व यज्ञ हाती जोडे ।।६४२।।

**मनी दुजी बुद्धि नको वा हो** । संत समागमी राही । यापरते काही । दुजे नको सर्वथा । मीपणाचा ठावो । टाकी टाकी संदेहो । पडसी प्रवाहो । वाउगाची शिणसी । बहुत मतमतांतरे । कायसा शिणसी रे आदरे । संतचरणी झुरे । रात्रंदिवस मानसी । कायीक वाचीक सर्वथा । भजे भजे पंढरीनाथा । एकाजनार्दनी तत्वता । संतचरणी लीन होय ।।६४३।।

**दुजियाची निंदा नको रे करू मना** । चिंती या चरणा संतांचिया । होऊनी उदास गाई सदा नाम । बैसोनि निष्काम एकांतासी ।  एकांतीची गोडी शंभु जाणे जोडी । आणिका परवडी न कळे काही । एकाजनार्दनी रामनाम सार । करिता उच्चार आळस नको ।।६४४।।

**मना नको नको हिंडो दारोदारी** । कष्ट झाले भारी येता जाता । कल्पना सोडोनि संतासंगे राहे । सर्व सुख आहे त्याचे पायी । ज्याचिया दरुशने शोक मोह जळे। पाप ताप पळे काळभय । जवळीच दिसे भाविता भाविता । एकाजनार्दनी ध्याता सुख मोठे ।।६४५।।

**मना सांडी विषय खोडी** । लावी विठ्ठलेशी गोडी । आणिक न लगे साधन । एकले मन करी उन्मन । विठ्ठल सावळा । पाहे पाहे उघडा डोळा । एकाजनार्दना शरण । मनचि होय विठ्ठल पूर्ण ।।६४६।।

**अरे अरे मना** । काही करी विचारणा । शरण विठोबासी जाई । मग राही भलते ठाई । वाउगा तू सोस । मना न करी सायास । येतो काकुलती । एकाजनार्दन प्रीती ।।६४७।।

**न करी तळमळ मना** । चिंती चरणा विठोबाचे । राहे क्षणभरी निवांत । न करी मात दुजी काही । संतचरण वंदी माथा । तेणे सर्वथा सार्थक । एकाजनार्दनी मात । मना ऐके तू निवांत ।।६४८।।

**आणीक साधनी नको गुंतू मना** । धरी या चरणा विठोबाच्या । वाउगा बोभाट कासया खटपट । पंढरीची वाट सोपी बहु । एकाजनार्दनी कायावाचा मने । सतत रहाणे संतपायी ।।६४९।।

**आणिकाची आस नको करू मना** । चिंती तू चरणा विठोबाचे । करकटी उभा चंद्रभागे तटी । पुंडलिकापाठी धरुनि ध्यान । ठेविले चरण दोन्ही विटेवरी । वाट पाहे हरि भाविकाची । एकाजनार्दनी उभारणी बाह्या । आलंगीत आहे भोळे भोळे ।।६५०।।

**अंतरीचा भाव द्दढ धरी मना** । सेवी तू चरणा विठोबाच्या । साधन आणीक नको कष्ट काही । राममुखी गायी सदा नेमे । आकार निराकार सर्वही व्यापक । तो उभा सम्यक समपदी । एकाजनार्दनी वाहुनिया आण । विठ्ठलाचे चरण घ्यावे आधी ।।६५१।।

**वाउगी उपाधी न करी रे मना** । चिंती या चरणा राघवाच्या । अंतकाळी सखा कोणी नाही दुजा । पुत्र पत्नी वोजा न ये कामा । चालताचि देह म्हणती माझा माझा । अंतकाळी पैजा यम बांधी । एकाजनार्दनी सर्व हे मायीक शाश्र्वत तो एक श्रीरामनाम ।।६५२।।

**मना तू ऐक माझी मात** । श्रीविठ्ठली धरी का रे हेत । काही पडता जड भारी । वाचे म्हणे विठ्ठलहरी । तुजही खुण निर्वाणी । शरण एकाजनार्दनी ।।६५३।।

**मना तू ऐक हे विनंती** । तू न करी दुजी खंती । विठ्ठलावाचुनी प्रीती । दुजी नको आणीक । वाउगा तू न करी सोस । द्दढ घाली तू कास । धरी पा विश्र्वास । विठ्ठल चरणी । सांडी माझे आणि तुझे । वाउगे नको वाहू वोझे । निपजती बीजे । संतचरणी सकळ । हेचि साधनांचे सार । श्रीविठ्ठलमंत्र उच्चार । एकाजनार्दनी वेरझार । येणे तुटे समूळ ।।६५४।।

**मना निश्र्चय तू करी** । ह्मणे जाईन पंढरी । नेम धर्म हाचि माझा । पंढरीवाचूनि नाही दुजा । सर्व तीर्थाचे माहेर । विटे उभा कटी कर । आवडीने धरा भाव । एकाजनार्दनी भेटे देव ।।६५५।।

**भक्त करुणाकर दिनाचा वत्सल** । उभा श्रीविठ्ठल विटेवरी । मना जाय तेथे मना जाय तेथे । मना जाय तेथे पंढरीये । पुरातील काम निवारेल गुंती । आहे ती विश्रांति संतसंगे । आषाढी कार्तिकी सोहळा आनंद । मिळालासे वृंद वैष्णवांचा । एकाजनार्दनी आनंदी आनंद । तेणे परमानंद डूल्लतसे ।।६५६।।

**विठ्ठल पंढरपूर निवासी** । विठ्ठल उभा भिवरेसी । विठ्ठल पुंडलिकापाशी । भक्ति प्रेमेशी तिष्ठत । जाई जाई मना तेथे । सुखे वैष्णव नाचती जेथे । ब्रह्मानंद पद दर्शनमात्रे । देत आहे भक्तांसी । सुलभ सुलभ मंत्रराज । शंभु जाणे निजबिज । एकाजनार्दनी गुज । सांगतसे भाविका ।।६५७।।

**लाभे लाभ हातासी ये** । हेचि सोय धरी मना । वाउगा सोस नको वाहू । सुखे गाऊ विठ्ठला । नको नको श्रम पसारा । सैरा वैरा धावू नको । निवांत सेवी हरिकीर्तना । एकाजनार्दनी म्हणे मना ।।६५८।।

**निवांतपणे मना चिंती तू चरणा** । आणिक कल्पना न करी काही । चिंती पा विठ्ठल कायावाचा मने । संसार बंधन तुटेल तेणे । संसाराची वार्ता नुरेची पा काही । आणिक प्रवाही पडू नको । एकाजनार्दनी विठ्ठलनामी छंद । मना तू गोविंद आठवी का रे ।।६५९।।

**मना ऐक एक मात** । धरी हरिनामी हेत । तेणे चुकती बंधने । वाचे म्हणे नारायण । नारायण नाम । तेणे सर्व होय काम । दृढ धरी भाव । न करी आणिक उपाय । उपाव न करी काही । शरण देवासी तू जाई । एकाजनार्दनी मन । करी देवासी अर्पण ।।६६०।।

**मना तू एक करी** । वाचे आठवी श्रीहरी । आणिक न करी साधन । वाचे म्हणे नारायण । सर्वकाळ हाचि धंदा । वाचे आठवी गोविंदा । तेणे जीवा सोडवण । शरण एकाजनार्दन ।।६६१।।

**अरे अरे मना** । सख्य सख्य धरी ध्याना । पंढरीचा राणा । वेध ठेवी तयाचा । तुज नाही रे बंधन । सहज आकळे ब्रह्मज्ञान । वाउगे शोधन । नको करू ग्रंथाचे । मागा तुज शिकविले । परि तू रे नायकशी वहिले । तुझे हित तुज कथिले । शुद्धि करी काही ते । तू अनिवार सर्वासी । ह्मणोनी कवि भाकितो तुजसी । शरण गुरुजनार्दनासी । एका भावे जाई

तू । एकाजनार्दनी शरण । जाता होईल समाधान । वाउगे नको भ्रमण । चरणी राहे निवांत ।।६६२।।

**अरे माझ्या मना** । नित्य भजे नारायण । तेणे तुटेल बंधन । उभय लोकी कीर्ति जाण । मिळेल सकळ संपत्ति । नाश पावेल विपत्ति । प्राप्त होय ब्रह्मपद । वाचे वदावा गोविंद । एकाजनार्दन मन । सदा चिंती नारायण ।।६६३।।

माझ्या मना लागो छंद । नित्य गोविंद गोविंद । तेणे निरसेल बंधन । मुखी वदे नारायण । ब्रह्मरूप होय काया । माया जाईल विलया । होय सर्व सुख धणी । चुके जन्ममरण खाणी । ह्मणे एकाजनार्दन । सदा समाधान मन ।।६६४।।

**मने नागविले बहुतापरी** । धाव धाव तू श्रीहरी । आता माझे मन । दृढ ठेवावे आकळून । वाहात चालिलो मनामागे । बुडतसे प्रपंच गंगे । धावे धावे विठाबाई । एकाजनार्दनी लागे पायी ।।६६५।।

**काय तुझे वेचे देवा** । मन आपुले स्वाधीन ठेवा । हेचि मागणे तुजप्रती । वारंवार हे विनंती । माझी ठेवा आठवण । ह्मणे एकाजनार्दन ।।६६६।।

**माझ्या मनाचे ते मन** । सहज होईन उत्तीर्ण । आलो ज्या कारणा । तेचि करवा पंढरीराणा । वाउगी ती आस । मनी नसावी सायास । येतो काकुळती । एकाजनार्दनप्रती ।।६६७।।

**पायी ठेवलीया मन** । सहज होईन उत्तीर्ण । आलो ज्याकारणा तेचि करवा पंढरीराणा । वाउगी ती आस । मनी नसावी सायास । येतो काकुलती । एकाजनार्दनीप्रती ।।६६८।।

**तापलीया तापे शिणलिया मार्गी** । पोहे ठाकी वेगी कृष्णकथा । कृष्णकथा गंगा सावळे उदक । मना बुडी दे का वोल्हावसी । वोल्हावले मन इंद्रिया टवटवी । गोपीराज जीवी साठविले । साठविले जीवी जाणा याची खुणा । जरी होय करुणा सर्वाभूती । सर्वाभूती राम द्दष्टीचे देखणे । नाही दुजे पेणे आडवस्ती । आडवस्ती नाही एकाजनार्दनी । श्रीरामावाचुनी आन नेणे ।।६६९।।

**तुज सांगतसे मना** । पाहे पंढरीचा राणा । नको दुजा छंद काही । राहे विठ्ठलाचे पायी । विषयीक वासना । सोडी सोडी सत्य जाणा । जेणे घडे सर्व सांग । फिटे संसाराचा पांग । ह्मणे जनार्दनाचा एका । सुलभ उपाय नेटका ।।६७०।।

**जन्ममरण साकडे निवारावया कोडे** । विठ्ठल उघडे पंढरीये । तयाचे चरणा मिठी घाली मना । नाही तुज  यातना जन्मकोटी । चन्द्रभागे स्नान पुंडलीक भेटी । पूर्वजा वैकुंठी मार्ग सोपा । महाव्दारी नाचा जोडोनिया पाणी । पुढे चक्रपाणी उभा विटे । एकाजनार्दनी तयासी भेटता मोक्ष । सायुज्यता पायी लागे ।।६७१।।

**मनी रामी रंगले अवघे मनचि राम जाले** । सबाह्य अभ्यंतरी अवघे रामपर कोंदले । चित्तचि हारपले अवघे । चैतन्यचि जाले । देखता देखता अवघे विश्र्व मावळले । पहता पहता अवघे सर्वस्व ठकले । आत्मयारामाचे ध्यान लागले मज कैसे । क्रियाकर्म धर्म अवघे येणेचि प्रकाशे । सत्य मिथ्या प्रकृति पर रामचि अवघा भासे । भक्ति अथवा ज्ञान शांति आणिक योगस्थिति । निर्धारिता न कळे रामस्वरूपी जडली प्रीति । एकाजनार्दनी अवघा रामची आदिअंती ।।६७२।।

# आत्मस्थिती

### उपासना

**येउनी नरदेहा गमाविले आयुष्य** । नाही हृषिकेश स्मरला मनी । मुखे नाही केले देवाचे स्मरण । ऐसा अधम जन जाहलो देवा । नाही ते ऐकिले कीर्तन संतांचे । कर्ण बधिर साचे जाहले देवा । करे नाही केला दानधर्म काही । ऐसा अपराधी पाही जाहलो देवा । चरण न चालती तीर्थयात्रेप्रती । ऐसा अपराधी पाही जाहलो देवा । एकाजनार्दनी संसाराचा छंद । नाही तो गोविंद आठविला ।।६७३।।

**कासया निर्मिला अपवित्र संसार** । न घडे विचार योग्यायोग्य । दिननिशी मना द्रव्याची वासना । परी नारायणा स्मरण नाही । ऐसा मी भुललो प्रपंच लिगाडी । एकाजनार्दनी उडी घाली देवा ।।६७४।।

**कासया संसार लाविला छंद** । तेणे हा गोविंद अंतरला । न कळे दिवस जातो ते कळेना । संसार भ्रमणा फिरतसो । एकाजनार्दनी भाकितो करुणा । माझिया वचना चित्त द्यावे ।।६७५।।

**आशा मनिषा तृष्णा बांधिती दावणी** । सोडवी चक्रपाणी संतसंगे । कामक्रोध याचा पसार । पाडिती विसर तुझा देवा । मोह ममता भ्रांति ढकलिती कुपी । दावी पै सोपी वाट आम्हा । जनार्दनाचा एका विनवी सर्वाते । भजा एकचित्ते विठोबासी ।।६७६।।

**अशा पाश देवा नको या संसारी** । नको चौऱ्यायशी फेरी येरझार । सोडवी देवा कुसंगा टाकून । मन ते उन्मन तुझे चरणी । एकाजनार्दनी मनोगत सिद्धी । कै कृपानिधि पुरवाल ।।६७७।।

**जन्म जरा मरण व्याधी** । ही तो उपाधी लागलीसे । लिगाड ते मुळी वाया । जैसी छाया अभ्रीची । विषयक दर्भाचे मेळी । विठ्ठल वनमाळी येवो आता । एकाजनार्दनी ध्यास । अवघी आस पाया पै ।।६७८।।

**संचित माझे वोखटे देवा** । तुम्ही केशवा काय करा । पहा वासुनी शिव कंठी । क्षुधा पोटी वायूची । एकाएकाजनार्दन शरण । कर्मचि गहन पै माझे ।।६७९।।

**धाव रे धाव आता** । दीनवत्सला रामा । संसारसंग गोष्टी । मी गुंतलो कामा । तारुण्य अभिमाने । अंगी भरला ताठा । विषय संपत्तीचा । मज फुटला फाटा । विषय भोगिताना । देह पोसले माझे । स्वहित आठवेना । ध्यान चुकलो मी तुझे । विषया मोकलिलो । तुज शरण मी आलो । एकाजनार्दनी पायी । लीन मी जाहलो ।।६८०।।

**धाव नारायणा** । माझ्या दु:खाच्या निरसना । संसारे मी कष्टलो । तुजलागी शरण आलो । कोण सोडवील आता । तुजविण जी अनंता । तूचि मायबाप । निवारिसी सर्व ताप । एकाजनार्दन पाय । धरुनिया चित्ती राहे ।।६८१।।

**धावे धावे श्रीहरी** । निवारी संसार बोहरी । आडलियाचा विसावा । धावे पावे तू केशवा । तू दीनदयाळ हरि । आपुले आह्मा जतन करी । अंकित भक्तांचा । ऐसी बोले वेदवाचा । एकाऐकी जनार्दनी । आठ सहस्त्र बोले वाणी ।।६८२।।

**तुजविण आम्हा कोण आहे देवा** । धाव यादवराया मायबापा । पडिलोसे डोही प्रपंच आवर्ती । कोण करी शान्ति तुजविण । जन्ममरणाचा पडिलासे फेरा । सोडवी दातारा मायबापा । एकाजनार्दनी धावे लवलाही । येवोनिया हृदयी ठाव देई ।।६८३।।

**सांडिला प्रपंच जाहलोसे उदास** । सर्वभावे कास धरिली तुमची । आता माझे हित करी गा देवराया । नाही तरी वाया सहज गेलो । लौकिकाची चाड नाही मज शंका । तुझ्यावाचुनी एका पांडुरंगा । एकाजनार्दनी पायाची आवडी । सर्व माझी जोडी नाम तुझे ।।६८४।।

**ब्रीदावळी करी आपुली जतन** । आलो मी शरण जनार्दना । राखी माझी लाज पतीत पतीत । तुझा मुद्रांकित रंक एक । कामक्रोध लोभ दंभ अहंकार । हे देही अनिवार सोसवेना । आशा मनीशा माया सखीया सांगातिणी । करिती गौसण सदा जीवा । चित्त वित्त आशा

लागलीसे पाठी । इही जीवे साठी केली मज । जनार्दना शरण अनन्य पै एका । कायेवाचे देखा चरणी विनटला ।।६८५।।

**तुमच्या चरणापरते** । शरण न जाय आणिकाते । ऐसे चरण पावन । उद्धरले असंख्य जन । चरणजाचे ध्यान । शंकर करितो आपण । एकाजनार्दनीशरण । धरिले चरण न सोडी जाण ।।६८६।।

**अहो करुणाकर पतितपावना** । आमुच्या वचना चित्त द्द्यावे । दीन मी हीन रंकाहुनी रंक । म्हणोनिया देख शरण तुझा । आमुचे साकडे वारुनिया देवा । द्द्यावी तुह्मी सेवा एक चित्ते । एकाजनार्दनी संकल्प हा द्दढ । आता नाही गूढ तुम्हापुढे ।।६८७।।

**कीर्ति तुमची तिही लोकी** । तारिले पातकी अपार । जाहला विश्र्वास आधी मना । धरिले चरणा द्दढ मग । एकाजनार्दनी लडीवाळ । करा सांभाळ आता माझा ।।६८८।।

**कृपाळु माधव तु मुरारी** । अच्युता अनंता श्रीहरि । तुह्मी तारिले अहिल्येसी । उध्दरिले अजामेळासी । महादोषांची दोष श्रेणी । ती तारिली कुंटणी । रामनाम जपे अनुदिनी । शरण एकाजनार्दनी ।।६८९।।

**त्रिभुवनी तुमची थोरी** । पतितपावन म्हणती हरी । ते हे तारक सत्यनाम । शंकराचा तू विश्राम । ब्रीद गाजे पतिताचे । तिही लोकी तुमचे साचे । शरण एकाजनार्दन । आम्ही पतीत तू पावन ।।६९०।।

**ज्याचा केला अंगिकार** । न मानी भार त्याचा हा । अरिमित्रा सम देणे । एकचि पेणे वैकुंठ । उत्तम मध्यम बांडाळ । देणे स्थळ एकची । एकाजनार्दन भाकी कीव । उद्धारा जीव पातकी ।।६९१।।

**उपमन्यु प्रल्हाद तारिले आळीके** । मी तुझे लाडके सानपणे । नेणतीयासी धावसी तू त्वरा । शाहाणे येरझारा मरताती । एकाजनार्दनी शरण एकपणी । नेणता जाणता चरणी तुझे देवा ।।६९२।।

**पोटीचे बाळ अवगुणी वोखटे** । परि मायबापा स्नेहो मोठे । तयापरि उदरा आलो जी स्वामी । अवगुणाच्यापरी नुपेक्षा तुम्ही । गुण नाही तेथे कर्म कैचे धड । परि मायबापा वाटतसे कोड । एकाजनार्दनी उद्धव साचे । म्हणोनी हरिदासा कौतुके त्याचे ।।६९३।।

**जेणे जेणे आमुच्या मना समाधान** । ते ते करू ध्यान तुमचे देवा । करुणाकर तुह्मी पतित पावना । अहो नारायणा वेदवंद्दया । भाकितसो कीव होऊनि उदास । आता निराश नका करू । एकाजनार्दनी नका दुजे आता । अहोरुक्मादेवीकांता पांडुरंगा ।।६९४।।

**शरणागता कृपाळू उदार पंढरीराणा** । जाणतसे खुणा अंतरीच्या । तिही त्रिभुवनी चाले एक सत्ता । ह्मणोनि तत्वता कीव भाकी । करुणाकर तुह्मी भक्तांचे जीवन । हे आह्मा वचन श्रुतिवाक्य । एकाजनार्दनी आलोसे शरण । कायावाचा मन जडले पायी ।।६९५।।

**साचपणे माझे करावे धावणे** । कायावाचामने शरण तुह्मा । अहो पंढरीराया नका आता दुजे । विश्रांति सहज तवचरणी । एकाजनार्दनी माझा अभिमान । वाढविले आपण ह्मणोनिया ।।६९६।।

**बहु उतावीळ** । पांडुरंगा तू दयाळ । मागे तारिले बहुता । माझी असो द्दयावी चिंता । दयाळ तू पांडुरंगा । मज धरावे वोसंगा । सेवा तुह्मी देवा । केली दुर्बळाची केशवा । उचिता उचित । एकाजनार्दनी मात ।।६९७।।

**भजन नाही मी अकर्मी वाया** । अभिनव अवगति जाली देवराया । नीचा नीच मिची एकु । मजवरी उपवरी वर्ते सकळ लोकु । अंधाअंध अधोगत पाही । मजहूनी अंधाअंध कोणी नाही । एकाजनार्दनी नीच हा नेला । मुगीयांचे पाई सगळा सामावला ।।६९८।।

**पंचानने मज घतिले वेढून** । नेताती काढून प्राण माझे । गजेंद्राकारणे त्वा घातली उडी । तैसा लवडसवडी धावे देवा । तुजवाचून मज नाही आधार । एकाजनार्दनी पार उतरी देवा ।।६९९।।

**अहो नारायणा** । सांभाळावे आह्मा दीना । आमुची राखावी ती लाज । परंपरा हेचि काज । सांभाळावी बिद्रावळी । करुणा कल्लोळी दयाळा । एकाजनार्दनी शरण । करुणाकर पतितपावन ।।७००।।

**थोर अन्यायी दयाधना** । सांभाळी दीना आपुल्या । वारंवार क्षणोक्षणी । मस्तक चरणी तुमच्या । कुर्वडीन आपुली काया । तुमचे पायावरुनी । एकाजनार्दनी तुमचा दास । न करा उदास तयासी ।।७०१।।

**तुम्ही कृपावंत देवा** । माझा हेवा चुकवावा । सापडलो काळाहाती । उगवा गुंती तेवढी । माझे मन तुझे चरणी । राहो चक्रपाणी सर्वदा । शरण एकाजनार्दनी । तुम्ही धनी ब्रह्मांडी ।।७०२।।

**आह्मा तुमचा भरवसा** । सांभाळावे जगदीशा । आपुली आपण जतन करा । ब्रीदावळी हे दातारा । आम्ही पतिताना कोडे । तुह्मा घातले साकडे । शरण एकाजनार्दनी । मोक्ष मुक्ती तुमचे चरणी ।।७०३।।

**वाया बोभाट अनंता** । शरणागता उपेक्षिलिया । अपमानाचे भातुके । तुह्मा सुखे देतील । एकापरिस एक थोर । तुमचा बडिवार चालू न देती । विनवी जनार्दनाचा एका । देवा लौकिका सांभाळा ।।७०४।।

**तुम्ही बहुतांचे केलेसे धावणे** । आता नारायणे कठिण केले । होऊनी उदास अवलोकिता दिशा । पुरावा माझी इच्छा मायबापा । एकाजनार्दनी त्रैलोकी नाम । तुम्ही तो निष्काम देवा बहु ।।७०५।।

**धावण्या धावता न लावा उशीर** । हा श्रेष्ठाचार मागे आला । गुणदोष नाही पाहिले कवणाचे । केले बहुतांचे धावणे देवा । एकाजनार्दनी पतितपावन । हे तो तुम्हा वचन साजतसे ।।७०६।।

**जाणा पाळू कळा** । कृपाळुवाजी दयाळा । काहो आता उपेक्षिले । मज दीनासी ये वळे । पाहतो वास देऊनी धीर । काहो पडियेला विसर । चित्त सर्व तुमचे पायी । कृपावंता भेटी देई । एकाजनार्दनी एकपणे । तया नाही दुजे पेणे ।।७०७।।

**तुम्ही कृपाळ कृपाळ** । विश्र्व जन प्रतिपाळ । म्हणवोनी सांभाळ करी माझा । तुज ऐसा देव नाही त्रिभुवनी । म्हणोनी येतो काकुलती । कृपाळूवा श्रीपती । एकाजनार्दनी देवा । सर्व सारुनि पायी ठेवा ।।७०८।।

**अनाथाचा नाथ दीनाचा दयाळ** । म्हणवोनी सांभाळ करी माझा । तुज ऐसा देव नाही त्रिभुवनी । म्हणवोनी चरणी विनटलो । बापाजनार्दना कृपा करी दान । सांभाळी वचन आपुले ते । एकाजनार्दनी भेटी देई देवा । संतापाई भावा मिठी पडो ।७०९।।

**आनंदाचा भोग घालीन आसनी** । वैकुंठनिवासिनी तुझे नावे । येई वो विठ्ठले अनाथांचे नाथे । पंढरीदैवते कुळ देवी । आपुले म्हणावे सनाथ करावे । एकाजनार्दनी वंदावे संतजना ।।७१०।।

**कै तयामागे चरण चालती** । ऐशी वाटे खंती दीनराती । कै या मनाची पुरेल वासना । कै मिठी चरणा देईन जीवे । कै हे भाळ ठेवीन चरणी । कै पायवणी घेईन सुखे । एकाजनार्दनी कै होईल कृपादान । कै नारायण प्रेमे भेटे ।।७११।।

**वारंवार देही हेचि पै वासना** । अखंड चरणा घालीन मिठी । हा माझा नवस आठवीन पाय । आणीक ते काही नेणे दुजे । संकल्पासी कै येईल अंकुर । कै धीराधीर होईल मन । एकाजनार्दनी अखंड वासना । पुरावा नारायण देऊनी भेटी ।।७१२।।

**कृपाळू मांडली उभी भीमातटी** । लागलीये आशा जीवासी मोठी । कई भेटेल माझा मायबाप । उजळोनी दीप वोवाळीन श्रीमुख । शून्य स्थावर व्यापुनी वेगळा राहे । एकाजनार्दनी वंदिन त्याचे पाय ।।७१३।।

**हीच मुख्य उपासना** । तुमच्या चरणा दंडवत । गुणदोष पाहू नका । कीर्तनी सुखा लुटावे । संत चरणी सदा भाव । करा वाव संसार । लडिवाळ जनार्दना एका । कीव देखा भाकितसे ।।७१४।।

**कै मनीची इच्छा पुरेल ही धाव** । पाहीन पंढरीराव जाऊनिया । आलिया जन्माचे होईल सार्थक । निवारेल दु:ख भय पीडा । कै हे मस्तक ठेवीन चरणी । पाहीन डोळे भरुनि श्रीमुख ते । एकाजनार्दनी कै होईन पात्र । नासेल समस्त तापत्रय ।।७१५।।

**माहेरीची वास पाहीन मी डोळा** । संतांचा पै मेळा येता देखे । घालुनी दंडवत लागेन मी पाई । जीव हा उतराई करुनी सांडी । कुर्वडीन काया तयावरुन भावे । जीवे वोवाळावे जीवलगा । आषाढी कार्तिकी प्रेमे करती वारी । तयाची मी थोरी काय वानू । एकाजनार्दनी धन्य ते दैवाचे । निरंतर वाचे विठ्ठलनाम ।।७१६।।

**मागणे हेचि माझे देवा** । दुजेपण दुरी ठेवा । मी तू ऐसी नको उरी । जनार्दना कृपा करी । रंक मी एक दीन । माझे करावे स्मरण । नीच सेवा मज द्दयावी । एकाजनार्दनी आस पुरवावी ।।७१७।।

**आहमी दीन तू दीनानाथ** । तिही लोकी तुझी मात । आम्ही पतीत तू पावन । ऐसे शोभे नामाभिमान । आम्ही अनाथ तू कैवारी । ऐसी तुझी आहे थोरी । आहमी अनाथ तू कैवारी । ऐसी तुझी आहे थोरी । आहमी दीन तू वत्सल । ऐकिला तो ऐसा बोल । नको धरू दुजे आता । कृपाळू तू दीनानाथा । एकाशरण जनार्दनी । ऐसे चालत आले दुरुनी ।।७१८।।

**संपत्ती संतती मजला नावडे** । स्वरूप आवडे तुझे देवा । तुझ्या रुपी सुख माझिया लोचना । आणिक नारायणा न पाहती । हस्त इच्छीताती तुज भेटावया । सेवाहि कराया सर्व काळ । चित्त जडले पायी सदा सर्व काळ । राहिली तळमळ तयाची ते । एकाजनार्दनी तुझे नाम मुखी । नको आणिका सुखी गोऊ मज ।।७१९।।

**देवा तुष्टला मग दे घे** । तुजवाचूनि काही नेचे । देवा इतुली कृपा करी । जो मी तुझा घोट भरी । आणिक काही मागेन जरी । तरी मज दंडावे हरि । वैकुंठ देई रे एका । तो तव फोडीन फटका । क्षीरसागर शेषशयन । इतुके न दे चालवण । सोहं पद विसावून । देता घेता लाजिरवाणे । एकाजनार्दनी तुष्टला । सकल सर्वांगी घोटला ।।७२०।।

**वारंवार संतसंग** । गाऊ अभंग हरि नाम । वाचे किर्ती पाय पंथी । आणिकांची स्तुती न गाऊ । एकविधपणे राहु । वाचे गाऊ विठ्ठल । एकाजनार्दनी सेवा । तुमचे देवा दास्यत्व ।।७२१।।

**मज तो आणीक नाही चाड** । येवढी जोड पायांची । वास द्ययावा पंढरीचा । संतांचा समागम । कीर्तने नाचेन महाव्दारी । गरुडपारी कान धरुनि । ऐसे लडिवाळ तान्हे । एकाजनार्दनाचे पोसणे ।।७२२।।

**माझे मन राखोनी पायी** । करा समाधान देही । हेचि मागतो साचार । वारंवार जोडोनि कर । ब्रहमज्ञानाची आटी । नका योगाची कसवटी । भुक्तिमुक्ती नका आड । ब्रहम सायुज्यता भीड । लागतो चरणा । शरण एकाजनार्दना ।।७२३।।

**माझे मन अति चंचळ** । त्यासी बांधा तुहमी सबळ । मग ते कोठे नव जाय । तुमचे सोडोनिया पाय । सुख दु:खाचे कारण । मनचि हे अधिष्ठान । एकाजनार्दनी शरण । मने मनासी बंधन ।।७२४।।

**माझे मन राहो तुझे पायी** । वास पंढरीचा देई । जन्म देशी भलते परी । वाचे राम विठ्ठल हरी । जन्मासीया भिणे । हे तो आम्हा लाजिरवाणे । मोक्षमुक्तिते देवा । नको गोऊ तया ठाया । हमणे जनार्दनी एका । संतसंग द्ययावा निका ।।७२५।।

**वाउगे बोल जाती वाया** । पंढरीराया कृपेविण । तुमचा छंद वसो मनी । संतचरणी वास सदा । नको आत्मस्थिति वाया शीण । तुहमाविण दयाळा । एकाजनार्दनी शरण । मनाचे मोहन तुहमी माझे ।।७२६।।

**जेथे जेथे मन जाईल वासना** । फिरवावे नारायणा हेचि देई । वारंवार द्ययावा नामाचा आठव । कुबुद्धीचा ठाव पुसा सर्व । भेदाची भेदांची भावना तोडावी कल्पना । छेदावी वासना समूळ कंद । एकाजनार्दनी नका दुजा छंद । रामकृष्ण गोविंद आठवावा ।।७२७।।

**येवढा पुरावा मनीचा छंद** । वाचे गोविंद आठऊ द्या । मग मी तुमच्या न सोडी पाया । करीन काया कुर्वंडी । वारंवार क्षणक्षणा । संत चरणा वंदिन । दुजा नका काही हेत । एकाजनार्दनी मागत ।।७२८।।

**मागणे ते एक आम्हाप्रती द्यावे** । निरंतर यावे जागरणा । या हरिदासाचा संग बरवा । आनंद राघवा गाऊ गीती । जो न लभे तप तीर्थदानी । तो हरिकीर्तनी तिष्ठतसे । जनार्दनाचा एका ह्मणे । कृपा करणे जगरावे ।।७२९।।

**सर्वभावे विनवणी** । मस्तक चरणी देवाच्या । सदा पाहावे रूप डोळा । वाचे चाळा हरि नाम । निजध्यास कीर्तनाचा । समागम तो संतांचा । एकाजनार्दनी ह्मणे देवा । हीच सेवा मज द्यावी ।।७३०।।

**आमुच्या निज सुखधामा** । तुझे चरण पुरुषोत्तमा । आह्मावरी कृपा करा । उद्धारा दातारा दीनासी । देऊ निया नाम किर्ती । बसवा मूर्ति हृदयी । एका शरण जनार्दनी । ठाव मागतसे चरणी ।।७३१।।

**तुमचे वर्णिता पोवाडे** । कळीकाळ पाया पडे । तुमची वर्णिता बाळलीला । ते तुज आवडे गोपाळा । तुमचे वर्णील हास्य मुख । त्याचे छेदिसी संसार दु:ख । तुमचे द्रुष्टीचे दरूशन । एकाजनार्दनी ते ध्यान ।।७३२।।

**काही न करू आणीक आन** । वाचे गुण गाऊ तुमचे । पाहू डोळेभरी मूख । तेणे सुख इंद्रिया । न करू कोणा ताडातोडी । आहे ती खोडी दूर करू । एकाजनार्दनी प्रमाण । वाचे नारायण आठवू ।।७३३।।

**श्रवणी ऐकेन तुमचे गुण नाम** । वाचे आणीक काम न करी काही । डोळे भरुनिया पाहीन श्रीमुख । सुखाचे ते सुख हृदयात । अष्टभावे कंठी दाटेन सग्दद । सुखाचे ते सुख हृदयात । सांडोनी भेदाभेद आन देवा । एकाजनार्दनी यापरते प्रेम । आन नाही विषम मजपाशी ।।७३४।।

**तुह्मी उदार कृपाळ** । मागे केले प्रतिपाळ । तैसे मज सांभाळावे । वदनी वदवावे नाम तुमचे । आशापाश नका मोह । याचा नि:संदेह पाडावा । एकाजनार्दनी विज्ञापना । परिसा दीना दासाची ।।७३५।।

**नेणे साधन पसारा** । व्रता तपाच्या निर्धारा । आवडी गाऊ तुझे नाम । तेणे पुरती सर्व काम । आणीक न करू चावटी । आगम निगम आटाआटी । न करी साधन काही । एका'जनार्दनी पाही ।।७३६।।

**देवा तुम्ही आहात समर्थ** । काय मागू मी पदार्थ । देणे द्दयाल तरी हेचि द्दयावे । संत चरण मी वदावे । दुजे मागणे सायासी । नाही नाही हृषीकेशी । बोलतसे तोंडभरी । ऐसे नका ह्मणु नका हरि । अंकीत मी तुझा देवा । एकाजनार्दनी ठेवा ।।७३७।।

**दास्यत्व करीन मी देवा** । माझी पुरवा आस तुहमी । देऊनिया कृपादान । निरवावे जाण संतासी । मग ते धरिता आपुले करी । होती कामारी भुक्ती मुक्ति । एकाजनार्दनी शरण । तुमचे महिमान न कळे ।।७३८।।

**नाम धारकाचा** । दास होईन मी साचा । आणीक नको थोरपण । वाचे वदो त्याचे गुण । नामी सदा वसो हेत । हेचि मागणे मागत । हेचि द्दयावे कृपादान । एकाजनार्दनी शरण ।।७३९।।

**माझीया जीवी आवडे** । संत समागम रोकडे । हेचि द्दयावे कृपादान । कृपाळु तू नारायण । एकाजनार्दनी म्हणवी दास । त्याची पुरवावी आस ।।७४०।।

**तुम्ही उदार सर्व गुणे** । मी रंकपणे रंकाहुनी । कायावाचा आणि मने । केले समर्पण तव चरणी । आणीक नाही काही चाड । सेवा द्दढ संतांची । एकाजनार्दनी तुमचा । नाममुखी सदा संतांचा सांगात । प्रेम ह्रदयात विठोबाचे । एकाजनार्दनी हा माझा निर्धार । जन्माची वेरझार तोडी देवा ।।७४१।।

**दास्य करू हरिदासाचे** ।  तेणे जन्माचे सार्थक । बुद्धि वसो तुमचे नामी । आणिका कामी न गुंतो । संसार तो परिखा जाहला । या विठ्ठला पहाता । पालटला भेदाभेद । एकाजनार्दनी आनंद ।।७४२।।

**हेचि देवासी विनंती** । संत सेवा दिवसराती । वास देई पंढरीचा । नाम घोष कीर्तनाचा । सदा सर्वदा नाम मुखी । दुजे नको काही पारखी । एकाजनार्दनी हरीचा दास । ह्मणता पुरे सर्व आस ।।७४३।।

**देवा माझे मन लागो तुझे चरणी** । संसार व्यसनी पडो नेदी । नामस्मरण घडो संत समागम । वाउगाची भ्रम नको देवा । पाई तीर्थयात्रा मुखी रामनाम । हाची माझा नेम सिद्धी नेई । आणीक मागणे नाही नाही देवा । एकाजनार्दनी सेवा द्दढ देई ।।७४४।।

**उपासना हिच बरी** । वाचे हरि हरि ह्मणावे । काय दुसऱ्याचे काम । वाचे नाम आठवता । चातकाचा जैसा नेम । पूर्ण काम हरि करी । एकविध आमुचा भाव । एकाजनार्दनचि देव ।।७४५।।

**पूर्वाचिया मतांतरा** । सापडला बरा आह्मा मार्ग । नाही कोठे गोवा गुंती । ऐसे गर्जती हरिदास । वाचे नाम करे टाळी । साधन कली उत्तम हे । घालो कीर्तनी प्रेमानंदे । वाचे आनंदे गाऊ गीत । एकाजनार्दनी धरली कास । नाही आस दुसरी ।।७४६।।

**वरपांग सोंग नको माळा मुदी** । ठाव संतपदी देई देवा । प्रेम भाव देई प्रेमभाव देई । मागणे दुजे नाही आणिक ते । नाममुखी सदा संतांचा सांगात । प्रेम हृदयात विठोबाचे । एकाजनार्दनी ठेवा ।।७४७।।

**पायाची चिंतन** । माझे हेचि भजन । भजनाचा मुख्यभाव । चित्ती चिंतन लवलाहो । राहो माझी मती । भजनी ते दिनराती । हेत दुजा मनी । ठेऊ नका चक्रपाणी । मज पाया परते । नका ठेवू जी निरुते । कृपाळूजी देवा । एकाजनार्दनी ठेवा ।।७४८।।

**जेथे मुख्यत्वे करावी भक्ती** । घडावी संतांची संगती । हेचि मागणे तुह्माप्रती । द्यावे निश्चिती मज देवा । पुरवा पुरवा माझा हेत । दुजे मागणे नाही निश्चित । आयुष्य अंतवरी नामस्मरण । गीता भागवताचे श्रवण । विष्णू शिवमूर्तीचे ध्यान । हेचि देणे सर्वथा । ऐकोनी ऐसे वचन । जनार्दन तुष्टला प्रेमे करून । एकाजनार्दनी पाय धरून । सप्रेमे आलिंगिला ।।७४९।।

**गुंतला प्रपंची सोडवी गा देवा** । देई तुझी सेवा जिवेभावे । न लगे धन मातापुत्र दारा वित्त । सदा पायी चित्त जडोनी राहो । वैष्णवाचा दास कामारी नि:शेष । हेचि पुरवी आस दुजे नको । एकाजनार्दनी करित विनंती । मागणे श्रीपति हेचि द्यावे ।।७५०।।

**जयजयाजी देवाधीदेवा** । पंढरीरावा श्रीविठ्ठला । भुक्ती मुक्ती नको काही । लिंगाड तेही मज आता । भाळी भोळी घ्यावी सेवा । हीची देवा विनवणी । एकाजनार्दनी तुमचा दास । त्याची आस पाया पै ।।७५१।।

**माझे मन तेथे वसो** । आणीक नसो दुजे काही । होईन हरीचा वारकरी । करीन वारी पंढरीची । संसाराचा वीट आला । आवडला संतसंग । शरण एकाजनार्दनी विनंती । पुढती करुणा असो द्या ।।७५२।।

**हेची माझी मनीची आस** । करा दास सेवेसी । नका काही गुंतागुंती । लिगाड फजिती मज मागे । संसार तो फलकट । दाखवा वाट पंढरी । एकाजनार्दनी विनंती । पुढती करुणा असो द्दया ।।७५३।।

**तुमच्या सेवेचा महिमा** । मज न कळे पुरुषोत्तमा । पूजा कारणे कवणे रिती । नेणे जप माळ हाती । स्नानसंध्या न कळे काही । मन असो तुझे पायी । तुह्मा मागणे इतुके । एकाजनार्दनी द्दयावे कौतुके ।।७५४।।

**भाग्यहीन बहुअसती** । कमळांपती सांभाळणे । गर्जे ब्रीदाचा तोडर । चराचर त्रिभुवनी । शरणागता वज्र पंजर । हा वडिवार त्रिजगती । शरण एकाजनार्दनी । कैवल्यदानी उदार ।।७५५।।

**शरण शरण नारायणा** । आह्मा दीना तारावे । मागे बहु शीण पोटी । पाडा तुटी तयाची । संसाराचा चुकवा हेवा । मागील उगवा गुंती ते । तुह्मी कृपा केल्यावरी । मी निर्धारी पात्रचि । शरण एकाजनार्दनी । तुम्ही तो धनी त्रैलोक्याचे ।।७५६।।

**सर्वभावे शरणागत** । जाहलो निश्र्चित कृपाळा । आता कळे तैसे करी । तुम्ही उदार श्रीहरी । मी आलो असे शरण । कृपा करणे उचितचि । शरण एकाजनार्दनी । रिद्धी सिद्धि तुमचे चरणी ।।७५७।।

**शरण आलो तुझिया पाया** । कृपानिधी देवराया । पशु उध्दरिले गजासी । गणिका नेली वैकुंठासी । ऐसा कृपेचा कोवळा । भक्ता आधीन गोपाळा । एकाजनार्दनी शरण । हीच लाधली निजखुण ।।७५८।।

**अहो देवा गुणनिधाना** । परिसा विज्ञापना एक माझी । माझे मज आश्र्वासन । देखिल्या चरण तुमचे । हेचि माझी करुणा करा । भक्ति अवधारा भोळी ते । शरण एकाजनार्दनी । माझी विनवणी परिसावी ।।७५९।।

**तुझीया कृपेचे पोसणे मी दीन** । करी तू जतन जनार्दना । अंकित मी दास कायामनेवाचा । हेलावा कृपेचा करी देवा । कदा नुपेक्षिसी आलिया । शरण हे मागोनी महिमान चालत आले । एकाजनार्दनी कृपेचा वोरस । करी जगदीश मजवरी ।।७६०।।

**मज तो अधिकार नाही** । शरण आलो तुझे पायी । तुहमी पशु गजाते उद्धरिले । गणिक तारिले कुंटनीसी । ऐशी शरणागत माउली । एकाजनार्दनाची साउली ।।७६१।।

**माझे मनोरथ चरणाची आवडी** । दुजियाची जोडी नको आता । वाउगा पसारा नका गोऊ मन । चरणापाशी जाण स्थिर होय । एकाजनार्दनी पुरवी वासना । दुजे नारायण नको काही ।।७६२।।

**भक्ति माझी भोळी** । भाव एकविध बळी । अहो परिसा नारायणा । जाणोनी अंतरीच्या खुणा । नाही तुम्हा साकडे कायी । भुक्तिमुक्ती तेही मागणे । शरण एकाजनार्दनी । माझी विनवणी परिसावी ।।७६३।।

**सर्वाभूती तुझे रूप** । हृदयी सिद्धची स्वरूप । इतुले देई अधोक्षजा । नाही तरी घोट भरीन तुझा । सकळाहूनी करी सान । सकळिकी समसमान । सदा द्यावा संतसंग । अखंड कीर्तन अनुराग । नि:शेष दवडोनीया स्वार्थ । अवघा करी परमार्थ । एकाजनार्दनी मागे । नाही तरी घाला घालीन अंगे ।।७६४।।

**तुमचे जाहलिया दरुशन** । जन्ममरण फिटला पांग । आता धन्य जाहलो करुणाकरा । विश्र्वभरा दयाळूवा । मागे कासाविस बहु जाहलो । दरुशने पावलो सुखाते । एकाजनार्दनी कृपा केली । फळासी आली सर्वस्वे ।।७६५।।

**आह्मी तो वासना भाजियेली बळे** । वैराग्याचेनि बळे आथियेले । सांडिला वेव्हार माया लोकाचार । भरला निर्धार हृदयामाजी । एकाजनार्दनी खुटली वासना । जनी जनार्दना अभ्यासिले ।।७६६।।

**माझे देई मज लागून** । ह्मणोनी दृढ धरिले चरण । भक्तीचे ऋण देवा । देई माझे मज केशवा । माझे देता जड काई । अभिलाष धरीन पायी । एका अभिलाषे फावला । एकाजनार्दनी उभा केला ।।७६७।।

**जाईल तरी जावो प्राण** । परी मी न सोडी चरण । ऐसा विश्र्वासलो हरी । नाम तुमचे कंठी धरी । होईल ते होवो साचा । परी न संडो नाम वाचा । चित्त वेधले चिंतनी । शरण एकाजनार्दनी ।।७६८।।

**ऐके गा हृषीकेशी** । जाणोनी तू विश्र्वासी । निजगुह्य तुजपाशी । ठेवणे दिधले । आह्मा चाळवोनी विषयासी । थिते बुडवू पाहासी । क्रियानष्ट होसी । तूचि येक । आमुचे आम्हा देता । तुज का नये चिंता । लाजसी तत्वता । भक्ति घेसी । नेता पंचापाशी । भले नव्हे हृषीकेशी । मजसी समान होसी । एकाजनार्दनी ।।७६९।।

**वेव्हाराच्या ठाई** । तुझे न चले काही । मी तू दोघे पाही । सरिसे तेथे । ठेविले बुडविसी । शेखी जाचही न देसी । ऐकोन नायकसी । गहीसपणे । खावळलो जरी जाण । गिळीन मीतूपण । तेथे देवपण । उडविन तुझे । जो सांगे पांचापाशी । त्याचे तोंड तू धरिसी । ठकडा कैसा होसी । म्हणे एकाजनार्दनी ।।७७०।।

**जीही जाणितले वर्मासी** । त्याचे दास्य करसी । गर्भवास सोशिसी । लाचेसाठी । घर कुटुंब ना अभावो । गाव ना तुज ठाव । सोलाट तू पाहा हो । लागला जगी । बहुताचे ठेवणे । बुडविले येणे । शेखी जीव घेणे । मागल्यासी । मायबापेविण । वाढला हा जाण । शरण एकाजनार्दन । जाती गोतपणे ।।७७१।।

**होता व्दारपाल लाज वाटे थोरी** । न साहे भिकारी जाला हरि । बळीच्या तो व्दारी सारथी पार्थाचा । गोसावी आमुचा वेदवाणी । गर्भ न साहाती यातायाती जना । एकाजनार्दना शरण वेगे ।।७७२।।

**सर्वस्व हरुनी ह्मणसी बळीसी** । म्या बांधिले विचारिसी कोण कोण । व्दारी व्दारपाळ झालासी अंकीत । सांग बुद्धिमंत ऐसा कोण । ऐसे नाथिलेशी आपणा गोवीसी । एकाजनार्दनी बोल आह्मा का ठेविसी ।।७७३।।

**बळी अर्पिता देहासी** । व्दारपाळ होशी तयाचा । सांगा थोरपण आहे कोण । घेतल्यावाचून न देशी तू । धर्म आधी पूजा करी । ह्मणोनी घरी राबती तू । एकाजनार्दनी ऐसा उदार । घेता निर्धार देशी तू ।।७७४।।

**न लगे भुक्तिमुक्ति न लागे स्वर्गवास** । नको वैकुंठवास देवराया । न लगे योगयाग अष्टांग साधन । न चुके बंधन येणे काही । न लगे इष्टमित्र सोईरे संबंधी । नको ही उपाधि पाठी लाऊ । एकाजनार्दनी चुकवोनी पाल्हाळ । करी मज मोकळ गुरुराया ।।७७५।।

**जय गोविंदा परमानंदा ऐक माझे बोल** । निर्गुणरूपे असता तुझे काहीच नव्हे मोल । मग तूझे काहीच नव्हे मोल । मग तू माया धरुनी अती जाहलासी सबळ । नसते देवपण अंगी आणुनी चाळविसी केवळ । ऐसा लाघवी तु रामा । नको चाळवू आम्हा । नसता तुज मज भेद देवा लटिके जीवपण देसी । आपुले ठाई थोरपण आणुनी आमुची सेवा घेसी । नसती अविद्दया पाठी लावुनी संसारी गोविसी । नाना कर्मे केली ह्मणोनी आह्मा दंडिसी । मते भवे भजिजे ऐसा उपदेश करिसी । आपुल्या भक्ता तारिन ह्मणोनी प्रताप बोलसी । निदक दुर्जन अभक्त त्याते नरकी तू घालिसी । आपुल्या स्वार्थालागुनी दुसरीयाते का पिडीसी । आपुली महिमा वाढो ह्मणोनी आम्हा भक्त केले । लक्ष चौऱ्यायशी योनी देऊनी संसारी

गोविले । भावे तूते न भजो ह्मणोनी आकस आरंभिले । तुज मज वैर देवा ऐसे करिता नव्हे भले । ऐसे तुज मज वैर ह्मणोनी गुरूसी शरण गेलो । देवभक्तपण कोण्या कर्मे मग पुसो लागलो । सद्‌गुरू ह्मणती सर्वही मायिक निश्र्चये बोलिलो । देव आणि भक्त एकचि गोष्टीसी पावलो । मग गुरुकृपे करून तुझे गिळीन देवपण । तुझिया नेणो भक्तीवरी घालीन पाषाण । जीब शिव दोन्ही मिळोनी मग मी सुखे राहीन । तुज मज रूप ना रेखा त्याते निर्धारीन । ऐसे भक्त बोल ऐकोनी देवा थोर उपजली चिंता । विवेकबळे करुनी माझे देवपण उडविले आता । यालागी भिणे भक्तजनासी ऐक्य करुनी तत्वता । एकाजनार्दनी दरूशन द्‌यावे लागेल त्वरिता ।।७७६।।

संसारकूपी हरी पाडियेलो श्रीहरी लाहुनी पै शरीर । एक पिसे लागे काहीएक न करवे पंचभूतीक विकार । सुष्टदुष्ट कर्मे करिता हे शिणले मळमूत्र दोष जर्जर । ऐसिया जीवाते उध्दरसी ह्मणोनी ब्रीद साजे रहुवीर । यालागी रामचंद्रा रामचंद्रा । ह्रदयी धरली नाममुद्रा । आशा तृष्णा दोन्ही त्रेहाळ नागिणी कामक्रोध हे विखार । त्यांचिया संगती विषयवृद्धी जाली लहरी दु:ख दारिद्र । इंगळाचे शेजे अंथुरिता वरी तिडकीया आरुवार । ऐसा हा संसार जाणोनी दस्तुर ठाकियेले तुझे व्दार । कौळीके रूप कपटी धरियेले ते त्वा साचार केले । साभिमान्या देव गुरुचक्रवर्ती त्रिभुवनी यश थोरले । पाखीरु वाचिया लोभाकारणे गणिकेसी कैवल्या दिधले । दंभ प्रपंच वोळांगता जीव तया तू सायुज्य देसी आपुले । श्रीवत्स ब्राह्मणे हालासी पापरा आता तूते पद मिरविसी दातारा । चरण स्पर्शे त्वा अहिल्या उद्धरली विस्मयो थोर सूरनरा । जे गती देवकिये तैसीच पुतने विश्राम एक वोवरा । तुझे मुद्रांकित न भीये कळीकाळा तू स्वामी सारंग धरा । वनी सिंहाचे भय दाखविले अजाते बैसविली गजस्कंधी परमपुरुषा तुझे नाम उच्चारीता वोळगताती रिद्धीसिद्धी । उपमन्या आरते क्षीरसिधु दिधला येवढी प्रसन्नबुद्धी । न गणिता रावणु शरणागतु केला लंका निरोपीली आधी । नरसुर किन्नर पन्नगयक्ष त्रासियले संसारे । जाणोनी शुकदेव गर्भी स्थिरावला भयाभीत बोले उत्तरे । जननीयेच्या कष्टा निष्कृती व्हावया उपदेश केला दातारे । जीवन्मुक्त शुक मुनी जना वरिष्ठ जपतांची ध्यानी दोन अक्षरे । ऐसा सहस्त्रमुखे वर्णिता नातुडसी गा देवा धोंडाळिता सिद्ध पंथ । जगदबंधु दिनानाथ समुद्धरण द्रोपदीचा वेळाईत । सुदामियाच्या दो पोह्याकारणे स्नेहे पसरिती हात । एकाजनार्दनी जवळी बोलाउनी उच्छिष्ट प्रसाद देत ।।७७७।।

## भक्ति

**भक्ताचिया काजा** । उभा पंढरीचा राजा । घेऊनिया परिवार । उभा तिष्ठे निरंतर । शोभे गोपाळाची मांदी । रुक्मिणी सत्यभामा आदी । शोभे पुढे भीवरा नीर । भक्त करती जयजयकार । एकाजनार्दनी ध्यान । चिमणे रूप गोजिरे ठाण ।।७७८।।

**पायावरी ठेविता भाळ** । गेली तळमळ सकळही । बैसले रूप डोळा आधी । गेली उपाधी सकळ । एकाजनार्दनी मंगळ जाला । अवघा भरला हृदयी ।।७७९।।

**गोजिरे ठाण विठोबाचे** । आवडी साचे बैसली । आणखी न धावे मन । समचरण पाहताचि । नाही आन दुजी वासना । आवडी चरणा बैसलीसे । एकाजनार्दनी मन । सांडीन कुर्वंडी करून ।।७८०।।

**आलिंगनालागी उतावेळ मन** । देखेन चरण विठोबाचे । मना समाधान मना समाधान । मना समाधान राहे मना । देखलिया मूर्ति सावळी सगुण । मग नाही बंधन मना तुज । एकाजनार्दनी मन आवरिले । द्दढ ते ठेविले विठ्ठलपायी ।।७८१।।

**पायी जडले माझे मन** । चित्त जाले समाधान । तुमच्या नामाचा महिमा । आजी पावन केले आह्मा । कृपा केली तुह्मी । लावियेले आपुले नामी । एकाजनार्दनी पूर्ण कृपा । तेणे मार्ग जाला सोपा ।।७८२।।

**कुर्वडीन काया मन** । समचरण देखोनिया । ऐसा वेधी वेधक कान्हा । विठु मना बिसलासे । नावडे काही दुजे चित्ती । श्रीविठ्ठलमूर्ति पाहताचि । एकजनार्दनी ध्यान । सुकुमार गोजिरे ठाण ।।७८३।।

**वेधोनी नेले आमुचे मन** । लागले ध्याम अंतरी । द्दष्टी धावे पहावया । आलिंगना बाह्या उतावेळ । चरण उतावेळ चालता पंथ । दुजा हेत नाही मनासी । एकाजनार्दनी डोई पायी । दुजा भाव नाही इंद्रिया ।।७८४।।

**येणे पांडुरंगे लावियेला चाळा** । बैसलासे डोळा निवडेना । मनाचिये मने घातिलीसे ठाण । नोहे उत्थापन कोणीकडे । वेधक वेधकू पंढरीचा राणा । एकाजनार्दना शरण होय ।।७८५।।

**देवासी काही नेसणे नसे** । जेथे तेथे उघडाची दिसे । देव निलाजरा देव निलाजरा । देव निलाजरा पहा तुह्मी । न लाजे जेथे नाही गाव । पांढरा डुक्कर झाला देव । एकाजनार्दनी एकल्या काज । भक्ति तेणेची नेली लाज ।।७८६।।

**हरीचे पहाता श्रीमुख** । सुखावले मन नित्य नवा हर्ष । परमप्रिय वो श्रीहरी । ध्याता ध्यान ध्येय सर्वहरी । एकाजनार्दनी पहाता हरी । हरीरूप दिसे चराचरी ।।७८७।।

**राजीवाक्ष प्रभु रुक्मिणीरमण** । मनोहर ध्यान श्रीकृष्णाचे । शंखचक्रगदा पद्म पितांबरधारी । नमिला कंसारी प्रेमभावे । मोक्ष अधिष्ठान पुण्य किर्ती स्थान । पतितपावन पांडूरंग एकाजनार्दनी देवाधिदेव । चित्ती वासुदेव राहो सदा ।।७८८।।

**आनंद अव्दय नित्य निरामय** । सावळा भासताहे मजलागी । वेधु तयाचा माझिया जीवा । काया वाचा मनोभावा लागलासे । वेधलेसे मन झाले उन्मन । देखता चरण गोडवाटे । पाहता पाहता पारूषला जीव । एकाजनार्दनी देव कळो आला ।।७८९।।

**अष्ट धातु वेगळा देखिला पुतळा** । जीवाचा जिव्हाळा श्रीविठ्ठल । तयाचे चरणी माझा दंडवत । घडो आणि चित्त जडो नामी । एकाजनार्दनी देखिला डोळा । जीवी जीवन कळा विठ्ठल देवो ।।७९०।।

**सर्वसुखाची उघडली खाणी** । श्रीमुख नयनी पहाता । मोक्षसुख आह्मा न लगे गा देवा । विश्रांतीची ठेवा आणिकासी । धनसुख मज कासया हे पोटी । पाहिजे लंगोटी सर्वभावे । स्त्रीसुख संसार कासया वेरझार । नको हा पसर मज देवा । एकाजनार्दनी नाशिवंत सुख । पहाता तुझे मुख इछ्या पुरती ।।७९१।।

**नाम घेता रूप आठविले सावळे व ही खुण गोपाळे दिली मज** । येणे जन्मे कृष्ण दाटोनी टाकणे । आडवस्ती पेणे चुकविली । चुकविली वस्ती एकाजनार्दने । संसार सांडणेसांडोनिया ।।७९२।।

**तुमचे नामसंकीर्तन** । हेचि माझे संध्यास्नान । तुमच्या पायाचे वंदन । हेचि माझे अनुष्ठान । तुमच्या प्रेमे आली निद्रा । हेचि माझा कालक्षेप । तुमच्या प्रेमे आली निद्रा । हीच माझी ध्यान मुद्रा । एकाजनार्दनी सार । ब्रह्मरूप हा संसार ।।७९३।।

**भुक्तिमुक्तिस कारण** । हरीचे जन्मकर्म गुण । हरिकीर्तनाची जोडी । सकळ साधने होती बापुडी । शिला तारिल्या सागरी । गोवर्धन उचलिला करी । निमाला गुरुपुत्र आणिला । मुखे दावाग्नि प्राशिला । तो सावळा श्रीहरी । एकाजनार्दनी चरण धरी ।।७९४।।

**पतितपावन नाम श्रीविठ्ठलाचे** । आणीक मी साचे नेणे काही । पतितपावन नाम वदे वाणी । विठ्ठलावाचुनी काही नेणे । पतितपावन नामे तारिली गणिका । अजामेळ देखा सरता केला । पतीतपावन नाम जनी वनी । एकाजनार्दनी नाम वाचे ।।७९५।।

**आम्हासी तो पुरे विठ्ठलची एक** । वाउगाची देख दुजा न मनी । ध्यान धरू विठ्ठल करू तयाचे कीर्तन । आणिक चिंतन नाही दुजे । ध्येय ध्याता ध्यान खुंटला पै शब्द । विठ्ठल उदबोध सुख आम्हा । एकाजनार्दनी विठ्ठल भरला । रिता ठाव उरला कोठे सांगा ।।७९६।।

**भिवारेचे तीरी उभा** । धन्य शोभा विठ्ठल । विटेवरी समचरण । तेथे मन गुंतले । संत जाती तया ठाया । मजही गावा त्या न्यावे । उपकार करा साचा । दाखवा दीनाचा सोयरा । एकाजनार्दनी बापमाय । वंदू पाय तयाचे ।।७९७।।

**घवघवीत वैकुंठनाथ** । भक्तवत्सल शोभत । तयाचे पायी माझे मन । राहो वृत्तिसह जडोन । नेणे आणीक दुजा छंद । वाचे आठवीन गोविंद । एकाजनार्दनी कटी कर । उभा चंद्रभागे तीर ।।७९८।।

**सायासाचा श्रम न करू पसारा** । विठ्ठलची बरा वाचे गाता । गोडपणे मिठी पडलीसे जीवा । वायामने हेवा दुजा नाही नाही । या विठ्ठलापरते न करी साधन । देखेन समचरण विटेवरी । एकाजनार्दनी विठ्ठलाची भेटी । सरलीसे तुटी गर्भवास ।।७९९।।

**मागे एक पुढे एक** । दोन्ही मिळोनी विठ्ठल देख । ऐसी हाताची मिळणी । दिले संसारासी पाणी । एक एक पहाता दिठी । होय विठ्ठलेसी भेटी । एक सांडूनि दुजा नाही । एकाजनार्दनी घ्याई ।।८००।।

**आम्हा नादी विठ्ठल छंदी विठ्ठलु** । हृत्पदी विठ्ठल मिळतसे । आहमा धातु विठ्ठल मातु विठ्ठल आनंदे । आहमा धातु विठ्ठल मातु विठ्ठल । गातु विठ्ठलु आनंदे । आहमा राग विठ्ठल रंग विठ्ठल । संग विठ्ठल वैष्णवांचा । आहमा ताल विठ्ठल मेळ विठ्ठल । कल्लोळ विठ्ठलु कीर्तने । आहमा श्रुति विठ्ठलु श्रोता विठ्ठलु । वक्ता विठ्ठल वदनी । आहमा मनी विठ्ठल ध्यानी विठ्ठलु । एकाजनार्दनी अवघा विठ्ठलु ।।८०१।।

**ध्येय ध्याता ध्यान विठ्ठल संपूर्ण** । ज्ञेय ज्ञाता पूर्ण विठ्ठल माझा । योगयाग तप विठ्ठलनामजप । पुण्य आणि पाप विठ्ठल बोला । उन्मनी समाधी विठ्ठल बोला वाणी । तारील निर्वाणी विठ्ठल माझा । मज भरवसा कायामनेवाचा । एकाजनार्दनी त्याचा शरणागत ।।८०२।।

**एक विठ्ठल वदता वाचे** । आणिक साचे नावडती । बैसलासे ध्यानी मनी । विठ्ठलावाचुनी दुजे नेणे । जावे तिकडे विठ्ठल भरला । रिता ठाव नाही उरला । एकाजनार्दनी भावे । विठ्ठल हमणता पाठी धावे ।।८०३।।

**गातो एका ध्यातो एका** । अंतर बाही पहतो एका । अगुणी एका सगुणी एका । गुणातीत पाहतो एका । जनी एका वाणी एका । निरंजनी देखो एका । संत जना पढिये एका । जनार्दना कडीये एका ।।८०४।।

**वाद विवाद अतिवाद** । नावडे कोणाचाही समंध । बोल एक आह्मा बोलणे । वाचे विठ्ठल म्हणे । आणिकाची चाड चित्ती । नाही नाही गा त्रिजगती । शरण एकाजनार्दनी । विठ्ठल भरलासे व्यापुनी ।।८०५।।

**एक विठ्ठल चिंतन** । आणिक दुजे तेघे मन । ऐसे घडता साधन । जोडे सर्व तयासी । हेचि एकविधा भक्ति । येणे जोडे सर्व मुक्ती । पर्वकाळ विश्रांती । तेथे घेती सर्वदा । तीर्थ वोढवती माथा । वंदिताती सर्वथा । तपांच्या चळवा । घडताती आपोआप । घडते यज्ञाचे पुण्य । आणिक तया नाही बंधन । शरण एकाजनार्दन । निश्र्चय ऐसा जयाचा ।।८०६।।

**देव विठ्ठल तीर्थ विठ्ठल** । अवघा विठ्ठल भरलासे । जन विठ्ठल देव विठ्ठल । जळी स्थळी भरलासे । भाव विठ्ठल देव विठ्ठल । अवघा विठ्ठल भरलासे । एकाजनार्दन मनी विठ्ठल । जप तप ध्यान विठ्ठल ।।८०७।।

**एकपणे पहाता सृष्टी** । भरला द्दष्टी विठ्ठल । नाही व्दैताची भावना । बैसला ध्याना विठ्ठल । मीतूपणा वोस ठाव । बैसला सर्व विठ्ठल । ध्यानी विठ्ठल मनी विठ्ठल । एकाजनार्दनी अवघा विठ्ठल ।।८०८।।

**रिता ठाव न दिसे पाहता** । भरला पुरता विठ्ठल । जनी वनी विजनी देखा । विठ्ठल सखा भरलासे । पहाता पाहणे परतले । विठ्ठले व्यापिले सर्वत्र । नाही पाहण्यासी ठाव । अवघा भाव विठ्ठल । एकाजनार्दनी व्यापक । विठ्ठल देख त्रिभुवनी ।।८०९।।

**मागे पुढे विठ्ठल भरला** । रिता ठाव नाही उरला । जिकडे पहावे तिकडे आहे । दिशाद्रुम भरला पाहे । एकाजनार्दनी सर्व देशी । विठ्ठल व्यापक निश्र्चयेशी ।।८१०।।

**विठ्ठलावाचुनी आणिकाचे ध्यान** । नाही आह्मा चिंतन दुजियाचे । आमुचे कुळीचे विठ्ठलदैवत । कुळधर्म समस्त विठ्ठल देव । विठ्ठलावाचूनि नेणो क्रियाकर्म । विठ्ठलावाचुनी धर्म दुजा नाही । एकाजनार्दनी विठ्ठल भरला । भरुनी उरला पंढरीये ।।८११।।

**उच्चार फुकाचा नाम हे विठ्ठल** । नाही काही मोल द्रव्य वेचे । जागृती सुषुप्ती स्वप्नी विठ्ठलनाम ध्यानी । गाऊ ते कीर्तनी दिननिशी । एकाजनार्दनी केला लागपाठ । तेणे सोपी वात वैकुंठीची ।।८१२।।

**रूप तेचि नाम नाम तेचि रूप** । अथवा संकल्प एकरूप पहाता पहाणे हरपले देही । देहीच विदेही होऊनी ठेलो । सांगता नवल पाहता सखोल । बोलता अबोल चोज वाटे । एकाजनार्दनी बोलण्या वेगळा । उभा तो सावळा विटेवरी ।।८१३।।

**पाहता पाहता भुलले मन** । धरिले चरण हृदयी । येथे वेधिला जीव प्राण । ब्रह्मज्ञान नावडे । तीर्थांचे जे अधिष्ठान । पुण्यपावन चंद्रभागा । सकळ देवांचा देव उभा । एकाजनार्दनी गाभा लावण्याचा ।।८१४।।

**वाचे विठ्ठल बोलावे** । मग पाउल टाकावे । ऐसा ज्याचा नेमधर्म । मुखी विठ्ठलाचे नाम । सर्वकाळ वाचे । विठ्ठल नाम वचनी साचे ।।८१५।। कुलधर्म आमुचा । ह्मणे एकाजनार्दनाचा ।।८१५।।

**माझ्या मना लागो छंद** । नित्य गोविंद गोविंद । तेणे देह ब्रह्मरूप । निरसेल नामरूप । तुटेल सकळ उपाधि । निरसेल आधिव्याधी । गोविंद हा जनी वनी । ह्मणे एकाजनार्दनी ।।८१६।।

**शब्दा आदि मध्य अंती** । उच्चारिता व्यक्ताव्यक्ती । विठ्ठल विठ्ठल जिव्हारी । मुक्ति होईल कामारी । विश्र्वी विठ्ठल उघडा पाहे । मुक्त होता वेळू काय । एकाजनार्दनी ठसा । विठ्ठल उभा नामासरिसा ।८१७।।

**तंतुपट जेवी एकत्व दिसती** । तैसा भगवद्भक्ति सर्वांभूती । सर्वत्री व्यापक विठ्ठल विसावा । ह्मणोनी त्याच्या गावा मन धावे । एकाजनार्दनी व्यापक विठ्ठल । तेथे नाही बोल आन दुजा ।।८१८।।

**लाडिके विठोबाचे आम्ही** । गाऊ नित्यनेमी नाम तुझे । उत्तम उत्तम साधन हे नाम । गाता गीती प्रेम वाटे जीवी । न कळेची वेदा उपनिषदबोधा । त्या हरि गोविंदा जपो आह्मी । एकाजनार्दनी मंगळामंगळा । न लगे आह्मा मोल उच्चारिता ।।८१९।।

**बहुत प्रकारे भक्तहि असती** । देवही भेटती तया तैसे । तैसा नोहे माझा पंढरीया राव । देवाधिदेव मुकुटमणी । एकविध तया शरण पै जाता । मोक्ष सायुज्यता पाठी लागे । न लगे धरणे पारणे करणे । उपवासी राहणे दंडमुंड । सुखेचि जाऊनी पायी घाला मिठी । एका जनार्दनी भेटी लाभ मग ।।८२०।।

**गाऊ तरी एक विठ्ठलची गाऊ** । ध्याऊ तरी एक विठ्ठलचि ध्याऊ । पाहू तरी एक विठ्ठलचि पाहू । आणिका न गोऊ वासनाही । आठवू तो एक विठ्ठल आठवू । आणिक न गोऊ

वासनाही । आठवू तो एक विठ्ठल आठवू । आणिक न साठवू हृदयामाजी । विठ्ठलावाचुनी मनी नाही आन । सर्वभावे प्रमाण विठ्ठल मज । एकाजनार्दनी जडला जिव्हारी । विठ्ठल चराचरी व्यापुनि ठेला ।।८२१।।

**सुखे मुख सोज्वळ पाहता द्दष्टी** । आनंदी आनंदमय तेणे सृष्टी । देखिला देखिला वैष्णवाचा रावो । देवाधिदेवो श्रीविठ्ठल रावो । देवाधिदेवो श्रीविठ्ठल । गोपाळ गजरी नाचती आनंदे । लीला विनोदे प्रेमरसे । भावाचा अंकित उभा राहे उभा । धन्य त्याची शोभा काय वानू । पाहता पाहता मन घाले सृष्टी । जनार्दनाचा एक परमानंदे पोटी ।।८२२।।

**परिपूर्णपणे उभा** । दिसे कर्दळीचा गाभा । अंगीचिया प्रभा । धवळले विश्र्व । धन्य धन्य पांडुरंग । आह्मा जोडला वोसंग । किर्ती गाता निसंग । अनुवाद तयाचा । ते सुख सांगता कोडी । पापे पळती बापुडी । यमधर्म हात जोडी । नयेचि तया गावा । ऐसे एकविधभावाचे । संतचरण वंदिती साचे । एकाजनार्दनी त्याचे । दर्शन दुर्लभ ।।८२३।।

**आजी दिवाळी दसरा** । श्रीसाधुसंत आले घरा । पायी घालू मिठी । आनंदे नाचू वाळूवंटी । पाहू हरीचे ध्यान । तेणे मना समाधान । एका जनार्दनी भाव । विटे उभा विठ्ठलराव ।।८२४।।

**जगाचे जीवन मनाचे मोहन** । योगियांचे ध्यान विठ्ठल माझा । व्दैतव्दैईताहुनि वेगळा । श्रीविठ्ठल कळा पौर्णिमेचा । न कळे आगमा नेणेचि दुर्गामा । एकाजनार्दनी आह्मा सापडला ।।८२५।।

**सद्‌गदीत कंठ बाष्प पै दाटत** । जया भेटीलागी हृदय फुटत । तो देखिलावो तो देखिला । सबाह्य अभ्यंतरी व्यापुनिया राहिला । सबराभरीत भरुनी पंढरीये उभा । सभोवती दाटी संतांची शोभा । ऐसा लावण्य पुतळा देखिला द्दष्टी । एकाजनार्दनी सुख न समाय सृष्टी ।।८२६।।

**मन माझे वेधले मन माझे वेधले** । पहाता भले सच्चिदानंद । आनंदीआनंद मानसी पै झाला । देखिला सावळा पांडुरंग । एकाजनार्दनी उघडाचि देखिला । आनंद तो झाला मनी माझ्या ।।८२७।।

**कमलदलाक्ष गोपी जीवनलक्ष** । तो अलक्षा न बैसे लक्ष तो देखिलावो । मनमृग आमुचा वेधोनी गेला । पहताचि डोळा श्रीकृष्ण । सहजची आवडी पाहता समद्दष्टी । वेधोनी गेली

सृष्टी पाहता गे माय । एकाजनार्दनी परात्पर शोभला । तेणे मज वेधे वेध लाविला गे माय ।।८२८।।

**सलीलकमलदलाक्ष राजीवलोचनु** । परे परता पहाता निवे आमुचे मनु । कान्हया परम गोजरीया । कान्हया परम गोजरीया । तनुगन वेधले चित्त विगुतले । पाहता पाहता मना समाधान जाले । ऐसा कमल गर्भीचा कंदु उभा परमानंदु । एकाजनार्दनी वेधु मजलागे माय ।।८२९।।

**आजी दिवाळी दसरा** । आलो विठ्ठलाचे व्दार। पाहुनिया देव तीर्थ । आनंदे आनंद लोटत । नाठवे काही आन दुजे । विठ्ठलावाचुनी मनी माझे । आशा केली ते पावलो । एकाजनार्दन धन्य जालो ।।८३०।।

**निळा पंढरपूरचा लावण्य पुतळा** । देखिलासे डोळा विठ्ठल देव । जीव वेढला वो जीव वेढला वो । पाहता पाहता जीव वेधला वो । एकाजनार्दनी पाहताची देव । वेधिला जीव परतेना भाव ।।८३१।।

**इंद्रिये कुंठित जाली** । विठू माउली पहाता । वेधले मन दुजे नेणे । विसरले पेणे ताहानभूक । मदमत्सर समूळ गेला । ऐसा लागला वेध त्याचा । काम क्रोध पळाले दुरी । आशा तृष्णा झडकरी लपाल्या । मन मनाधीन जाले । एकाजनार्दनी रूप देखिले ।।८३२।।

**दृष्टी पाहता विठोबासी** । आनंद होय सुखराशी । ऐसा अनुभव मना । पाहे पाहे पंढरी राणा । एका दशरूने मुक्ती । देतो रखमाईचा पती । एकाजनार्दनी नमन । गोजिरे विटे समचरण ।।८३३।।

**भेदबुद्धि पालटली** । कृपा या विठ्ठली केली मज । प्रकाश जाहला देहादेही । वासना प्रवाही वहावली । विषयांचे ते लिंगाड । जाहले देशोधड आपोआप । एकाजनार्दनी शरण । कायावाचा आणि मन ।।८३४।।

**विसर तो अवघा जाहला** । या विठ्ठला पाहता । निवारला क्रोधकाम । जाहला तम शांत तो । इंद्रियांची होती चाली । निवांत राहिली एकरूप । दुजेपणाचा भेद गेला । एका ठेला जनार्दनी ।।८३५।।

**सर्व सिद्धी मनोरथ** । पंढरीनाथ पहाता । दैन्य दारिद्दय ते गेले । सुंदर पाऊले पहाता । विषयाते पळ सुटला । सुंदर सावळा पाहता । कामक्रोध विलया गेले । श्रीमुख चांगले न्याहाळीता । एकाजनार्दनी बरे जाहले । सुंदर देखिले समचरण ।।८३६।।

**देखणा जाहलो देखणा जाहलो** । देखणा जाहलो विठ्ठला । जन्ममरण निरसले । पहाता पाहणे हारपले । तुटली आशापाश बेडी । हेचि जोडी जोडली । एकाजनार्दनी देव । धरिला ठाव न सोडी ।।८३७।।

**जन्ममरणाचे तुटले साकडे** । कैवल्य रोकडे उभे असे । डोळियाचा डोळा उघड दाविला । संदेह फिटला उरी नुरे । एकाजनार्दनी संशयचि नाही । जन्ममरण देही पुन्हा न ये ।।८३८।।

**कमळनेत्र पहाता मन माझे भुलले** । योगी ध्याती जयाते रूप पंढरीये आले । आनंदु वो परमानंदु ध्याता । रामाची उन्मनी वोवाळणी तत्वता । योगयाग तप न लगे आचरण काही । सुलभ सोपारा वसे सर्वाठाई । वेदशास्त्र श्रमले पुराणे भांडती । शेषादिका न कळे कुंठित मती । एकाजनार्दनी पहात आनंदे मन । तद्रूपचि झाले जनी सर्व जनार्दन ।।८३९।।

**धन्य धन्य विठ्ठल देव** । पाहता निरसे भेव काळाचे । जाऊनी घाला पायी मिठी । उदार हा जगजेठी । दरूशने तारी जडजीव । निवारी भेव यमाचे । शरण एकाजनार्दनी । ध्यानी मनी विठ्ठल ।।८४०।।

**नागर गोमटे रूप ते गोजिरे** । उभे ते साजिरे भीमातटी । पहाता विश्रांती देहा होय शांती । अनुपम्य मूर्ति विठ्ठल देव । भक्तिचीया काजा राहिलासे उभा । कैवल्याचा गाभा बालमूर्ती । आनंदाचा कंद उभा परमानंद । एकाजनार्दनी छंद मज त्याचा ।।८४१।।

**गोमटे गोजिरे पाऊले साजिरी** । धरियली गोजिरी विटेवरी । वेध तो तयाचा मने कायावाचा । दुजा छंद साचा नाही मना । इंद्रिये धावता आकळती ठायी । विठोबाचे पायी ठेवियले । एकाजनार्दनी वेधलेसे मन । धरुनी चरण द्दढ ठेलो ।।८४२।।

**उपासना धरुनी जीवी** । आलो गावी विठोबाच्या । उभयतांच्या दरुशने । जाहले पारणे जीवा शिवा । कष्टलो होतो दाही दिशा । पहाता आशा निमाली । कैला परिहार श्रम । उरला नाही भवभ्रम । जडले सदा पायी मन । आता न करी साधन । जाहलो जीवे भावे दास । एकाजनार्दनी पुरली आस ।।८४३।।

**पाहता पाहता परतले मन** । जाले समाधान चित्ती माझे । संतांचे संगती लाभ येवढा झाला । पंढरीये पाहिला विठ्ठल देवो । एकाजनार्दनी मनीच बैसला । नवजे संचला दीपु जैसा ।।८४४।।

**न माये ध्यानी योगिया चिंतनी** । नाचतो कीर्तनी संतापुढे । डोळीयाची धणी फिटली पारणी । उभा तो सज्जनी पंढरीये । एकाजनार्दनी देखियेला डोळा । परब्रह्म पुतळा बाईये वो ।।८४५।।

**इच्छा केली ते पावलो** । देखताचि धन्य जाहलो । होते सुकृत पदरी । तुमचे चरण देखिले हरी । गेले भय आणि चिंता । कृतकृत्य जाहलो आता । आजी पुरला नवस । एकाजनार्दनी जाहलो दास ।।८४६।।

**धरिला देव आघाडी मिठी** । नोहे तुटी जन्मोजन्मी । हाचि मुख्य भाव साचा । तुटला जन्माचा विसर । एकपणे पाहता पोटी । एकाजनार्दनी जाहली भेटी ।।८४७।।

**अवघे वारे चला जाऊ** । विठ्ठल रखुमाई पाहू । अवघे ते भाग्याचे । नाम घेती विठ्ठलाचे । अवघे ब्रह्मज्ञानी । शरण एकाजनार्दनी ।।८४८।।

**अवघे साधने साधिले** । अवघे विठ्ठलरूप जाले । अवघे कर्म नेणती धर्म । अवघा तया परब्रह्म । अवघी सिद्धि समाधी । अवघी तुटली आधिव्याधि । अवघे जाले एकरूप । एकाजनार्दनी स्वरूप ।।८४९।।

**अवघे ते दैवाचे** । विठ्ठल विठ्ठल वदती वाचे । अवघा धंदा दुजा नाही । वाचे विठ्ठल रखुमाई । अवघा संसार करिती । वाचे अवघे विठ्ठल म्हणती । अवघे कर्म घडले तया । वाचे विठ्ठलचि पाया । अवघा एकाजनार्दन । अवघा जनी जनार्दन ।।८५०।।

**अवघेची सुख तयासी जोडले** । अवघे पाऊले देखताची । अवघे ब्रह्मरूप नाही काही चिंता । अवघाचि देखता पांडुरंग । अवघे ते धन्य क्षेत्रवासी दैवाचे । एकाजनार्दनी वाचे विठ्ठल वदती ।।८५१।।

**अवघा सुखाचा आनंद** । अवघा विटेवरी परमानंद । अवघे चराचर सुख । अवघे या जालिया विमुख । अवघे डोळे भरुनी पहा । अवघे सुखे पूर्ण व्हा । अवघा अंतरी आठवा । एकाजनार्दनी साठवा ।।८५२।।

**अवघे संता एकमेळ** । अवघा देव तो विठ्ठल । अवघे प्रेमरसाचे । अवघे विठ्ठल वदती वाचे । अवघे एकभावी । एकाजनार्दनी सोहंभावी ।।८५३।।

**सदा सुरवर सुख ते इच्छिती** । ऐसा लक्ष्मीपती का रे न भजा । सोहरा धाइरा आन दुजा नाही । गुरुपिता पाही हाचि बंधु । सज्जन सांगती आन नाही आम्हा । एकाजनार्दनी प्रेमा वसे देही ।।८५४।।

**एक मागे एक पुढे** । उभे रोकडे असती । चला जाऊ तया ठाया । पाहू सखया आवडी । एका एकाचे करूनि मीस । रहिवासले सावकाश । बहु युगे जाहली पहाता । खाली न बैसती उभयता । आनंदी आनंद मना होय । एकाजनार्दनी पाहुनी धाय ।।८५५।।

**योगी ध्याती जया चिंतिती मानसी** । तो हृषिकेशी पंढरीये । जाऊ लावलाहे पाहू पै चरण । क्षेमालिंगन देऊ सुखे । एकाजनार्दनी पहाता रुपडे । ब्रह्म फोडावाटे विटेवरी ।।८५६।।

**नीळवर्ण धनश्याम** । आत्माराम विटेवरी । चला जाऊ तया गावा । उगवू गोवा तातडी । भेटलिया मनोरथ । पुरती अर्थ मनाचे । साधे साधन फुकटची । एकाजनार्दनी भाक साची ।।८५७।।

**पहापहा विठ्ठल मुख** । हरे जन्ममरण दु:ख । पहाता राउळाची ध्वजा । पूर्वज उध्दरती सहजा । कळस देखता नयनी । होय पातकांची धुणी । करिता चंद्रभागा स्नान । कोटि तीर्थाचे मार्जन । पुंडलिका घेती भेटी । तया वास तो वैकुंठी । एकाजनार्दनी प्रदक्षणा । पार नाही त्यांच्या पुण्या ।।८५८।।

**भक्त देव एके ठायी ते आवडी** । घेउनिया गुढी जाऊ तेथे । पाहू चरणकमळ वोवाळू श्रीमुख । होईल तेणे सुख चौदेहासी । संतांचे ते भार गाती नाचताती । आनंदे डूल्लती विठ्ठल वाचे । एकाजनार्दनी आनंद सोहळा । पाहोनि घालो डोळा डोळियाचा ।।८५९।।

**योगयाग जप जयासाठी करणे** । ते उभे केणे पंढरीसी । कऊलाची पेठ पंढरीचा हाट । मिळाले घनदाट वारकरी । पताकाचे भार गर्जती हरिदास । होऊनी उदास सर्वभावे । एकाजनार्दनी नाही कामक्रोध । अवघा गोविंद हृदयी त्यांचे ।।८६०।।

**पुढे गेले हरीचे दास** । त्यांची आस आम्हासी । त्याचि मागी आम्ही जाऊ । वाचे गाऊ विठ्ठला । संसाराचा न करू धंदा । हरूपे सदा नाम गाऊ । एकाजनार्दनी डोळे । पाहती पाऊले कोवळी ।।८६१।।

**योग्याचे ध्यान बैसलेसे मौन** । तो हा निधान विटेवरी । विठ्ठल सावळा पाहू चला डोळा । धरुनी बाळलीला कटी कर । संतांचा समुदाय आरत्यांची दाटी । नामघोष सृष्टी न समाय ।

आषाढी कार्तिकी आनंद सोहळा । येती नरनारी बाळा पहावया । एकाजनार्दनी पुरला मनोरथ । विठ्ठल पहता चित्त गुंतलेसे ।।८६२।।

**न लागे काही यासी मोल** । वेचिता बोल फुकाचे । विठ्ठल विठ्ठल वदा वाचे । नोहे आणिकाचे कारण । नाचा प्रेमे वाळुवंटी । घाला मिठी संतांसी । एकाजनार्दनी उभा प्रेमे वाळुवंटी । घाला मिठी संतांसी । एकाजनार्दनी उभा । विठ्ठल शोभा अनुपम्य ।। ८६३।।

**अवघे रंगले रंगी** । अवघे त्या पांडुरंगी । अवघा दुजा भाव नाही । अवघे विठ्ठलची पाही । अवघे आनंदे रंगी त्या गाती । अवघे भोळेभोळे । अवघे प्रेमाचे आगळे । अवघा जनार्दन । एकाजनार्दनी भजन ।।८६४।।

**नाचेन आनंदे विठ्ठलनाम छंदे** । परते भेदाभेद सांडोनिया । जाईन पंढरी नाचेन महाव्दारी । वाचे हरिहरि रामकृष्ण । साधन आणीक नेणे मी सर्वथा । एका पंढरीनाथावाचुनी काही । एकाजनार्दनी द्दढ हा निश्र्चय । मुखी नाम गाय सदोदीत ।।८६५।।

**प्रेमळ प्रेमळ अंतरी प्रेमळ** । नाही काळ वेळ तयालागी । प्रेमभावे गाय विठ्ठलचि ध्याय । मग सुखा उणे काय संसारिया । जनार्दनाचा एका रंगला चरणी । निजरंगी रंगोनी मिळोनी गेला ।।८६६।।

**त्रिभुवना परती पंढरीये पेठ** । उभा तो वैकुंठ विटेवरी । पहा चला जाऊ पंढरीये । नवस पुरती सये अंतरीचे । उभा विटेवरी घेउनी बुंथी । शंख चक्र गदा पद्म हाती शोभती । राही रुक्मिणी उभ्या दोही दो बाही । चामरे मयूरपिच्छ ढाळीती ठाई । एकाजनार्दनी पाहता रूप । पाहता पाहता जाले मन तद्रूप ।।८६७।।

**परलोकीचा सखा उभा विटेवरी** । भक्त साह्यकारी पांडुरंग । चंद्रभागे तटी शोभे वाळुवंटी । देखिलासे द्दष्टी पांडुरंग । एकाजनार्दनी भेटता तयासी । रिद्धीसिद्धी दासी होती मग ।।८६८।।

**गोमटे नागर कटी धरुनी कर** । उभा तो सुकुमार वैकुंठीचा । रूपाचे रुपस पाहता सावकाश । धणी धाय मनास तया पाहता । नाठवे कल्पना पाहता मनाचिया मना । बुद्धि ते चरणा विनटली । एका जनार्दनी इंद्रियांची चाली । सर्व हरपली पंढरी पाहता ।।८६९।।

**उपवास पारणे न लगे समाधि** । वायाचि उपाधि कोण धरी । आह्मा विष्णुदासा कळलेसे वर्म । मुखी गावे नाम हाती टाळी । आनंदे बागडे जाती पंढरीसी । पहाती विठोबासी द्दष्टीभरी । एकाजनार्दनी मनाचे उन्मन । एका दरूशने मुक्तिपद ।।८७०।।

**देव विसरला देवपणासी** । देखोनि भक्तासी भुलला । नावडेचि वैकुंठ धाम । तो निश्र्काम कीर्तने नाचतो । नावडेचि शेषशायी आसन । उभा जघन धरुनि विटे । ऐसा प्रेमाचा भुकेला । एकाजनार्दनी घाला ।।८७१।।

**जघन प्रमाण दावित श्रीअनंत** । यारे यारे म्हणत भेटावया । आवडीची धणी प्यारे प्रेमभावे । संतचरणा द्यावे आलिंगन । कट धरुनि करी समचि पाऊली । उभा वनमाळी भक्तांसाठी । जीवाचे जीवन मनाचे मोहन । सगुण हे ध्यान भक्तीकाजा । रूपाचे रुपस निर्गुणावेगळे । पहाता तो संतमुळे उभा असे । विटे नीट उभा आनंदाचा कंद । पाहता परमानंद सुख वाटे । एकाजनार्दनी भक्ताचिया काजा । उभारुनि भुजा वाट पाहे ।।८७२।।

**नेणतियासी नेणता तो सान** । जाणतिया जाणपण धरुनि ठेला । योगियांचे मांदुस सज्जनांचे स्थळ । श्रम तो केवळ पाहता जाय । जाणते-नेणते येती वरचेवरी । दरूशने उद्धरी जडजीव । एकाजनार्दनी सगुण निर्गुण । जाणता नेणता सर्व आपणची जाण ।।८७३।।

**सावळे कोवळे ढवळे ना पिवळे** । रंग रंगावेगळे पंढरीगे माये । चांदिणे जैसे शोभते नभी । तैसा कट धरुनी नभी चंद्र गे माये । विटेवरी नीट जघनी कर । उभा देखे परात्पर गे माये । एकाजनार्दनी पाहता तयासी । मन चकोर तृप्त झाले गे माये ।।८७४।।

**सर्वाघटी बिंबोनि ठेला** । तो हा आला पंढरीये । सर्वाघटी ज्याची वस्ती । ते ही मूर्ति विटेवरी । सर्वा ठायी भरुनि उरे । पंढरीये पुरे मापासी । जनार्दनाचा एका ह्मणे । ध्यन पेणे पंढरी ।।८७५।।

**त्रिपुटी विरहित कर कटी उभा** । त्रैलोक्याची शोभा शोभे गे माये । परे परता वैखरीये आरुता । पश्यंती निर्धारिता न कळे गे माये । मध्यमा मध्यमी उभा तो स्वयंभ । अव्दयानंद कोंभ कर्दळीचा गे माये । एकाजनार्दनी आहे तैसा भला । ह्रदयी सामावला माझ्या गे माये ।।८७६।।

**जिकडे जावे तिकडे देवेचि सांगाते** । ऐसे केले नाथे पंढरीच्या । शब्द तेथे झाला समूळचि वाव । गेला देहभाव हरपोनी । अंतरी बाहेरी एकमय जाहले । अवघे कोंदाटले परब्रह्म । एकाजनार्दनी ऐसी जाहली वृत्ति । वृत्तिची निवृत्ति चिदानंदी ।।८७७।।

**व्यापक ते नाम अनंत ब्रह्मांड** । मना सोस सांडी कल्पनेचा । कल्पनाविरहित नाम तूचि गाये । सर्व सुख पाहे विठ्ठलपायी । ठसावेल मूर्ति पाहता अनुभव । पाचांचा मग ठाव कैचा तेथे । एकाजनार्दनी संपूर्ण अवघा । भीमातीरी थडवा उभा असे ।।८७८।।

**सर्व इंद्रियांचे पुरले कोड** । नाम वाड ऐकता । हरुषे नाचता वाळुवंटी । गेली कसवटी पळुनी । पंचभूते स्थिर झाली । जीवाशिवा एका चाली । एकाजनार्दनी मंगळ झाला । अवघा भेटला श्रीविठ्ठल ।।८७९।।

**तुमचे पायी ठेवीता भाळ** । पावलो सकळ अंतरीचे । आता पुरली वासना । आठविता तुमचे गुणा । जन्माचे सार्थक । पाहता तुमचे श्रीमुख । शरण एकाजनार्दनी । धन्य नाम तुमचे वदनी ।।८८०।।

**मार्ग सोपा पंढरीचा** । सांपडला साचा उत्तम । नाही पुसायचे काम । वाचे नाम मुखी गाऊ । नाही कोठे आड काठी । साधन कपाटी पंचान्न । न लगे योगायाग तप । वाचे जप विठ्ठल । त्रिअक्षराचे काम । एका निष्काम जनार्दनी ।।८८१।।

**आलिंगोनी देव भक्त** । सरते एकरूपी होत । ते हे पहा पंढरपुर । देव भक्त तीर्थ माहेर । आलियासी दान नामामृताचि पान । जैसा ज्याचा हेत । पुरवितसे रुक्मिणी कांत । एकाजनार्दनी शरण । दाखवा पंढरी पावन ।।८८२।।

**येथोनी आनंदुरे** । कृपासागर तो गोविंदुरे । महाराजाचे राउळी । वाजे ब्रह्मानंदी टाळी । आनंदले भक्तजन । ह्मणे धन्य रघुनंदन । लक्ष्मी चतुर्भुज जाली । प्रसाद घेउनी बाहेर आली । एकाजनार्दनी नाम । पाहता निवे आत्माराम ।।८८३।।

**भक्तीचा पोटा मुक्ति पै आली** । भक्तीने मुक्तीते वाढविले । भक्ति ते माता मुक्ति ते दुहिता । जाणोनि तत्वता भजन करी । भक्ति सोडोनी मुक्ति वाछिती वेडी । गूळ सोडोनी कैसी जे गोडी । संतोषोनि भक्ति वांछीती वेडी । गूळ सोडोनी कैसी जे गोडी । संतोषोनि भक्ति ज्यासी दे मुक्ती । तोचि लाभे येरव्यर्थ का शिणती । एकाजनार्दन एक भाव खरा । भक्ति मुक्ति दाटोनी आलिया घरा ।।८८४।।

**भक्ति असो मुक्ति घालारे बाहेरी** । बहुता चाळविले चाळायाची थोरी । भक्ति ते राहो मुक्ति ते जावो । मुक्तिमाजी भावो नाही नाही । मुक्ति चाळा लाउनी सेखी वोसंडी । नेणे ऐसे किती केले पाषांडी । मुक्तीचेनी योगे वामदेव शुक । त्याचाही विकल्प मानिताती लोक । नाम संकीर्तन भक्ति मुक्तीसी धाक । संवादे दोघेही राहो माझी भाक । उपजोनिया पोटी भक्ति ग्रासी । मातृहत्यारी मुक्ति कवण पोसी । एकाजनार्दनी सेविता चरणरज । मुक्ति सेवा करी सांडूनिया लाज ।।८८५।।

**भक्ति प्रेमाविण ज्ञान नको देवा** । अभिमान नित्य नवा तयामाजी । प्रेमसुख देई प्रेमसुख देई । प्रेमेविण नाही समाधान । रांडवेने जेवि शृंगार केला । प्रेमेविण जाला ज्ञानी तैसा । एकाजनार्दनी प्रेम अति गोड । अनुभवी सुरवाड जाणतील ।।८८६।।

**तुझ्या चरणी अनुपम्य सुख** । हे तो अलोलिक रमा जाणे । जाणती ते भक्त प्रेमळ सज्जन । अभाविक दुर्जन तया न कळे । भक्तियुक्त ज्ञान तेथे घडे भजन । वाया मग शीण जाणिवेचा । एकाजनार्दनी वाउगे ते बोल । भक्तिविण फोल नावडती ।।८८७।।

**नवल दावियेले सोंग** । अवघा एक पांडुरंग । हे तो आले अनुभवा । विठ्ठल देवा पहाताचि । मन पवनांची धारणा । तुटली वासना विषयाची । एकाजनार्दनी परिपुर्ण । एका एकपण देखता ।।८८८।।

**सोळा सहस्त्र गोपी भोगुनी ब्रह्मचारी** । ऐशी अगाध कीर्ति कीर्ति श्रीहरी । दीन आम्ही रंक वंदितो चरणा । संभाळी दिनालागी मानसमोहना । एकाजनार्दनी धन्य धन्य लाघव । एकरूप असोनी दिसो नेदी कैसे वैभव ।।८८९।।

**अकळ अनुपम्य तुझी लीला** । न कळे अकळा सर्वासी । वेदशास्त्रा न कळे पार । षटनिर्विकार दर्शने । जो जो धरू जावा संग । तो तो विरंग उपाधि । शरण एकाजनार्दनी । रंकाहुनी मी रंक ।।८९०।।

**ऐक्य ते जालीया मीतूपण नाही** । गौरव हा काही नाही नामी । नाही चतुर्दल तूर्याही उन्मनी । स्वयंभ्रांती खाणी उभी असे । चित्त जडलिया तेथे काय उणे । लज्जीत साधने होती देखा । एकाजनार्दनी नाही मीतूपण । व्यापक ते जाण सर्वाठायी ।।८९१।।

**खंडन मुंडन दंडन करुनी ध्याती रूप ते** । आहमा सोपे झाले वर्णिता चिद्रूप । तो देखिला वो देखिला वोभ पहाता पहाणे विसरुन गेले ठक पडले सकळा वो । नेति नेति शब्द भुलल्या वेडावल्या श्रुति । आगमनिगम न कळे चोज चित्ती । एकाजनार्दनी सकळ ब्रह्म शोभन ।। अनुपम्य उभा कर्दळीचा गाभा ।।८९२।।

**कळा ते कुसरी नव्हे हे शाब्दिक** । अणुरेणु एक भरुनी उरला । तोचि डोळेभरी पहा श्रीहरी । परे परता दुरी ठसावला । एकाजनार्दनी शब्दावेगळा असे । तो उभा दिसे कीर्तनरंगी ।।८९३।।

**पाहता पाहता वेचलेसे मन** । तेणे समाधान जीव शिवा । जीवाचे मनाचे मोहन । वाचेसी मौन्य सदा पडे । परादिका ज्याचा न कळेचि अंत । सर्व गुणातीत भेदरहित । एकाजनार्दनी त्रिगुणापरता । ओतप्रोत सर्वथा भरलासे ।।८९४।।

**जयविश्र्वव्यापका विश्र्वमूर्ति वंदन** । वर्णिता थकले सहा अठराजण । मुनिजन धुंडिती साधिती साधन । नव्हे दरूशन तयासी । तो तू लाघव सूत्रधारी । करसी गोकुळामाजी चोरी । धारिता न सापडसी निर्धारी । आगम निगमा सरी न पवेचि । न कळे न कळे कवणा महिमान । शेषादिक श्रमले जाहले आसन । शरण एकाजनार्दन । कायावाचामन द्दढेसी ।।८९५।।

**व्यापक हा जनार्दन** । जगची भरला संपूर्ण । मागे पुढे आहे उभा । काय वानू त्याची शोभा । भरुनी उरला । सर्वाठाई तो संचला । शरण एकाजनार्दनी । व्यापक तो जनी वनी ।।८९६।।

**काय वानू हरीचा महिमा** । आगमा निगमा अतर्क्य । वेदशास्त्रे शिणोनी ठेली । पुराणे निवांत राहिली । दरूशने तटस्थ होऊन । धरुनी ठेली ती मौन । श्रुती अनुवादा जो नये । त्यासी एकाजनार्दनी ध्याये ।।८९७।।

**दीपकळीकेमाजी कळा** । तैसा परब्रह्म पुतळा । असोनिया नसे जगी । जैसा प्राण वायु संगी । करवी खेळवी नाना खेळा । परी आपण अलिप्त सकळा । एकाजनार्दनी सूत्रधारी । खेळ खेळोनी अलिप्त निर्धारी ।।८९८।।

**आमुची तो येवढी आस** । होऊ दास हरीचे । मना मागे न जाऊ देखा । सापडला शिक्का उत्तम । त्रैलोक्याचा धनी देव । आह्मा भेव नाही कोठे । जाहलो बळिये शिरोमणी । एका चरणी जनार्दनाचे ।।८९९।।

**कोणासवे आमुचे काय काज** । पंढरीराज कैवारी । उभा राहे मागे पुढे । निवारी साकडे भक्तांचे । आघात घात निवारी । पितांबरी करी छाया । ऐसा अनुभव मज यावा । धावे राया पंढरीच्या । एकाजनार्दनी भाव । धरलिया धावे देव ।।९००।।

**व्यापक जनार्दन व्यापुनि राहिला** । अखंड भरला हृदय पुटी । पाहता पाहणे परते गेले दुरी । अवघा चराचरी जनार्दन । व्यापक व्यापला अक्षयी संचला । भरुनी उरला जळी स्थळी । एकाजनार्दनी रिता नाही ठाव । अवघा देही देव जनार्दन ।।९०१।।

**भोळ्याभाविकांसी देख** । अवघा एक विठ्ठल । दुजा नाही आन कोण्ही । पाहता तिही त्रिभुवनी । जन्ममरणाचे साकडे । नाही कोडे मुक्तीचे । मोक्ष तो उभा जोडोनी हात । एकाजनार्दनी तिष्ठत ।।९०२।।

**एकपणे असे सर्वाठाई वसे** । योगी ज्या ध्यातसे हृदयकमळी । ते रूप साजिरे पहाता गोजिरे । मन तेथे मुरे पहाता पहाता । खुंटली भावना तुटली वासना । साधने ती नाना हारपली । संकल्प विकल्प मुळीच उडाला । एकाजनार्दनी घाला एकपणे ।।९०३।।

# भाव

**देव भुलला भावासी** । सांडोनिया वैकुंठासी । उघडा आला पंढरपुरा । तो परात्पर सोहरा । पाहुनीया पुंडलिका । भुलला तयाच्या कौतुका । उभा राहिला विटेवरी । एकाजनार्दन हरी ।।९०४।।

**भावाचेनी भक्ती थोर** । भावे तुटे येरझार । भावे अंकित देव भक्ताचा । वेदशास्त्र बोले वाचा । भावे गुरुशिष्य दोन्ही । भावयुक्त सर्व गुणी । भावे जाले भक्तिपंथ । भावे पुरे मनोरथ । एकाजनार्दनी भाव । भावे दिसे देही देव ।।९०५।।

**भावाचिये बळे होऊनी लहान** । आपुले थोरपण विसरला । न म्हणे यातिकुळ ते सुशीळ । उत्तम चांडाळ हो का कोण्ही । अट्टाहास्ये करिता नामाचा उच्चार । उतरी पैल पार भवनदिचा । एकाजनार्दनी भक्तांची आवडी । घाली तसे उडी वैकुंठाहुनी ।।९०६।।

**जीवभाव जेणे अर्पियेला देवा** । तयाची ते सेवा देव करी । न म्हणे नीच अथवा उंचपण । भावासी कारण मुख्य देवा । देव भावासाठी लागे पाठोपाठी । एकाजनार्दनी भेटी देतो देव ।।९०७।।

**चरणामृता देव स्वादला** । वटपत्री तो बाळ जाला । अभिनव भक्ति नेली गोडी । चुरचुरा पावो चोखी आवडी । भक्तिरसाची लागली गोडी । तोडीचा अंगुष्ठ बाहेर न काढी । एकाजनार्दनी सांगतो भावो । आपुली गोडी आपण घ्यावो ।।९०८।।

**एका भावासाठी** । देव धावे उठाउठी । पोहे सुदाम देवाचे । भक्षी आवडीने साचे । खाऊनिया भाजी पान । दिधले भोजन ऋषीसी । आवडीने कण्या खाय । प्रेम न समाय अंतरी । गौळियांचे उच्छिष्ट खाये । एकाजनार्दनी धाये ।।९०९।।

**प्रेमे भक्ताची आवडी** । म्हणोनिया धुतो घोडी । ऐसा प्रेमाचा भुकेला । रोवक जाहला बळीव्दारी । उच्छिष्ट फळे भिल्लणीची । खाये साची आवडीने । एकाजनार्दनी उदार । तो हा सर्वेश्र्वर विटेवरी ।।९१०।।

**राम भावाचा भुकेला** । सांडोनी दुर्योधन सदनाला । विदुर गृहाप्रति गेला । विश्रांती तेथे पावला । शबरीची फळे भक्षी । क्षीरनिधि शयन साक्षी । एकाजनार्दनी निश्र्चय ऐसा । देव भक्ताधीन सहसा ।।९११।।

**जे वेदांसी नातुडे श्रुतीसी साकडे** । ते उभे वाडेकोडे पंढरीये । न माये चराचरी योगियांच्या ध्याना । तया ह्मणती कान्हा नंदाचा जो । आगम निगम लाजोनि राहिले । तया बांधिती वहिले उखळासी । काळाचा जो काळ भक्ता प्रतिपाळ । तया भेडविती बागूल आला ह्मणोनी । बारा चौदा सोळा अठरा विवादती । तो गायी राखी प्रीति गोकुळात । एकाजनार्दनी भक्तीचा भुकाळु । खाय तुळशीदलु भाविकांचे ।।९१२।।

**स्वामीसी तो पुरे एक भाव गाठी** । वाउगा श्रम नेहटी वाया जाय । भावासाठी देव अंकित अंकिला । राहिला उगला बळीचे व्दारी । अर्जुनाचे रथी सारथी होऊनी । राहे मोक्षदानी भावासाठी । विदुराचे घरी आवडीने भक्षी । कण्या साक्षेपेसी खातो देव । पोहे सुदाम्याचे खाउनी तुष्टला । एकाजनार्दनी दिला सुवर्णगांव ।।९१३।।

**भावे घातली कास देव झाला दास** । सोशी गर्भवास भाविकांचे । भावचि कारण भावचि कारण । यापरते साधन आणिक नाही । भावाचेनि बळे जीवपणे वोवले । मन हे सोवळे ब्रह्म साम्य । एकाजनार्दनी भावचि कारण । सच्चिदानंदावरी खुण दाविले ते ।।९१४।।

**भाव भजनाने निफजवी** । भक्त देवाते उपजवी । आता भजनी देव केला । भक्त वडिल देव धाकुला । सेवा करणे हा संकल्प । भक्त देवाचाही बाप । भक्त कळवळा देवाचा । देव झाला त्या भक्ताचा । देव भक्ताचे पोटी । झाला ह्मणोनी आवड मोठी । एकाजनार्दनी नवलाव । कैसा भक्ताचि झाला देव ।।९१५।।

**एका भावे कार्यसिद्धी** । एका भावे तुटे उपाधी । एका भावे आधिव्याधि । जन्मजरा पाश तुटे । एकाभावे करी भजन । एकाभावे संत सेवन । एकाभावे वेद वचन । पाळिता तुटे भाव पीडा । एकाभावे योगयाग । एकाभावे रिघे शरण । एकाभावे एकाजनार्दन । एकाभावे धरी चरण । कायावाचामनेशी ।।९१६।।

**योगी रिगाले कपाटी** । हटयोग साधिती आटी । परि तयासी दुर्लभ । तो गोकुळी जाहला सुलभ । यज्ञादिकी अवदाना नये । तो गोपाळांचे उच्छिष्ट खाये । सदा ध्याती जपी ज्यासी । तो नाचे कीर्तनी उल्हासी । एकाजनार्दनी प्रेमळ । भोळ्याभाविका निर्मळ ।।९१७।।

**असोनी सबराभरी** । बाह्य आणि अंतरी । संपुष्टा माझारी ह्मणती देव । कल्पनेचा देव । ऐसा जया भाव तो न करी निर्वाहो आह्मालागी  सुक्षेत्री पुण्य अनु क्षेत्री पाप । न चले हा संताप कल्पनेचा । काशी हो पंढरी तीर्थयात्रा करी । सर्वत्र नरहरी तोचि भाव । एकाजनार्दनी सर्व सिद्धी असे । नाथिलेचि पिसे मतवाद्दया ।।९१८।।

**जो जया चित्ती भाव** । तैसा तैसा होय देव । येथे संदेहो । धरणे न लगे । द्रौपदी स्मरता माधव । धाव घेतली लवलाहे । जया जैसा भाव । तैसा देव होतसे । अशोक वनी सीता । शुद्धि जाता हनुमंता । भावेची तत्वता । कार्यसिद्धी । समरंगणी तो अर्जुन । मोहिलासे गोत्र देखोनी । तेथेची जनार्दन । भावे गीता सांगे । ऐसा भावाचा लंपट । सांडोनी आलासे वैकुंठ । एकाजनार्दनी नीट । विटे उभा राहिला ।।९१९।।

**जैसा जैसा जया भाव** । तैसा तैसा पावे देव । हा तो अनुभव पहा । देही पहा विदेही । शुद्ध करावे ते मन । जनी पहा जनार्दन । एकाजनार्दनी भाव । देही वसतसे देव ।।९२०।।

**देवासी तो पुरे एकभाव** । नेणे वैभव दासाचे । जया चित्ती जी वासना । तैशी कामना पुरवणे । नाही पडत गोवागुंती । आपणचि हाती करितसे । एकाजनार्दनी अंकीत । राहे तिष्ठत व्दारी त्याच्या ।।९२१।।

**अंगावरी आलिया घाव** । अवघा देव निवारी । कायावाचा शरण जाता । नुपेक्षी अनाथां विठ्ठल । मुख्य आधी पाहिजे भाव । तेणे देव कव घाली । एकाजनार्दनी भावापाठी । धावे उठाउठी देव मागे ।।९२२।।

**महालाभ हाचि आहे** । जो या गये विठ्ठलासी । प्रेमभारित सदा कंठ । अंगी बळकट भावना । हेचि वैराग्याचे सार । वाया कासया येरझार । एकाजनार्दनी भाव । अवघा पाठी पोटी देव ।।९२३।।

**समसाम्य सर्वाभूती** । ज्यासी घडे भगवद्भक्ती । जालिया सगुरुकृपा । सर्व मार्ग होय सोपा । हृदयी ठसताची भावो । प्रकटे देवाधिदेवो । भक्ता भावार्थे विकला । एकाजनार्दनी देखिला ।।९२४।।

**झालिया गुरुकृपा सुगम** । सर्वत्र ठावे परब्रह्म । तेथे नाही जन्ममरण । भवबंधन असेना । ऐसा धरिता विश्र्वास । काय उणे मग तयास । एकाजनार्दनी भाव । स्वये आपणचि होय देव ।।९२५।।

**सकळ साधनांचे सार** । जनार्दन इतका उच्चार । येणे घडे सर्व कर्म । नको भेदाभेद वर्म । सांडा व्दैताचा भाव । तेणे सर्व दिसे वाव । एकाजनार्दनी भाव । भाव तेथे वसे देव ।।९२६।।

**आरशाअंगी लागता मळ** । मुख न दिसेची निर्मळ । मळ तो झाडूनि पाहता । मुख दिसे निर्मळता । पाहता शुद्धभाव रीति । परमार्थ हाचि चित्ती । एकाजनार्दनी हा विचार । आरशासारिखा प्रकार ।।९२७।।

**शुद्धभाव चित्ती** । तरी काही न लगे युक्ति । न लगे आणिक विचार । शुद्धभाव हाचि सार । भावाविण वाझे । साधने ती अवघी ओझे । एकाजनार्दनी भाव । पाववी अक्षय तो ठाव ।।९२८।।

**अभाग्य न भजती भगवंती** । त्यासी पृथ्वी असे जडत्व देती । जळे दिधली त्या अधोगती । तेजे दिधली त्या संतापवृत्ति । ऐशा कैसेनी भेटे भगवंतु । नरदेही मुकले निजस्वार्थु । जन्ममरणाचे भोगिती आवर्तू । त्यासी विमुख होय हृदयस्थु । वायुने दिधले त्या चंचळत्व । नभे दिधले त्या भावशून्यत्व । महतत्वे हरिले निजसत्व । माये दिधले त्या ममत्व । सभाग्य भावे भजती भगवंती । त्यासी पृथ्वी देतसे निज शांति । जले दिधली मधुर रसवृत्ती ।तेजे दिधली निजतेज प्रभादीप्ती । ऐशा सहजे प्रसन्न होय देवो । जेणे भूतांचा पालटे देहभावो । निजी निजाचा वाढे निर्वाहो । जनी विजनी अखंड ब्रह्म भावो । वायु उपरमे दे निश्र्चळत्व । नभे दिधले त्या अलिप्ततत्व । महतत्वे दिधले शोधीत सत्व । माये दिधले सव्दिद्दया परमतत्व । एकाजनार्दनी निज भक्ति । ते अलभ्य लाभू होय प्राप्ती । भुते महाभुते प्रसन्न होती । तेणे न भंगे ब्रह्मस्थिति ।।९२९।।

**भाव लागला भगवंती** । हरिरूप पवित्र जगती । पाहता कर्माकर्म गती । ब्रह्मस्थिति अखंड । भक्ति ह्मणे सोहंशक्ति । सांडी भवभय आसक्ती । पाहता निजभाव विरक्ती । सर्वाभूती भगवंता । करिता कर्माचे देहाचरण । कर्म सबाह्य चैतन्य । देहविदेह अवसान । गमनागमन खुंटले । एकाजनार्दन एकपण । अनन्यभावे पै शरण । जन्ममरण आले मरण । ब्रह्म परिपूर्ण पुर्णत्वे ।।९३०।।

**जो जो धरसील भाव** । ते ते देईल देव । ये अर्थी संदेह । मानू नको । भावे भक्ति फळे । भावे देव मिळे । निजभावे सोहळे । स्वानंदाचे । एकाजनार्दनी । भावाच्या आवडी । मनोरथ कोडी । पुरवी तेथे ।।९३१।।

**भावेविण देव नयेचि पै हाता** । वाउगे फिरता रानोरान । मुख्य ते स्वरूप पाहिजे तो भाव । तेणे आकळे देव नि:संदेह । संतसमागम नाम ते पावन । वाचे नारायण हाचि भाव । एकाजनार्दन सोपा मंत्र । गाता जोडे धाम वैकुंठीचे ।।९३२।।

**अवघे अवघे ते देव** । अवघे अवघे एक भाव । अवघे अवघे प्रेमळ । अवघे अवघे निर्मळ । अवघे अवघे भावाचे । अवघे अवघे प्रेमाचे । अवघा एका अवघा एका । अवघा अवघा जनार्दन एका ।।९३३।।

**देवासी तो पुरे** । एक तुळशीपान बरे । नाही आणिक आवडी । भावासाठी घाली उडी । कण्या भाजी पान फळे खाय । न पाहे यातीकुळ स्वये । प्रीतिने दहीभात । उच्छिष्ट गोवळयांचे खात । भक्तिसुखे भुलला  हरी । एकाजनार्दनी निर्धारी ।।९३४।।

**भावे करारे भजन** । भावे करा नामस्मरण । भावे जावे पंढरीसी । भावे नाहावे भीमसथीसी । भावे करा प्रदक्षिणा । भावे करा जागरणा । भावे व्रत एकादशी । एका शरण जनार्दनासी ।।९३५।।

**आम्हासी विश्र्वास पुरे एक भाव** । या विठ्ठलावाचोनि देव न मनो कोण्हा । विश्रातीचे घर संतांचे माहेर । करिती निर्धार वेदशास्त्रे । जनार्दनाचा एका प्रेमे तो आठवी । विठ्ठल साठवी हृदयामाजी ।।९३६।।

**पाउला पाऊली चिंतावी माउली** । विठाई साउली आदि अंती । नोहे परता भाव नोहे परता भाव । आतुडेचि देव हाती मग । बैसलासे द्दढ हृदय मंदिरी । सबाह्याभ्यंतरी कोंडोनिया । एकाजनार्दनी जडला विठ्ठल । नोहे तो निर्मळ आता कधी ।।९३७।।

**बहुमते बहु मतांतरे** । आह्मा निर्धारे नावडती । अविनाश आहे सुख पंढरीसी । यालागी तयासी न विसंबो । विठ्ठल देवो जेथे उभे ।  पुढे शोभे पुंडलीक । एकाजनार्दनी भ्रमर । कमळ परिकर विठोबा ।।९३८।।

**देव प्रसन्न जाला माग ह्मणे वहिला** । भक्त घरोघरी विचार पुसो गेला । भाव की भ्रांती आळस की भक्ती । विचारूनि व्यक्ती ठाई ठेवा । अरे हे गुह्यगोप्य कुडे करू नये उघडे । तरी व्दारोव्दार पुसू जाय वेडे । विलंब करिता पहाहो उदास जाला देवो । निवालीया खंति न

घाली ह्मणे धावो । शिकविले नायकती वरिले ते करिती । आपुलेनि कर्मे आपण गुंतताती । एकाजनार्दनी शितल भाव । आळसेचि देव दु-हाविला ।।९३९।।

**सर्वा ठाई ज्याची सत्ता** । तो भक्ताधीन तत्वता । ज्याची आज्ञा प्रमाण । बारा अंगुळे विचरे प्राण । आज्ञा ज्याची धडफुडी । पर्वत बैसका न सोडी । ज्याचे आज्ञेविण । पवनु न चाले एक क्षण । जो सर्वांसी आधार । एकाजनार्दनी विश्र्वभर ।।९४०।।

**भक्त देवाते भजती** । देव भक्ती धरी प्रीती । ऐसा एकमेकांचा ठावो । भक्ताअंगी देव पाहाहो । अलंकार एक सुवर्ण । तैसा नाही दुजेपण । एकाआधी एक पाठी । एकाजनार्दनी रहाटी ।।९४१।।

एक एकाच्या भावा । गुंतुनी ठेले अनुभवा । प्रेम न समाये गगनी । धन्य धन्य चक्रपाणी । उद्धरी पतिता । मोक्ष देतो सायुज्यता । एका शरण जनार्दनी । उदार हा जगदानी ।।९४२।।

**आधी देव पाठी भक्त** । ऐसे मागे आले चालत । हेही बोलणेची वाव । भक्ता आधी कैचा देव । भक्त शिरोमणी भावाचा । देव लंपट जाला साचा । भक्तासाठी अवतार । ऐसा आहे निर्धार । वडील भक्त धाकुला देव । एकाजनार्दनी नाही संदेह ।।९४३।।

**सप्रेम करिता भजन** । नोहे भवाचे बंधन । भक्ताचे आधीन देवो । नाही नाही हो संदेहो । भक्ताची एवढी गोडी । वैकुंठाहुनी घाली उडी । भक्तामाजी देव असे । देवा अंगी भक्त दिसे । ऐशी परस्परे मिळणी । शरण एकाजनार्दनी ।।९४४।।

**देव भक्त दोन्ही समची सारखे** । पहाता पारिखे न दिसे दुज । भक्तांचे अंगी देव असे । देवाचे हृदयी भक्त वसे । ऐशी परस्परे मिळणी । शरण एकाजनार्दनी ।।९४५।।

**भक्तावाचुनी देवा** । कैचे रूप कैचे नावा । भक्ती धरुनि आवडी । देवा लाविलीसे गोडी । भक्तावाचुनी पुसे कोण । देवा नाही महिमान । भक्ती करुनी निर्धार । देवा धरविला अवतार । उभयता नोहे तुटी । एकाजनार्दनी मिठी ।।९४६।।

**देव म्हणे भक्तासी आवडी** । मी झालो तुमचा गडी । सांगाल ते करीन काम । मजवर ठेवा तुमचे प्रेम । भाव मज द्यावा । आणीक मज नाही हेवा । आवडीने देव बोले । भक्तामाजी स्वये खेळे । खेळता गोपाळी । एकाजनार्दनी गोकुळी ।।९४७।।

**माझा भक्त मज अंतरी** । मी सदा बाहेरी तिष्ठतसे । ऐशी परस्परे खूण । जाणती ते ब्रह्मज्ञान । माझी सायुज्यता मुक्ति । घेउनी बळे मीच होती । सायुज्यापरिस भक्ति गोड । एकाजनार्दनी धरती चाड ।।९४८।।

**बहु मोलाचे नाही कारण** । मी देह भक्त आत्मा जाण । माझा देह शरीर जाण । भक्त आंत पंचप्राण । नांदे सहज भक्त आंत । मी देह भक्त देहातीत । एकाजनार्दनी भक्त देवपणा मी भक्तांकित ।।९४९।।

**नामरूप मज आणिले जिही** । त्याचिया उपकारा नोहे उतराई । भक्ताचे उपकार कशाने फेडी । यालागी त्याचे उच्छिष्ट काढी । भक्ताचेनी पालटे येतो गर्भवासा । उपकार उतराई नोहे कैसा । एकाजनार्दनी उतराई नोहे । यालागी भक्तासी न विसंबे जीवे ।।९५०।।

**मज भक्त आवडता फार** । ऐसा माझा निर्धार । भक्ताअंगी मीच वसे । माझा भक्त मज माजी असे । मज आणले नामरूपा । भक्त सखा माझा तो । एकाजनार्दनी निर्गुण । भक्त सगुण मज केले ।।९५१।।

**तुमचे अप्रमाण होता बोल** । मग फोल जीवित्व माझे । कासया वागवू सुदर्शन । नाही कारण गदेचे । तुमचा बोल व्हावा निका हेचि देखा मज प्रिय । मज यावे उणेपण । तुमचे थोरपण प्रकाशु द्वया । एकाजनार्दनी देव । स्वयमेव बोलती ।।९५२।।

**माझी ब्रिदावळी** । कदाकाळी न संडी मी । तुह्मा पडता अंतर । मज वाटे हूरहूर । तुमची न होता भेटी । मज दु:ख पोटी अनिवार । अंकीत अंकिलो तुमचा । एकाजनार्दनी सत्य साचा ।।९५३।।

**तुह्मासाठी उणेपण** । स्वये मजलागून येऊ द्वया । प्रतिज्ञा तुमची न्यावी सिद्धि । मधी उपाधी येऊ नेदी । घेउनी हाती सुदर्शन । आले विघ्न निवारी । दारवंटा राखीन तुमचा । एकाजनार्दनी साचा ब्रीद माझे ।।९५४।।

**देव गुज सांगे भक्ता** । अंकित अंकिता तुमचा मी । तुह्मालागी अवतार । धरणे साचार मजलागी । तुम्हा न यावे उणेपण । माझे थोरपण कोण वानी । ह्मणोनि गळा घाली मिठी । एकाजनार्दनी पडली गांठी ।।९५५।।

**भावे करिता माझी भक्ति** । मी आतुडे भक्ताहाती । माझे भक्तिपरते । साधन नाही वो निरुते । माझे भक्तीचे महिमान । भक्त जाणती सज्ञान । एकाजनार्दनी भाव । स्वये बोलतसे देव ।।९५६।।

**जो जो कोणी भजनी बैसे** । तेथे मी दिसे तैसाची । उपासनेचा निर्वाह । सर्वाभूती देवाधिदेवो । हो का माझी प्रतिमा मूर्ति । अंतज्योती मी वसे । तेथे करिता भावे भक्ति । एकाजनार्दनी मुक्ति तयासी ।।९५७।।

**जे भजती मज जैसे** । मी ही तया तैसा असे । जया जैशी पै वासना । मीही तैसा होय जाणा । हो का माझी प्रतिमा मूर्ति । आदरे करिता माझी भक्ति । मी जनी असोनी निराळा । एकाजनार्दनी अवलीला ।।९५८।।

**मज जे अनुसरले कायावाचा मने** । त्याचे चालवणे सर्व मज । ॠणवई त्यांचा अनंत जन्माचा । जे गाती वाचा किर्ती माझी । तयाचिया व्दारी लक्ष्मीसहित । उभा मी तिष्ठत याचकपणे । सर्व जडभारी जाणे योगक्षेम । एकाजनार्दनी नेम जाणा माझा ।।९५९।।

**मजसि जेणे विकिले शरीर** । जाणे मी निर्धारे अंकित त्याचा । त्याचे सर्व काम करीन मी अंगे । पडो नेदी व्यंगे सहसा कोठे । एकाजनार्दनी त्याचा मी अंकित । राहे पै तिष्ठत त्याचे व्दारी ।।९६०।।

**सर्व कर्म मदर्पण** । करिता मन शुद्ध होय । न्यून ते चढते जाण । करी संपूर्ण मी एक । माझ्या ठाई ठेउनी मन । करी कीर्तन आवडी । गन ठेउनी माझ्या ठायी । वसो कोठे भलते ठाई । एकाजनार्दनी मन । करा मजची अर्पण ।।९६१।।

**साक्षात्कार होता** । साच बद्धता नुरे तत्वता । माझा होता अनुभव । कल्पनेसी नुरे ठाव । माझे देखता चरण । संसारची नुरे जाण । माझे देखता चरण । संसारची नुरे जाण । माझी भक्ति करिता । दोष नुरेची सर्वथा । सर्वाठाई मी वसे । एकाजनार्द्नी भेद नासे ।।९६२।।

**भाविकांच्या उडकासाठी** । रमा नावडे गोमटी । भाविकांचे उदक घेता । मज समाधान चित्ता । भाविकांचे उदाकापुढे । मज वैकुंठही नावडे । ऐशी भाविकांची गोडी । एकाजनार्दनी घाली उडी ।।९६३।।

**स्वर्ग नरक इहलोक** । यांची प्रीति सांगोनी देख । भावे करिता माझी भक्ति । भाविक आपोआप उध्दरती । गव्हाची राशी जोडिल्या हाती । सकळ पक्वान्ने त्याची होती । द्रव्य जाहले आपुंले हाती । सकळ पदार्थ घरा येती । एकाजनार्दनी बोध । सहज घडे एकविध ।।९६४।।

**माझा शरणागत न दिसे केविलवाण्या** । ही तो लाज जाणा माझी मज । एकविध भावे आलिया शरण । कर्म धर्म जाण पूर्ण त्याचे । समर्थाचे मुला काय खावयाची चिंता । तैसे

मी त्या तत्वता न विसंबे । एकाजनार्दनी हा माझा नेम । आणीक नाही वर्म भावेविण ।।९६५।।

**माझा भक्त मज भीतरी** । मी स्वये असे तया माझारी । बहु बोलाचे नाही कारण । मी देह तो आत्मा जाण । माझिया भक्तीसी जे लागले । ते मीच होऊनी ठेले । एकाजनार्दन अभेद । तया हृदयी मी गोविंद ।।९६६।।

**पूजी माझिया भक्ताते** । तेणे संतोष होत माते । भक्त माझा मी भक्ताचा । ऐशी परंपरा साचा । देवभक्तपण । वेगळीक नाही जाण । भक्त जेवाताची घालो । एकाजनार्दनी लाधलो ।।९६७।।

**वामिल्या मिष्टांना** । परतोनी श्रद्धा न धरी रसना । ऐसे आठविता माझे गुण । मिथ्या ठाई नसे भान । जेथे कर्माचे परिपाठी । हे तो पुन्हा नये गोष्टी । येव्हढे कथेचे महिमान । एकाजनार्दनी शरण ।।९६८।।

**भावे करिता माझी भक्ती** । विषयवासना जळोनि जाती । चालता माझे भक्तिपंथी । सकळ साधने जळोनि जाती । माझिया निजभक्ता । न बाधेची संसारव्यथा । प्रल्हादा गाजिता जगजेठी । मी प्रकटलो कोरडे काष्ठी । द्रौपदी गांजीता तात्काळी । कौरवांची तोंडे केली काळी । गोकुळी गाजिता सुरपती । गोवर्धन धरिला हाती । अर्जुन प्रतिज्ञेचे वेळी । म्या लपविला हेळी । अंबऋषीचे गर्भवास । म्या सोशिले सावकाश । भक्त चरणीची माती । एकाजनार्दनी वंदिती ।।९६९।।

# भक्तवत्सलता

**जी जी भक्त बोलती वचने** । ती ती प्रमाण करणे देवा । याजसाठी अवतार । धरी मत्स्य कासव सुकर । भक्तवचना उणेपण । येऊ नेदी जाण निर्धारे । स्वये गर्भवास सोशी । अंबऋषीकारणे । एकाजनार्दनी ब्रीद साचा । वागवी भक्ताचा अभिमान ।।९७०।।

**अंबऋषीराया पडिले सायास** । सोसी गर्भवास स्वये देव । उच्छिष्टही खाता प्रायश्चित्त असे । गोपाळाचे ग्रास खाय हरी । एकाजनार्दनी भक्ताचा अंकित । म्हणोनी तिष्ठत विटेवरी ।।९७१।।

**भक्तालागी अनुमात्र व्यथा** । ते न साहवे भगवंता । करुनी सर्वांगाचा वोढा । निवारीतसे भक्त पीडा । होऊनी भक्ताचा अंकितु । सारथीपणे तो करीतु । प्रल्हादासी दु:ख मोठे । होताची काष्ठी प्रकटे । ऐसा अंकित चक्रपाणी । एका शरण जनार्दनी ।।९७२।।

**भक्तपणा साण नव्हेरे भाई** । भक्ताचे पाय देवाचे हृदयी । भक्त तोचि देव भक्त तोचि देव । जाणती हा भाव अनुभवी । दान सर्वस्वे उदार बळी । त्याचे व्दार राखे सदा वनमाळी । एकाजनार्दनी मिती नाही भावा । देवचि करितो भक्ताची सेवा ।।९७३।।

**वाहे भक्तांचे उपकार** । न संडी भार त्यांचा तो । ह्मणे इही थोरपण आह्मा । ऐशा वाढवी महिमा भक्तांचा । एकाजनार्दनी कृपाळ । दीनाचा दयाळ विठ्ठल ।।९७४।।

**मिठी घालुनिया भक्ता** । ह्मणे शिणलेती आता । धावे चुरावया चरण । ऐसा लाघवी आपण । योगियासी भेटी नाही । तो आवडीने कवळी बाही । एकाजनार्दन भोळा । भक्ता आलिंगी सावळा ।।९७५।।

**देवासी तो आवडे भक्त** । नाही हेत दुसरा । बळी सर्वस्व करी दान । त्याचे व्दारपाळपण केले त्वा । धर्म सदा होय उदास । त्याचे घरी तुझा वास । तुझा भक्त अंबऋषी । त्याचे गर्भवास सोशिसी । तुम्ही उदार जगदानी । शरण एकाजनार्दनी ।।९७६।।

**शुद्ध करुनिया मन** । नारायण चिंतावा । मग उणे नाही काही । प्रत्यक्ष पाही अनुभव । आळविता उपमन्यु बाळ । दिला क्षीरसागर सुढाळ । ध्रुवे चिंतिले चरणा । अढळपदी स्थापिले जाणा । बिभीषणे केला नमस्कार । तया केले राज्यधर । विष पाजिता पूतना । पाठविली वैकुंठ सदना । गणिकेने आठविले । तिसी वैकुंठी बैसविले । हीनयाती कुब्ज्जादासी । जाहली प्रिय ती देवासी । अर्जुनाच्या भावार्थासाठी । रथ हाकी जगजेठी । गोपाळांची आवड पोटी । उच्छिष्टासाठी लाळ घोटी । विदुराच्या भक्षी कण्या । तेणे आवडी मानी मना । एका शरण जनार्दनी । दासा न विसरे चक्रपाणी ।।९७७।।

**अष्टांगयोग साधिती साधनी** । तो हरिकीर्तनी नाचे बापा । यज्ञादिकी अवदान नेघे वो माये । तो उभा राहुनि क्षीरापती खाये । पवन कोंडोनि योगी जाती निराकारी । तो हरि धर्माघरी पाणी वाहे । सनकनंदन जया ध्यातताती आवडी । तो अर्जुनाची घोडी धुतो हरी । एकाजनार्दनी भक्तांचा अंकित । ह्मणोनि तिष्ठत विटेवरी ।।९७८।।

**देव धावे मागे न करी आळस** । सांडिता भावपाश मायाजाळ । सर्वभावे जे का शरण रिघती । तयाचे वोझे श्रीपती अंगे वाहे । नको भुक्तिमुक्ति सदा नामी हेत । देव तो अंकित होय त्यांचा । एकाजनार्दनी ऐसा ज्याचा भाव । तया घरी देव पाणी वाहे ।।९७९।।

**देवासी आवडे भक्त समागम** । त्याचे सर्व काम करी अंगे । भक्तकाजालागी अवतार धरी । नांदे भक्ताघरी स्वये देव । भक्ताविण देवा काहीचि नावडे । भक्त तो आवडे सर्वकाळ । एकाजनार्दनी भक्तांचा अंकित । देव सदोदित स्वये होत ।।९८०।।

**नातुडे जो योगी ध्याना** । तो समचरणा पंढरीये । भोळा सुलभ भाविकांसी । दर्शन सर्वांसी सारखा । अभेदाच्या न धावे मागे । भाविका लागे पाठोपाठी । शुद्ध देखताचि भाव । एकाजनार्दनी उभा देव ।।९८१।।

**उदार देव उदार देव** । नाशी भेव भक्तांचे । प्रल्हादाचे निवारी घात । राखिला जळात अग्नीसी । पांडवांचे करी काम । निवारी दुर्गम स्वअंगे । गौळीयांची गुरे राखी । आपण शेखी एकला । येता शरण एकपणे । एकाजनार्दनी ऐसे देणे ।।९८२।।

**दयाळू उदार पंढरीराव** । भाकिता कीव पुरवी इच्छा । ऐसा याचा अनुभव । आहे ठाव मागोनिया । जे हे होती शरणागत । पुरवी आर्त तयांचे । उपमन्यु धृव बाळ । दिधले अढळपद त्याते । पुराणी तो व्यासे बहु । वर्णिले दावू कासया । एकाजनार्दनी एकचि भाव । तेणे देव तुष्ठत ।।९८३।।

**दयेचे धाम नेघे कोणचाही श्रम** । हरी वर्णी सप्रेम द्दढ निजभावे ।प्रसन्न होऊनी दिनाते पहातो । आवडी उध्दरितो भाविकांसी । एकाजनार्दनी भक्तिसी भुलला । ह्मणोनि वेडावला भक्तामागे ।।९८४।।

**खुपू लागे सावत्यासी** । न पाहे यातीसी कारण । घडी मडके कुंभाराचे । चोखामेळ्याचे ढोर वोढी । सजन कासयाचे विकी मास । दामाजीचा दास स्वये होय । एकाजनार्दनी जनीरांगे । ढळू कांडू लागे आपण ।।९८५।।

**देखावया भक्तपण** । रूप धरिले सगुण । तो हा पंढरीचा राणा । वेदा अनुमाना नये तो । भाविकांचे पाठीमागे । धावे लागे लवलाही । खाये तुळशीपत्र पान । न म्हणे सान थोडे ते । एकाजनार्दनी हरी । आपुली थोरी विरारे ।।९८६।।

**दहा अवतार घेत भक्तांचिया काजा** । तो हा विटेवरी राजा पंढरीचा । भक्तांचे उणे न पाहे आपण । उच्छिष्ट काढी धर्माघरी न लाजे जाण । अर्जुनाची घोडी रणागणी धुतली । भक्ता

नये उणे कृपेची माउली । एकाजनार्दनी भक्ताचिया काजा । विटेवरी उभा राहिला सहजा ।।९८७।।

**एकपणे एकला दिसे** । उभा असे विटेवरी । नेणतीयासाठी लहान । होय आपण स्वइच्छे । जाणताचि लाग चाड । न धरी भीड तयाची । एकाजनार्दनी शरण । भवमोचन तारक ।।९८८।।

**एकाघरी चोरी लोणी** । एका घरी वाहे पाणी । एका घरी बांधिला राहे । एका घरी चिमणा होय । एका घरी ब्रह्मचारी । एका घरी भोगी नारी । एकाघरी सुखे नाचे । एका घरी प्रेम त्याचे । ऐसा व्यापिला दोही घरी । एकाजनार्दनी श्रीहरी ।।९८९।।

**एका व्दारी व्दारपाल** । एका घरी होय बाळ । एका घरी करी चोरी । एका घरी होय भिकारी । एका घरी युद्ध करी । एकाघरी पूजा बरी । एका घरी खाय फळे । एका घरी लोणी बळे । एका एकपणे एकला । एकाजनार्दनी प्रकाशला ।।९९०।।

**एकाचिया चाडे** । उगवी बहुताचे कोडे । म्हणोनी उभा विटेवरी । पाऊले समचि साजिरी । एकासाठी गर्भवास । एकाव्दारी रहिवास । एका घरी उच्छिष्टे काढी ।। एकाची रणी धूत घोडी । एका व्दारी भिकारी होय । एका घरी भाजी खाय । एका एकपणे हरी । एकाजनार्दन दास्य करी ।।९९१।।

**ज्याची प्रतिज्ञा निर्धारी** । देवा हरी आणियेले । तो हा शांतनूचा रावो । भीष्म देवो संग्रामी । शस्त्र न धरी ऐसा बोल । साचा केला संग्रामी । विकळ पडताची अर्जुन । धरिले सुदर्शन हस्तकी । ऐसा कृपेचा कळवला । एकाजनार्दनी पाळी लळा ।।९९२।।

**भक्त चरणीचे रज:कण** । हृदयी वाहे नारायण । भक्ता पडता संकट । देव अंगे सोशी कष्ट । गांजिता प्रल्हादा नेहटी । स्वये प्रकटला कोरडे काष्टी । द्रौपदी गांजिता तात्काळी । कौरवांची तोंडे केली काळी ।गोकुळी गांजिता मुरपती । गोवर्धन धरिला हाती । अर्जुनाते संकटप्राप्ति । दिवसा लपवी गभस्ती । अंबऋषीचे गर्भवास । स्वये सोशी हृषीकेश । एकाजनार्दनी दास । होय भक्तांचा सावकाश ।।९९३।।

**कासया साधन तपाचिया हावा** । पाचारिता धावा येतो लवलाही । ऐसा अंकिला धावे वचनासाठी । पहा जगजठी भक्तकाजा । संकटी पडली,गजानक मिठी । धावे उठाउठी ब्रीदासाठी । अळीकर घोकुट ध्रुव बैसे वनी । तयासी तत्क्षणी अढळ केले । पडता संकट

द्रोपदी करी धावा । धावे लवलाह्या सारुनी ताट । एकाजनार्दनी भक्तकाज कैवारी । धावे सत्वरी आपुल्या लाजा ।।९९४।।

**अवरोधे विरोधे करिता हरिभक्ती** । सायुज्यता मुक्ति देणे तया । ऐसा कृपाळ लक्ष्मीचा पती । पुराणे वर्णिती महिमा ज्याचा । विष पाजू आली पूतना राक्षसी । अक्षयपदासी दिले तिसी । विष पाजू आली पूतना राक्षसी । अक्षयपदासी दिले तिसी  अगबग केशी असुर बधिले । सायुज्यता दिले पद तिसी । अगबग केशी असुर बधिले । सायुज्यता दिले पद त्यासी । एकाजनार्दनी भक्तांचा कैवारी । ब्रीद हे साचारी मिरवतसे ।।९९५।।

**ज्ञानराजासाठी स्वये भिंत वोढी** । विसरुनी प्रौढी थोरपण । तो हा महाराज चंद्रभागे तीरी । कट धरुनी करी तिष्ठतसे । नामदेवासाठी जेवी दहीभात । न पाहे उचित आन दुजे । गोरियाचे घरी स्वये मडकी घडी । चोखियाची वोढी गुरे ढोरे । सावत्या माळ्यांसी खरपू लागे अंगे । कबीराचे मागे शेले विणी । रोहिदासासवे चर्म रंगू लागे । सजण कासायाचे अंगे मांस विकी । नरहरि सोनारा घडू फूकू लागे । दामाजीचा वेगे पाडीवार । जनाबाईसाठी वेचितसे शेणी । एकाजनार्दनी धन्य महिमा ।।९९६।।

**भक्तांच्या उपकारासाठी** । नोहे पालट उतराई । ज्ञानोबाची भिंत वोढी । उच्छिष्ठपात्रे काढी धर्माघरी । जेवी नामदेवसंगे साचे । सुदाम्याचे पोहे भक्षी । विष पितो मीराबाईसाठी । विदुराच्या हाटी कण्या स्वये । एकाजनार्दनी अंकितपणे । व्दार राखणे बळीचे ।।९९७।।

**दासासी संकट पडता जडभारी** । धावे नानापरी रक्षणार्थ । पडता संकटी द्रौपदी बहिण । धावे नारायण लवलाहे । सुदामियाचे दरिद्र निवटिले । व्दारकेतुल्य दिले ग्रामत्यासी । अंबऋषीसाठी गर्भवास सोसी । परिक्षितीसी रक्षी गर्भामाजी । अर्जुनाचे रथी होऊनी सारथी । उच्छिष्ट भक्षिती गोवळ्याचे । राखिती गोधने मेघ वरुषला । गोवर्धन उचलिला निजबळे । मारुनी कंसासुर सोडिले पितर । रक्षिले निर्धारे भक्त जन । एकाजनार्दनी आपुले ह्मणविता । धावे हरी सर्वथा तयालागी ।।९९८।।

**भक्तासी संकट पडता** । धावे देव तत्वता लवलाहे । ऐसा अनुभव आहे । देव लवलाहे धावत । द्रौपदी पडता संकटी । धावे उठाउठी देव तेव्हा । पडता संकट प्रल्हादासी । कोरडे काष्ठेसी देव जाहला । पडता संकट गजेंद्रासी । हाके सरसी उडी घाली । एकाजनार्दनी निर्धार । स्मरता साचार धावत ।।९९९।।

**मानी भक्तांचे उपकार** । म्हणोनी धरी अवतार । प्रेमे नाना छंदे नाचे । उणे पडो नेदी साचे । अंगे धाव घाली । ऐशी कृपेची माउली । एकाजनार्दनी साचा । देव अंकित भक्तांचा ।। १०००।।

**मानी भक्तांचे उपकार** । म्हणोनी धरी अवतार । उच्छिष्ट काढी धर्माघरी । नीच काम करी गौळ्याचे । अर्जुनाचे रथी बैसे । सारथ्य सरसे करितसे । एकाजनार्दनी अंकितपणे । व्दार राखणे बळीचे ।।१००१।।

**भाविकांची आवड मोठी** । धावे पाठी रानोरान । कण्या खाये विदुराच्या । उच्छिष्ट गोवळ्याचे परमप्रिय । उच्छिष्ट फळे भिल्लीणीची । उच्छिष्ट खाये रुची आदरे। पोहे खाये सुदाम्याचे । कोरडे फके मारी साचे । ऐशी भक्ताची आवडी देवा । एकाजनार्दनी करी सेवा ।।१००२।।

**उत्तम अन्न देखता दिठी** । ठेवी पोटी जतन ते । तान्हूल्याची वाहे चिंता । जेवी माता बाळाते । न कळे तया उत्तम कडू । परी परवडू माता दावी । एकाजनार्दनी तैसा देव । घेत धांव भक्तांवरी ।।१००३।।

**वत्साचिये लळे जैसी** । धेनु अपैशी येत घरा । तैसा भक्तावरी नारायण । धावे आपण वोढीने । मुंगियांच्या घर मूळ । धाडी समूळ कोण तो । एकाजनार्दनी देव । घेत धांव आपणचि ।।१००४।।

**यातीकुळ काही नाणी तो मनासी** । धावे त्याचे पाठीशी लाववेगे । आपुले ह्मणविल्या न देखे पारिखे । रक्षी त्या कौतुके आपुले काजा । एकाजनार्दनी पहा अनुभव । धावतसे देव लवलाहे ।।१००५।।

**चातकाची ताहान किती** । तृप्ति करुनी नीववी क्षिती । धेनु वत्साते थोरसे । घरी दुभते पुरवी जैसे । पक्वान्न सेवू नेणती बाळे । मातामुखी घाली बळे । एकाजनार्दनी बोले । एकपण माझे नेले ।।१००६।।

**बाळकाचे छंद जाण** । माता परविती आपण । बोबडे बोलता ते बोल । माते आनंद सखोल । मागे जे ते दे आपण । आळ पुरवी त्यासी देऊन । एकाजनार्दनी ममत्व ते । नोहे लौकिकापुरते ।।१००७।।

**भक्तिभावार्थ अर्पिला** । देव सर्वांगी धरिला । रानाची रानट वनमाला । भक्ती आणुनी घातली गळा । भक्त अर्पिता आवडी । देव जाणे त्याची गोडी । भक्तभाव जाणोनि पाही । एकाजनार्दनी राहे देही ।।१००८।।

**देवो विसरे देवपण** । अर्पी वासना भक्तांसी । भक्त देही सदा वसे । धर्म अर्थ अर्पितसे । जे जे भक्ताची वासना ।पुरवी आपण त्याचि क्षणा । एकाजनार्दनी अंकित । उभा तेथेचि तिष्ठत ।।१००९।।

**जे जे भक्तासी आवडी** । तया संकटी घाली उडी । वाढवी आपुली आपण गोडी । करी जोडी नामाची । होय तयाचा अंकित । नेणे लहान थोर मात । आपुले आपण पुढे धावत । न सांगता करी सर्व । एकाजनार्दनी कनवाळ ।पतितपावन म्हणवी दयाळ । माता स्नेहे परीस सबळ । भक्तालागी स्वये रक्षी ।। १०१०।।

**जे जे वेळे जे जे लागे** । ते न मागता पुरवी वेगे । ऐसा भक्ताचा अंकित । राहे व्दारी पै तिष्ठत । आवडी गौळीयांची मोठी । गायी राखी जगजेठी । भक्ति भावार्थे भुकेला । एकाजनार्दनी विकला ।।१०११।।

**भक्ता जैसा मनोरथ** । पुरवी समर्थ गुरुराय । नित्य ध्याता तयाचे चरण । करी संसारा खंडन । वानू चरणाची पवित्रता । उद्धार जडजीवा तत्वता । अवचट लागताचि कर । एकाजनार्दनी उद्धार ।।१०१२।।

**आम्हा सकळ देखता** । पुरवी लळे तो सर्वथा । जे जे मागावे तयासी । ते ते देतो निजभक्तासी । न मने अंकिताचे शीण । राहे व्दारपाळ होऊन । घोडे धुतले रणांगणी । एकाशरण जनार्दनी ।।१०१३।।

**अंकित भक्तांचा** । निजकाम करी साचा । काढी धर्माधरी । उच्छिष्ट पात्रे निर्धारी । कुब्जेसी रतला । एकाजनार्दनी भला ।।१०१४।।

**भक्ताचिये काजे** । देव करिता न लाजे । हा तो पहा अनुभव । उदार पंढरीचा राव । नविचारी यातीकुळ । शुची अथवा चांडाळ । एकाजनार्दनी शरण । एकभावे निंबलोण ।।१०१५।।

**भक्ताचिया घरी** । नीच काम देव करी । धर्माघरी उच्छिष्ट काढी । अर्जुनाची धुतो घोडी । विदुराच्या भक्षी कण्या । द्रोपदी धावण्या धावतु । एकाजनार्दनी शरण । एकपणे जनार्दन ।।१०१६।।

**अंकित अंकिला** । देव भक्ताचा पै जाला । पहा पुंडलीकासाठी । उभा असे वाळुवंटी । युगे अठ्ठावीस जाली । न बैसे अद्दयापि तो खाली । न बैसची उभा असे । एकाजनार्दनी भक्ति पिसे ।।१०१७।।

**भक्त अर्पिता सुमनमाळा** । घाली आवडीने गळा । ऐसा आवडीने भूकाळू । श्रीविठ्ठल दीनदयाळु । भक्तेभावार्थ अर्पिता । ते आवडे पंढरीनाथा । भक्तासाठी विटेवर । समपद कटी कर । ऐशी कृपेची कोवळी । एकाजनार्दनी माउली ।।१०१८।।

**पार नाही जायच्या गुणा** । तो उभा श्रीपंढरीचा राणा । नवल गे माय भक्तांचेसाठी । कटी कर ठेउनी उभा वाळूवंटी । न ह्मणे तया कोणते बोल । उगा राहिला न बोले बोल । एकाजनार्दनी भक्ताची आस । धरुनी उभा तिष्ठे जगदीश ।।१०१९।।

**कृपाळुपणे उभा विटेवरी** । पाहे अवलोकोनी द्दष्टीभरी । न पुरेचि धणी न बैसे खाली । उभा राहे समचि पाऊली । युगे जाहली नोहे लेखा । एकाजनार्दनी भुलला देखा ।।१०२०।।

**भोळा देव भोळा देव** । उंच नीच नेणे भाव । चोखियाच्या मागे धावे । सेले कबिराचे विणावे । खुरपू लागे सावत्यासी । उणे येवो नेदी कोणासी । विष पिणे धाउनी जाणे । भाविकाची भाजी खाणे । कण्याची तो आवडी मोठी । एकाजनार्दनी लाळ घोटी ।।१०२१।।

**भक्तदरुशने देव ते तोपती** । तेणे आनंद चित्ती देवाचिये । भक्ताची स्तुति देवासी आनंद । भक्तनिंदा होता देवा येतेसे क्रोध । भक्त संतोषता देवासी सुख । एकाजनार्दनी देवा भक्तांचा संतोष ।।१०२२।।

**देव पूजिती आपुले भक्ता** । मज वाढविले ह्मणे उचिता । ऐसा मानी उपकार । देव भक्ती केला थोर । देवाअंगी नाही बळ । भक्त भक्तीने सबळ । देव एक देशी वसे । भक्त नांदती समरसे । भक्तासी देवा आवडी । उणे पडो नेदी अर्धघडी । नाही लाज अभिमान देवा । एकाजनार्दनी करी सेवा ।।१०२३।।

**भक्त नीच म्हणोनी उपहासिती** । त्याचे पूर्वज नरका जाती । भक्त समर्थ समर्थ । स्वये बोले वैकुंठनाथ । भक्तासाठी अवतार । मत्स्य कुर्मादी सुकुर । यातिकुळ न पाहे मनी । एका शरणजनार्दनी ।।१०२४।।

**अभेद भजनाचा हरीख** । देव भक्त जाहले एक । कोठे न दिसे भेदवाणी । अवघी काहाणी बुडाली । हारपले देवभक्तगण । जनी जाहला जनार्दन । देव भक्त नाही मात । मुळीच खुंटला शब्दार्थ । एकाजनार्दनी देव । पुढे उभा स्वयंमेव ।।१०२५।।

**देव भक्तपणे नाही दुजा भाव** । एकरूप ठाव दोही अंगी । दुजेपण नाही दुजेपण नाही । दुजेपण नाही दोही अंगी । एकाजनार्दनी देव तेचि भक्त । सबाह्य नांदत एकरूपी ।।१०२६।।

**देव आणि भक्ता एकचि विचार** । दुजे पाहे तया घडे पातक साचार । वेद आणि श्रुती सांगती पुराणे । देव आणि भक्त एकरूपपणे । एकाजनार्दनी जया समता दृष्टी । भक्ता पाहाता देवा होतसे भेटी ।।१०२७।।

**भक्ताविण देवा** । कैचे एकपण सेवा । भक्ताची सेवा देव करी । देव तिष्ठे भक्तव्दारी । भक्ताचे अंकीत । लक्ष्मीसह देव होत । एकाजनार्दनी भक्त । देवा हृदयी धरीत ।।१०२८।।

**जेथे जेथे भक्त वसे** । तेथे देव नांदे अपैसे । हाचि पहा अनुभव । नका ठाव चळू देऊ । बैसले ठाई द्वढ बैसा । वाचे सहसा विठ्ठल । एकाजनार्दनी भक्त । देवा हृदयी धरीत ।।१०२९।।

**वचन मात्रासाठी** । प्रकटला कोरडे काष्ठी । ऐसी कृपाळु माऊली । भक्तासाठी धाव घाली । कृपेचा कोवळा । राखे भक्ताचा तो लळा । एकाजनार्दनी डोळा । पहा विठ्ठल सावळा ।।१०३०।।

**भक्ताची अणुमात्र व्यथा** । न सहावे भगवंता । अंबऋषीसाठी । गर्भवास येत पोटी । प्रल्हादाकारणे । सहस्त्र स्तंभी गुरगुरणे । गोपाळ राखिले वनांतरी । तेथे उचलिला गिरि । राखिले पांडव जोहरी । काढिले बाहेरी विवरव्दारे । ऐसा भक्ताचा अंकित । एकाजनार्दनी तया ध्यात ।।१०३१।।

**देव दासाचा अंकित** । ह्मणोनी गर्भवास घेत । उणे पडो नेदी भक्ता । त्याची स्वये वाहे चिंता । अर्जुनासाठी वरी । स्वये शस्त्र घेत करी । प्रल्हादाकारणे । स्तंभामाजी गुरगुरणे । बळिया व्दारी आपण । रूप धरी गोजिरे सगुण । ऐसा अंकित भावाचा । एकाजनार्दनी साचा ।।१०३२।।

**शरणागता नुपेक्षी हरी** । ऐसी चराचरी कीर्ति ज्याची । बिभीषणे नमस्कार केला । राज्यभर केला श्रीरामे । उपमन्या दुधाचा पै छंद । क्षीरसागर गोविंद त्या देतु । धृव बैसविला अढळपदी । गणिका बैसली मोक्षपदी । ऐसी कृपेची साउली । एकाजनार्दन माऊली ।।१०३३।।

**होऊनी भक्तांचा अंकित** । पुरवितसे मनोरथ । ऐशी हे प्रचीत । उघड पहा । देव भक्ताचा अंकिला । धावे आपण वहिला । भक्ताचिया बोला । उणे पडो नेदी । उपमन्यूचिया काजासाठी । क्षीरसिंधु भरुनि वाटी लाविली त्याचे होटी । आपुला म्हणोनी । वनी एकटे धृवबाळ । तयासी होऊनी कृपाळ । दिधले पाद अढळ । आपुलीया लाजा । प्रल्हाद पडता साकडी । खांबांतुनी घाली उडी । दैत्य मारी कडो विकडी । आपुलिया चाडा । पडता संकट पांडवासी । जाहला सारथी धुरेसी । मारविली बापडी कैसी । कौरवे सहकुल । ऐसा भक्ताचिया का । धावे न धरता लाजा । एकाजनार्दनी दुजा । एकपणे एकटू ।।१०३४।।

**व्दारकेमाजी श्रीकृष्ण** । एकदा करी देवार्चन । उद्धवे कर जोडोन । केला प्रश्न श्रीकृष्णा । सर्व देवांचा तू देव । ईश्र्वरा न कळे तुझी माव । शिणले सर्व ऋषी गणगंधर्व । परी तू नाकळ सर्वथा । तुह्मी बैसोनि एकांती । काय करिता श्रीपती । हे होते पुसणे माझे चित्ती । बहु दिवस श्रीहरी । ऐकोनी उद्धवाची मात । तया बोले जगन्नाथ । एकाजनार्दनी विनवीत । सावधान परियसा ।।१०३५।।

**ऐके उद्धवा प्रेमळा** । सांगतो जीवाचा जिव्हाळा । तू भक्तराज निर्मला । सुचित्ते ऐके । मी बैसोनी आसनी । पूजा करितो निशिदिनी । ते पूज्य मूर्ति तुजलागुनी । नाही ठाउकी उद्धवा । जयाचेनि माते थोरपण । वैकुंठादि हे भुषण । तयाचे पूजेचे महिमान । एक शिव जाणे । येरा न कळेचि काही । वाउगे पडती प्रवाही । उद्धवा तू पुशिले पाही । ह्मणोनी तुज सांगतो । माझे जे आराध्यदैवत । ते कोण ह्मणसी सत्य । भक्त माझे जीवीचे हेत । जाणती ते । तयाविण मज आवड । नाही कोणता पोवाड । माझा भक्त मज वरपड । कायावाचा मनेसी । माझे विश्रातिचे स्थान । माझे भक्त सुखनिधान कायावाचा मन । मी विकिलो तयासी । ते हे भक्त परियेसी उद्धवा सांगे हृषीकेशी । एकाजनार्दनी सर्वांसी । तेचि वदतसे ।।१०३६।।

**ऐकोनी कृष्णाचे बोलणे** । उद्धव संतोषला तेणे । ह्मणे कृपा करुनी मज दाखविणे । भक्तांचे मंदीर । मग धरुनी उद्धवाचा हात । स्वये दावी श्रीकृष्णनाथ । आणिकांसी नोहे ते प्राप्त । हरिभक्ताविण । देवे देवधर उघडिले । सन्मुख उद्धवा बैसविले । देव सांगतसे वहिले । तया उद्धवाप्रति । एकाजनार्दनी प्रेम । भक्ताचे ऐकता नाम । प्राणी होती निष्काम । अहर्निशी जपता ।।३०३७।।

**मुख्य आदिनाथ प्रणवाचे बिज** । पार्वतिते बीज उपदेशिले । सनकसनंदन अत्रि कपिलमुनी । नारादादी शिरोमणी नारादादी शिरोमणी भक्तराज । व्यास आणि वसिष्ठ वाल्मिकादिक ।

धृव प्रल्हाद देख शिरोमणी । एकाजनार्दनी भक्ताचे महिमान । स्वये नारायण वाढवित ।।३०३८।।

**उद्धव अक्रूर गोपाळ सवंगडे** । हनुमतादीक बागडे भक्त देखा । गुहक बिभीषण नळ नीळ देखा । ऐशी भक्तमालिका शोभतसे । एकाजनार्दनी घेता त्याचे नाम । सर्व हरती कामक्रोधादिक ।।३०३९।।

**गोपाळ गौळणी शोभती त्या मूर्ति** । ते सुख परीक्षिती संतजन । ऐसे अपरंपार भक्त ते असती । स्वयेची श्रीपती दावितसे । एकाजनार्दनी भक्ताचा तो मेळ । दावीत सकळ वैभव हरिभक्ता ।।३०४०।।

**पुढे कलीमाजी होणार जे भक्त** । ते मूर्तिमंत उद्धव पाहे । पाहता पाहता समाधि उन्मनी । गेलासे बुडोनी सुखामाजी । एकाजनार्दनी नाठवेचि काही । देहीचां विदेही होऊनी ठेलो ।।३०४१।।

**व्दारकेहुनी धावणे** । केले पुंडलिकाकारणे । ऐसा कृपाळु उदार । उभा विटे श्यामसुंदर । न बोले ह्मणोनी पाहे पुढे । चित्त ठेविले तिकडे । एका ह्मणे जनार्दनी । धन्य पुंडलीक मुनी ।।३०४२।।

**नाना अवतार घेशी भक्तासाठी** । कृपाळु जगजेठी ह्मणोनिया । मत्स्य कूर्मरूप धरुनिया देवा । साधिले केशवा भक्तकाज । एकाजनार्दनी भक्ताचा कैवारी । गाती वेद चारी तुम्हालागी ।।३०४३।।

**उतारावया धरा भार** । घेतिला अवतार इही जगी । ते हे बळिये रामकृष्ण केले कंदन दैत्यासी । केला जो जो कीर्तिघोष । उच्चारिता निर्दोष होती प्राणी । एकाजनार्दनी कृपाळु । भक्त स्नेहाळू समर्थ ते ।।३०४४।।

**उतारवया धरा भार** । धरी अवतार कृपाळु । पाळीतसे भक्तलळा । नोहे वेगळा वेगळीक । जया आवडे जे काही । देता न ह्मणे थोडे काही । पुरवी इच्छा जैसी आहे । मच्छ कच्छ तयासाठी होय । ऐसा कृपेचा कोवळा । एकाजनार्दनी पाहू डोळा ।।३०४५।।

# अव्दैत

**नोहे ब्रह्मज्ञान लेकुरांचा खेळ** । अवघाचि कोल्हाळ आशाबद्ध । वाढवुनी जटा ह्मणती ब्रह्मज्ञानी । परी पतना लागुनी न चुकेचि । लावुनी विभुती बांधुनिया मठां । ब्रह्ज्ञान

चेष्टा दविताती । माळा आणि मुद्रा लेवुनिया सांग । ब्रह्मज्ञान सोंग दाविताती । एकाजनार्दनी संत सेवेवीण खुण न कळेचि ।।१०४६।।

**अष्टांग साधन धूम्रपान अटी** । ब्रह्मज्ञानासाठी करिताती । परी ते न लभे न लभे सर्वथा । वाउग्याची कथा बोलताती । शाब्दिकांचा शब्द कुंठित ते ठाई । वाउगे काही बाही बोलू नये । एकाजनार्दनी संतकृपा होता । ब्रह्मज्ञान तत्वता घर रिघे ।।१०४७।।

**ब्रह्मज्ञानालागी ब्रह्मादिक पिसे** । ते तुम्हा आह्मा कैसे आकळेल । प्रत्यक्ष परब्रह्म श्रीरामचंद्र । वसिष्ठ मुनींद्र गुरु त्याचा । कृष्ण बळीराम संदीपना शरण । तेणे गुह्य ज्ञान कथियेले । प्रत्यक्ष वामाकी असोनी पार्वती । वेळोवेळा विनंती करीतसे । सुलभ नव्हे देवा सुलभ नव्हे जीवा । सुलभ गौरवा न कळेचि । एकाजनार्दनी श्रीगुरुवाचून । ब्रह्मज्ञान खूण न कळेचि ।।१०४८।।

**ब्रह्मज्ञानासाठी वेदशास्त्र पुराण** । करिता श्रवण नातुखेची । नातुडेचि कदा गीता भागवती । वाचिता हो पोथी जन्मवरी । व्दारका पट्टन क्षेत्र वाराणसी । करिता तीर्थाटनासी प्राप्त नोहे । ज्यासी पुनरावृत्ती स्थिर नोहे बोध । अखंडीत भेद मनामाजी । ज्याचे जन्मांतर सरुनिया जाये । तेथे स्थिर होय गुरुबोध । एकाजनार्दनी ऐसा जो का पुरुष । कोटीमाजी एक ब्रह्मज्ञानी ।।१०४९।।

**ब्रह्मज्ञान वाचे सांगता नये** । जै कृपा होये श्रीगुरूची । लाभेल लाभेल ब्रह्मज्ञान क्षणी । वाउगी काहाणी बोलूनी काय । ह्रदयीच बोध ठसता अंतरी । कामक्रोध वैरी पळताती । तैसे ब्रह्मज्ञान कळलिया वरी । सर्वभावे वैखरी गुण वानी । एकाजनार्दनी वंदू गुरुपाय । आणीक उपाय नाही नाही ।।१०५०।।

**ब्रह्मज्ञानाची कसवटी** । अनुभव नाही पोटी । बोलाची चावटी । वाउगी बापा । शुद्ध ब्रह्मज्ञान । एक आत्मा भूतमात्री प्रमाण । विनोदे छळण । कवणाचे न करी । जीव शिवा नाही भेद । अवघा नित्य परमानंद । आनंदाचा कंद । तोचि ब्रह्मज्ञानी । एकाजनार्दनी वर्म । भाविकांसी सुधर्म । अभाविकासी भ्रम । जाणिवेचा ।।१०५१।।

**ब्रह्मज्ञानासाठी** । हिंडताती पाठोपाठी ।नोहे नोहे बा फुकाचे । बोल बोलता नये साचे । ऐसे आहे तैसे आहे । वाउगा तो ब्रह्म पाहे । जनार्दन कृपा पुर्ण । तैचि कळे ब्रह्मज्ञान । एकाजनार्दनी शरण । चालून येईल ब्रह्मज्ञान ।।१०५२।।

**वाउगे ते बोल बोलती चावटी** । ब्रह्मज्ञान कसवटी अंगी नाही । संसारी असोनी अलिप्त नलिनी । तैसा ब्रह्मज्ञानी विरक्त तो । आकाश मंडळी रवि तो भ्रमला । परि रांझणी बिंबला नाथिलाचि । एकाजनार्दनी प्रसादावाचुनी । ब्रह्मज्ञान मनी न ठसे कधी ।।१०५३।।

**अनुतापाविण** । नोहे कदा ब्रह्मज्ञान । हे तो मागील रहाटी । अनुताप घ्यावा पोटी । अनुतापावाचून । कवण तरलासे जाण । नाही नाही ब्रह्मज्ञान । एकाजनार्दनी अनुताप । होता निवारे त्रिविधताप ।।१०५४।।

**निर्गुण निर्विकार** । तोचि जगी पै ईश्वर । नित्य निर्विकल्प देख । सदा वाहे समाधी सुख । ऐसे ब्रह्मज्ञान जोडे । तै गुरुकृपा तेथे घडे । कापूर घातलीया जळी । स्वये नुरेची परीमळी । एकपणे तो एकला । एकाजनार्दनी देखिला ।।१०५५।।

**वर्म जाणे तो विरळा** । तयासी लक्षणे पै सोळा । देही देव पाहे डोळा । तोचि ब्रह्मज्ञानी । जन निंदो अथवा वंदो । जया नाही भेदाभेद । विधि निषेधाचे शब्द । अंगी न बाणती । कार्य कारण कर्तव्यता । हे पिसे नाही सर्वथा । उन्मनी समाधी अवस्था । न मोडे जयाची । कर्म अकर्माचा ताठा । न बाणेची अंगी वोखटा । वाउगा त्या चेष्टा । करीना काही । शरण एकाजनार्दनी । तोचि एक ब्रह्मज्ञानी । तयाचे दरशनी । प्राणीयासी उद्धार ।।१०५६।।

**जप तप निष्ठा नेम** । ऐसा साधिला दुर्गम । तरी ब्रह्मज्ञान नये हाता । क्रोध भरे अधिक चिंता । ब्रह्मज्ञानाची प्रोढी । न घडेचि अर्थ घडी । एकाजनार्दन शरण । कोठे नाही दुजेपण ।।१०५७।।

**निरपेक्ष निर्व्दव्द तोचि ब्रह्मज्ञानी** । नायकेचि कानी परापवाद । सर्वदा सबाह्य अंतरी शुचित्व । न देखे न दावी महत्व जगी वाया । एकाजनार्दनी पुर्णपणे घाला । शेजेचा मुराला रसी उतरे ।।१०५८।।

**येणेचि आश्रमे साधती साधने** । तुटती बंधने यमपाश । काया क्लेश न करणे व्रत तप दान । न लगे हवन तीर्थाटन । संतांचा सांगात गावे रामनाम । सुखे सुख विश्राम लाभे तुजसी । प्रपंच परमार्थ ऐक्यरूपे दोन्ही । तोचि ब्रह्मज्ञानी मनी समजा । व्यापक तो जगी व्यापुनी निराळा । एकाजनार्दनी वेगळा सुख दु:खा ।।१०५९।।

**भाव अभावना निमाली अंतरी** । वाया हावभरी नाही मन । कामक्रोध ज्याचे दामोनिया गेले । इंद्रिये समरसली ऐके ठायी । एकपणे सर्व होऊनिया मेळा । रतले गोपाळाचरणी मन । तोचि ब्रह्मज्ञानी जगामाजी धन्य । एकाजनार्दनी चरण वंदी ।।१०६०।।

**भक्तीचे उदरी जन्मले ज्ञान** । भक्तीने ज्ञानासी दिधले महिमान । भक्ति ते मूळ ज्ञान ते फळ । वैराग्य केवळ तेथीचे फुल । फुल फळ दोनी येरझारा पाठी । ज्ञान वैराग्य केवळ तेथीचे फुल । फूल फळ दोनी येरझार पाठी । ज्ञान वैराग्य तेवि भक्तिचे पोटी । भक्तिविण ज्ञान तेथे नाही पतन । भक्ति माता तया करीतसे जतन । शुद्धभाव तेथे तिष्ठे देव । ज्ञानासी तो ठाव सुख वस्तीसी । शुद्ध भाव तेथे भक्तियुक्त ज्ञान । तयाचेनी अंगे समाधी समाधान । एकाजनार्दनी शुद्ध भक्ति क्रिया । ब्रह्मज्ञान त्याच्या लागतसे पाया ।।१०६१।।

**नित्य काळ जेथे नामाचा घोष** । जेथे जगन्निवास लक्ष्मीसहित । ब्रह्मज्ञान तेथे लोळते अंगणी । सेवुनी पायवणी घरी राहे । विष्णुदास तयाकडे न पहती फुका । नाम मुखी देखा रामकृष्ण । एकाजनार्दन ऐसा ज्याचा नेम । तया घरी पुरुषोत्तम सदा वसे ।।१०६२।।

**विष्णुदासा घरी ब्रह्मज्ञान लोळे** । म्हणतसे बळे घ्या घ्या कोणी । आरूपे सावडे नाम मुखी जया । ब्रह्मज्ञान तया विनवीतसे । माझा अंगिकार करा संतजन । ऐसे ब्रह्मज्ञान कवि भाकी । एकाजनार्दनी संतांचे चरणी । होऊनी दीन वदनी कीव भाकी ।।१०६३।।

**अर्थ तो विवाद ज्ञान ते उपाधी** । आम्हा उघड समाधी नाममात्रे । हेचि निरुपण उद्धवा श्रीकृष्ण । सांगतसे खुण जीवीची ते । स्तुति अथवा निंदा पर स्त्री परधन । तेथे कदा मन घालू नये । एकाजनार्दनी हेचि ब्रह्मज्ञान । यापरते साधन आन नाही ।।१०६४।।

**असोनी कुळीचा हीन** । परी ज्यासी ब्रह्मज्ञान । त्यासी तिन्ही देवादी सुरगण । वंदिताती । त्याची मृत्युलोकी सेवा । जयासी घडे सदैवा । मा ब्राह्मण भूदेवा । असंख्य पुण्य जोडे । तयासी वस्त्र अन्न । जठर करिती तृण जाण । त्यासी वैकुंठादि आदण । देव देतो । त्यासी जो करी शीतळ । त्यासी पुण्य जोडे सकळ । एकाजनार्दनी केवळ । तोचि साधु ।।३०६५।।

**बहु पुण्य होय गांठी** । तेच ऐशियाची भेटी । तयाचीये कृपा दृष्टी । सहज ब्रह्म लाभे मनुष्या । देहि असोनी विदेही । करुनी कर्मं अकर्ते पाही । विषम्याची नाही । वाटाघाटी तयासी । देही कष्ट किंवा सुख । शीत उष्ण समान देख । वाउगाची शोक । नाही जया मानसी । तोचि जाणा ब्रह्मज्ञानी । वाया न बोले बोलोनी मौनी । लक्ष्मी सदा परध्यानी । एकाजनार्दनी तो धन्य ।।३०६६।।

**ऐसे हे वचन ऐकोन** । श्रोती केलासे प्रश्न्न । कैसे अपरोक्ष ज्ञान । सांगा मज । हा शब्द आलोलिक । श्रवणी झाले सुख । मग जनार्दनाचा रंक । बोलता झाला । पंचभूते तिन्ही गुण । स्थूल सूक्ष्म कारण । हे अपरोक्ष अज्ञान । पंचीकरण । यासी जो जाणता । साक्षित्वे

देखता । तोचि अपरोक्ष ज्ञाता । जाणावा पै । सोहमाचा साक्षात्कार । एकाजनार्दनी निवडोनि साचार । वस्तूचे घर दाखवील ।।३०६७।।

**सद्‌गुरू तोचि जाण** । जो अपरोक्ष सांगे ज्ञान । देहत्रय निरसून । परमपदी ठेवी । जेणे देहत्रय निरसिले । ज्ञान अग्नीमाजी जाळिले । अच्युतपद प्राप्त केले । त्यासी वेळ नाही । निराकार निरामय । निर्भय ते अव्दय । तयामाजी लिंगदेह । मारुनिया गेले । एकाजनार्दनी प्राप्ति । जै लिंगदेहाची होय शांति । मग सायुज्यमुक्ति । पाया लागे ।।३०६८।।

**ब्रह्मज्ञानाचा क्षण** । विचारी ज्याचे मन । त्याची महत्पापे जळोन । गेली स्वये । गंगादी सप्तसागर । पुष्करादि तीर्थे अपार । व्रतादि पवित्र । पर्वकाळ जे । वेदशास्त्र पुराण । त्यासी घडले श्रवण । अश्र्वमेधादिक यज्ञ । केले जेणे । मेरू समान सुवर्णी । अनर्ध्य रत्न मेळवोनी । भरुनी दिधली मेदिनी । ब्राह्मणासी । कामधेनुच्या थाटी । कल्पतरू कोटयान कोटी । कौस्तुभादी सृष्टी । दिधली तेणे । अमृतासमान । तेणे दिधले अन्न ।  त्रैलोकीचे ब्राह्मण । तृप्त केले । सत्य कैलास वैकुंठ । सप्त पाताळादि श्रेष्ठ । गरुडादि वरिष्ठ । दिधली वहने । ऐसे एक क्षण प्राप्त । ज्याचे सोहं ध्यानी चित्त । तयासी सुकृत । इतुके जोडे । जो अहोरात्र मनी । ब्रह्मज्ञान चिंतनी । एकाजनार्दनी । तोचि वंदा ।।३०६९।।

**तरी सोहं नव्हे याग** । सोहं नव्हे त्याग । आणि अष्टांग योग । सोहं नव्हे दान । सोहं नव्हे तीर्थ । मंत्रादि दीक्षित । सोहं नोहे । सोहं नव्हे वारा । पंचभूतांचा पसारा । सोहंच्या विचारा । साधु जाणती । एकाजनार्दने । आपण आपणासी जाणणे । साक्षित्व देखणे । तेचि सोहं ।।।३०७०।।

**सोहं नव्हे नाद** । कर्णव्दयाचा भेद । लक्ष्य भूमध्य । नव्हे सोहं । चावदा चक्रे बावन्न मात्रा । अकार उकार मकारा । यासी जाणे अर्धमात्रा । तेचि सोहं । अधिष्ठानी सहाशे जप । स्वाधिष्ठानी सहाशे जप । तितुके वोळखा नि:शेष । मणीपुरी । अनुहाती सहस्त्र । विशुद्ध अग्नी चक्र सहस्त्र । तीन ठायी तीन सहस्त्र जप होय । एकविस सहस्त्र साशत । हे अवघेची मारुत । त्यासी सोहं ह्मणत । ते नाडिले । एकाजनार्दन । सोहं नोहे पवन । पवनाचे वर्तन । सोहं सत्ता ।।३०७१।।

**सोहं नव्हे प्रपंच ज्ञान** । अंतःकरण चतुष्टय योजन । इंद्रियांचे वर्तन । नव्हे सोहं । सोहं नव्हे विषयपंचक । सोहं नव्हे त्रैशोधक । सोहमाचा विवेक । विरळाचि जाणे । सकार जाण माया । हंकार पुरुष शिष्यमय । शबल शुद्ध इये । जाणावे पैगा । ब्रह्मा विष्णु महेश्र्वर । हा शबल पै साकार । शुद्ध तो हंकार तो महाकारण । ज्ञानरूप । एकाजनार्दनी तुर्या । सोहं ते दैवी माया । साक्षित्वे जाण असे श्रोतिया । सांगितले ।।३०७२।।

अभ्यासी द्रष्टा आटला । अहं सोहंचा घोट भरला । साक्षित्व देखोनि विराला । वस्तुमाजी । जो जो वस्तु झाला केवळ । तेचि अंतःकरण निश्र्चळ । त्रिगुणाची तळमळ । हारपोनि गेली । हारपले ब्रह्मांड । हारपले पिंड अंड । वस्तु झाला अखंड । त्यासी खंड नाही । एकाजनार्दनी जाण । व्दैत गेले मावळोन । मग वस्तूचि परिपूर्ण । भरली असे ।।३०७३।।

या देहा अमंगळा । पासूनी आत्मा वेगळा । ऐसा ज्ञानाचा डोळा । प्रत्यक्ष दिसे । ज्ञान ह्मणजे शुद्ध सत्वगुण । जेथे व्दैत प्रकृतीचे अधिष्ठान । जी पासाव सव्विस लक्षणे । बोलिले षोडशाध्यायी । ते दैवी प्रकृतीचे घरी । परमात्मा राज्य करी । तो जयाते अंगीकारी । तो सुटला गा । या पुरुषाचे बेचाळीस कुळ । पाद पावले अढळ । आत्मतत्वी सकळ । मिळणी आली । एकाजनार्दनी तैचि भेटी । जै अहंभावाची सुटे गाठी । तो दैवी प्रकृतीचे मृकुटी । सहजचि बैसे ।।३०७४।।

**पिंडाच्या प्रळयासी सांगेन तुम्हासी** । जो का या देहासी होत आहे । पृथ्वी बोलिजे प्राणी प्राणीरंध्र । परिमळ घेउनि जाये ते घर । मग तो नेणे सुमनचा सुवास । पृथ्वी ते अंशे जीवन मिळे । रसनेसी स्वाद ते जनवृदां खाद्दय । जीवनाचा जो स्वाद तोचि मिळे । असोनिया नेत्र न देखे मन्त्र । नयना ते दीप्त पवन मिळे । नाडीचा तो त्वरित निघोनि जाय मारुत । सेविता तो कोलीत या शुद्धी नाही । कंठा खालता काळ तो धुंडीत । मेळवोनी समस्त एक करी । एकाजनार्दनी मेळा जो झाला । काळ घेउनी गेला लिंगदेहा ।।३०७५।।

**आता उरले ते मत** । तेथे वस्तु सदोदीत । त्यासी नाही अंत: । कवणे काळी । महाकारण शरीर । ज्याचा अभिमानी ईश्र्वर । मूर्ध्नी ते घर । ब्रह्मांडीचे । तेथे नाही काळ । त्यासी नाही वेळ । उत्तम स्थळ । पवित्र असे । प्रभा आणि ज्योति । रत्न आणि दीप्ती । किरण आणि गर्भस्ति । एकरूप । तैसी वस्तु आणि ईश्र्वर । एक पै प्रकार । पृथ्वी अंबर । दोन्ही एक । तैशा शरीरा ज्योति । आदिमध्य अंती । वस्तु ते तत्वार्थी । भरली असे । देह जावो अथवा । आह्मी वस्तूचि आहो । एकाजनार्दनी भावो । दृढ झालिया ।।३०७६।।

**मृत्तिका आणि अग्न** । देहासी दहन । वस्तुते व्यापून घेतली दोनी । अग्नीमाजी अग्नीरूप । मृत्तिकामाजी मृत्तिकारूप । जैसे आपी आप । मिळोनी गेले । वस्तु नाही एकदेशी ते सर्वत्र समरसी । जयाचे प्रकाशी । त्रैलोक्य वर्ते । तैसे मेले आणि जीत । हे अज्ञान भासत । ते वस्तुते नांदत । दोहीमाजी । एकाजनार्दन । विचारूनि ज्ञानी । संशयापासोनि । मुक्त झाले ।।३०७७।।

**साक्षत्वे जीत त्याचा होय अंत** । विचारे मुरत वस्तुमाजी । पिंडीचे ते दोन्ही ब्रह्मांडीचे दोन्ही । हे प्रळय पुराणी बोलीलेती । प्रळय आत्यंतिक जेथे संहारत । विवेक आपणची येत

सर्वाठाई । मग प्रचीत सहज बरवे वाईट वोज । निपजे तेथे दुजा भाव नाही । एकाजनार्दनी भला आपणचि ईश्र्वर झाला । तो भरुनी उरला साक्षत्वेसी ।।३०७८।।

**निरसुनी ज्ञान म्हणविती विज्ञान** । त्याहुनी अभिन्न स्वरूप माझे । पिंड आणि ब्रह्मांड ह्मणीजे अखंड । याहुनी उदंड स्वरूप माझे । माया आणि ममत्व शोधुनी शुद्ध सत्व । सत्वाचे निज सत्व स्वरूप माझे । सद आणि चिद ह्मणती आनंद । त्याहुनी अभेद स्वरुप माझे । एकाजनार्दनी एकपणातीत । चित्ताचे अचिंत्य स्वरूप माझे ।।३०७९।।

**नेत्रीची बाहुली वस्तुरूप झाली** । पहाता सोहं मेळी चिदानंद । अर्ध मात्रा स्थान नयनीचे निधान । मसुरेप्रमाण महावर्ण तेथे । सूषुन्मा कुंडलिनी कासीया सांगाती । नयनीच निश्र्चिती बिंदुरूप । सर्वगत डोळा ती जगामाझारी । जगाचिया हारी डोळीयामाजी । दाखवी संपूर्ण स्वामी जनार्दन । एका एकपण नाही जेथे ।।३०८०।।

**छत्तिसातील चेतना** । तोची पुरुष जाणा । हेचि निवडुनी अर्जुना । सांगितले । तेची बोध आणि तुर्या । ऐसे धनंजया । सांगितले । तेची ॐकार अर्धमात्रा । तेची महाकारण जाणा परा । एकाजनार्दनी सारा । निवाडा केला । ।।३०८१।।

**सांगता ते खूण न बिंबे पोटी** । वाया आटा आटी करुनी काय । जे गुरुचे दास पुर्ण अधिकारी । ब्रह्मज्ञान सरी तया लाभे । अभ्यास पूर्वीचा पुण्य लेश जन्माचा । तै ब्रह्मज्ञानाचा लाभ होय । एकाजनार्दनी पूर्ण कृपा होता । सहज सायुज्यता पाठी लागे ।।३०८२।।

**जगाचिये नेत्री दिसे तो संसारी** । परि तो अंतरी स्फटिक शुद्ध । वायाचि हाव न धरी काही पोटी । वाउगी ती गोष्टी न करी जगा । स्त्रिया पुत्र धन नाही तेथे मन । इष्टमित्र कारण नाही ज्याचे । एकाजनार्दनी प्रपंच परमार्थ । सारिखाचि होत तयालागी ।।३०८३।।

**अभेदाचे उत्तम गुण** । तेचि भक्ति तेचि ज्ञान । अभेद भक्ति वोडेकोडे । देवा आवडे ते गोड । अभेद भजनी सुख देवा । एकाजनार्दनी विसरे जीवा ।।३०८४।।

**अभेद भक्तांचे निजमंदिर** । ते मज निर्गुणाचे घर । निर्गुणासी घर ठावो । बोलणे हेचि दिसे वावो । सांडूनि आकाराचे ज्ञान । निराकारी सुखसंपन्न । सुखे सुखासी मिळणी । शरण एकाजनार्दनी ।।३०८५।।

**सोहमाची साक्षा मन्त्र तोचि दिक्षा** । तयाची परिक्षा सांगा मज । सोहमाचे ज्ञान निवडोनिया खूण । अनुभव मज जाण करावा जी । ऐसे श्रोते जन विनंती करून । एकाजनार्दन नमस्कारिला ।।३०८६।।

**देखो तितके आहे ब्रह्म** । वाया साडी की भवभ्रम । पोटी नाही परमार्थ । धरिती स्वार्थाचा अर्थ । अर्थ नाही जयापाशी । अनर्थ स्पर्शेना तयासी । अर्थापाशी असत्य जाण । एकाजनार्दनी शरण ।।३०८७।।

**ब्रह्मी नाही भवभ्रांती** । ब्रह्मी नाही दिवसराती । ब्रह्मी नाही रूपवर्ण । ब्रह्मी नाही काळ करण । ब्रह्मी नाही ध्येय ध्यान । ब्रह्मी नाही ज्ञेय ज्ञान । ब्रह्मी नाही मातापिता । ब्रह्मी नाही देव देवता । ब्रह्मी नाही वर्णाश्रम । ब्रह्मी नाही क्रियाकर्म । सर्व देही ब्रह्म आहे । एकाजनार्दनी ते पाहे ।।३०८८।।

**ब्रह्म निर्गुण निराकार** । ब्रह्म सगुण साकार । ब्रह्मरूप चराचर । सच्चिद्घन शुद्ध हे । ब्रह्म अचिंत्य अव्यक्त । ब्रह्म अच्छेद्दय सदोदित । ब्रह्म परात्पर पूर्ण भरित । समरस जाणिजे । एकाजनार्दनी ब्रह्म । प्राप्तीलागी हेचि वर्म । सदगुरुचे पादपद्म दृढ भावे धरावे ।।३०८९।।

**निरालंब सहज माय पहाता कैसे** । सबाह्य अभ्यंतर व्यापुनी पूर्ण अखंड दिसे । लक्षी वो अलक्ष पाहता देहि देह न दिसे । निर्गुण गुणासी आले अवघे ब्रह्मचि दिसे । ऐसा हा व्यापकु हरि आहे सर्वाठाई । ज्ञानाजन लेउनी पाहे देहीच्या देही । पिंड ब्रह्मांड व्यापुनी अतित कैसा । आदि अंत ज्याच्या न कळे श्रुति मुरडल्या कैशा । नेति नेति शब्द बोलती हरी अगाध ऐसा । म्हणयोनि गुरुमुखे दृढ विश्र्वास धरी ऐसा । प्रसिद्ध आत्मा देखोनि विराले मन । मनचि उन्मन जाले तेथे कैचे ज्ञान । ज्ञान ध्यान हेही न कळे अवघा जनार्दन । एकाजनार्दनी शरण कायावाचामने जाण ।।३०९०।।

**वेद वेद ब्रह्म एक** । स्वानुभवे तैसेच देख । हा वेदाचा गौरव । कोण घेतो अनुभव । वेद ब्रह्मस्थिती । कोण प्रतिपाय करिती । वेदी ब्रह्माचे ब्रह्मपण । शरण एकाजनार्दन ।।३०९१।।

**वेदवचने सुतक पावे** । ब्रह्म म्हणता ब्रह्म नव्हे । वेद न कळेची साचार । देहबुद्धि अविचार । सकळ ब्रह्म पै अव्दैत । वेद परिसोनी ना तुटे व्दैत । श्रुति सांगती परमार्था । हिंसा न करावी सर्वथा । संकल्प नाशी तो संन्यासी । तेथे तो कल्पना कायसी । वेद बोले सर्वाठाई । एकावाचुनी दुजे नाही । एकाजनार्दनी बोधु । नाही तव न कळे वेदू ।।३०९२।।

नाही नामरूप गुण कर्म । पहाता अवघे परब्रह्म ।  पिंडी आणि ब्रह्मांडी । भरला असे नवखंडी । रिता नाही कोठे ठाव । जिकडे पाहे तिकडे देव । एकाजनार्दनी भाव । अवघा माझा गुरुराव ।।३०९३।।

**मी ब्रह्म जाहलो म्हणे अंतरी ब्रह्म नव्हे ऐसे काही** । ब्रह्माविण अनु न दिसे कोठे तितुके ब्रह्म पाही । होय नाही ऐसा संशयचि नाही निश्र्चयेसी तेचि आहे । आहे तेचि ब्रह्म नाही तेचि ब्रह्म अवघेचि ब्रह्म पाहे । वर्णाश्रम धर्म साचार मानुनी यथाविधि आचरती । स्वमताचा देही अभिमान धरुनी पृथक पृथक वाद करिती । पाषांडाच्या बळे होताती तोंडागळे भेदे साच हे आम्ही नाही म्हणती । सर्वदा तरी ब्रह्म आहे ऐसे न कळे तयाप्रती । जळे शीलपण वेगळे दिसे परि वेगळे नाही जाण । तैसे आदिमध्य अंती ब्रह्मचि असे तेथे कैचे न्यून पूर्ण । कर्ता कार्य कर्म अभिन्न तेथे बद्ध आणि मुक्त कवण । एकाजनार्दनी ऐक्यपणे मुळीच नाही भिन्न ।।३०९४।।

**ज्या सुखासी नाही अंत** । ते सुख पाहे हृदयात । सुख सुखाची मिळणी करुनी । घेई आपुले मनी । सुखे सुखा अनुभव । हाचि ब्रह्मविद्द्येचा भाव । सुखे सुखाची मांडणी । शरण एकाजनार्दनी ।।३०९५।।

**ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शुद्र वर्ण चारी** । हे स्थान मान निर्धारी तो मी । ब्रह्मचारी गृहस्थ संन्यासी वानप्रस्थ । आश्रम धर्म समस्त नव्हे मी । बावन मात्रा चौदा चक्रे सहा शत एकविस हजार । स्थान मन पवित्र नाही मज । स्थूळ सूक्ष्म कारण महाकारण ज्ञान । चहू मुद्रेचे ध्यानी नाही गा मी । या सकळाते जाणता विरळा पै पहाता । एकाजनार्दनी तत्वता निजबोध तो मी ।।३०९६।।

**ज्यासी आत्मलाभ झाला** ।  त्याचा देह प्रारब्धे वर्तला । कायावाचामने आपुला । व्यापार करताती । हाते हाणितले तोंडावरी । तेथे इंद्र अग्नि झुंझारी । पै शून्य बोले परस्परी । अग्नीसी इंद्र । हात नमस्कारी चरण । तेथे सुसरी ते झाले इंद्रियमन । हाता त्वचेसी केले मर्दन । तो वामन वायु । शिश्र्न मुखामाजी मुतती । तेथे भांडती वरुण प्रजापति । तेथे नैॠत्य वसती । अश्र्विनी देवो । की मुखी गालीप्रदान । ते ऐको पै श्रवण । तेथे दिशा आणि अग्न । भांडती पै । की तापले नेत्रीचे पाती । तेजे सूर्यासुर्य भांडती । ऐसे इंद्रिये वर्तती । आपापुले परी । ऐसा विवेक ज्यासी कळला । त्याचा कामक्रोध भस्म झाला । तेणे शांतीचा रोविला । धव्ज स्तंभु । त्याचा विवेक करुनी । तो वर्ते जनी वनी । परि आत्मसुखाचा धनी । झाला तोचि एक । एकाजनार्दने ना विवेके । राज्य केले भीष्मे जनके । भिक्षुका आत्मसुखे । पावले तेणे ।।३०९७।।

**भगवद्भावो सर्वाभूती** । हेचि ज्ञान हेचि भक्ति । विवेक विरक्ती । याचि नावे । हे सांडोनि विषयध्यान । तेचि मुख्यत्वे अज्ञान । जीवाजीवा बंधन । येणेचि द्दढ । आठव तो परब्रह्म । नाठव तो भवभ्रम । दोहीचे निजधर्म । जाण बापा । आठव विसर चित्ती । जेणे जाणीजेती । तेचि एक निश्र्चिती । निजरूप । स्मरण तेचि निजमुक्ति । विस्मरण तेचि अधोगती । ऐसे पुराणे गर्जती । बाह्या उभारुनी । एकाजनार्दनी । सहज निजबोधनी । सबाह्यभ्यंतरी । पूर्ण परमानंद ।।३०९८।।

**लोह तांबे सोने** । रूपे माती पाषाण । टवाळी भिन्न भिन्न । निर्मित होती । वाती स्नेह भरती । पदार्थ वेगळे दिसती । परि तयामाजी ज्योती । असे एकरूप । तैसे अठरा वर्ण । अंत्यजादि ब्राह्मण । मेरू मशक धरून । भरले जीव । यांचे शरीर भिन्न । आत्मा एक परिपूर्ण । नामरूप जाती वर्ण । नाही तेथे । आत्मा स्वयंप्रकाश ज्योती । जे ज्योति ती तूर्या म्हणती । ती तुर्या ज्ञान शक्ति । ईश्वराची असे । एकाजनार्दनी शरण । उजळले आत्मज्ञान । पदार्थ जाती जळून । क्षणमात्रे ।।३०९९।।

**ऐसी मी मी करता** । अज्ञानाची अहंता । तेव्हा तैसी ईश्र्वरसत्ता । वर्तू लागे । सज्ञान अज्ञान । दोघे अद्दष्टाधीन देह । त्यात ज्ञान मुरुनी जाय । मग द्रष्टा होऊनी पाहे । जग ब्रह्मरूप । तेथे निंदा आणि स्तवन । हरपले दोष गुण । ऐसे एकाजनार्दन । सांगतसे ।।३१००।।

**शाब्दिक शब्दाचा करिती कंटाळा** । व्देषांचा उमाळा अंगी वसे । शब्द ब्रह्मज्ञाने फुगविती अंग । वाउगाची सोंग गर्व वाहाती । सर्वा भूतमात्री शब्द तो संचला । न कळे तयाला शब्द भेद । एकाजनार्दनी शब्दाचा भेद । न कळे प्रसिद्ध ज्ञानीयासी ।।३१०१।।

**ज्ञानाभिमान विश्र्वामित्रा** । रंगे मागे जाला कुत्रा । ज्ञानाभिमान दुर्वासासी । ह्मणोनी शापी अंबऋषी । ज्ञानाभिमान ब्रह्मीयासी । ह्मणोनी चोरिले गाईवत्सांसी । ज्ञानाभिमान नको देवा । एकाजनार्दनी देई सेवा ।।३१०२।।

**नग घडता सोने साचे** । न घडता सोनेपण न वचे । मेघापूर्वी शुद्ध गगन । मेघ सबाह्य गगनी जाण । कुल्लाळ जे भांडे घडीत । त्यासी मृत्तिका नित्य व्याप्त । सागरी ज जे उपजे लहरी । तैसा व्यापक श्रीहरी । जन तोचि जनार्दन । एकाजनार्दनी व्यापक पूर्ण ।।३१०३।।

**जैसी फाशीची गति पडे** । तैसा सोंगटी डाव पडे । त्याचे कर्तुत्व वाडे । फाशाधीन । झाला देखणा परी । उगला वर्तू लागे शरीरी । तैसी शक्ति ईश्र्वरी । भूते चळती । अद्दश्य गतीने

वर्तती । तेथे ईश्र्वराची शबल शक्ति । तेथे आणिकांची मति काही न चाले । यालागी प्राचीनाधीन । ब्रह्माविष्णु रुद्र पूर्ण । यांचे कार्यभूत जाण । सृष्ट्यादिक । एकाजनार्दनी जाण । बाधक अदृश्य शक्ति जाण । जैसे ज्याचे प्राचीन । तैसे ते वर्तती ।।३१०४।।

**हेचि वेदोक्ति निजसार** । आत्मा अविनाश साचार । नाही जन्ममरणाचा धाक । बोले शुद्ध बुद्ध ऐसा वेद । श्रुतिशास्त्र तेहि वदती । आत्मा अविनाश म्हणती । एकाजनार्दनी नाही मरण । मग कैचे देहीचे स्फुरण ।।३१०५।।

**सागरीची लहरी** । मी एक म्हणे सागरी । तैसा तुझा तूची तुजवरी । एकदेशी । शुद्ध आणि शबल । तूचि एक सकळ । औटहात केवळ । ते तव कल्पना तुझी । डोळे झाकून किती पहासी आतौते । बाहेर न करी ते वोस पाडू । सबाह्य संमतु असता वोडेकोडे । एक देशी थोडे कल्पनेसाठी । लेकुराचे खेळणी । दिवसा ह्मणती जाली रजनी । उठवी लटिके निजोनी । आता उदयो जाला । तेथे अखंड प्रकाश पाहो । उदयो अस्त दोन्ही वावो । तैसा भावो आणि अभावो । एकाजनार्दन चरणी ।।३१०६।।

**मी तू ऐसी परी** । जैसे तरंग सागरी । दोहीमाजी एक जाणा । कृष्ण व्दारावती राणा । तंतु वस्त्र दोनी एक । तैसे जगासी व्यापक । देवभक्त ऐसी बोली । भ्रांती निरसे नाशी जाली । सरिता सागरी मिनल्या । तैसे होय भ्रांती गेल्या । एकाजनार्दनी कृपा । भ्रांति कैसी जगी पहा पा ।।३१०७।।

**जागृती स्वप्न सुषुप्ती** । तिही अवस्थाते प्रकाशिती । जे जागृतीते जागले । तेचि स्वप्नाते चेइले । क्षणे जागृती क्षणे सूषुप्ति । क्षणे एक स्वप्नाचि प्रतिती । सर्व दिसे तितुके मिथ्याभूत । एकाजनार्दनी शाश्र्वत ।।३१०८।।

**देही कैचे सुख कैचे दु:ख** । कैचा बंध कैचा मोक्ष । देही कोण देव कोण भक्त । कोण शांत कोण अशांत । देही कैची क्रिया कैचे कर्म । देही विराले धर्माधर्म । देही कैचे शास्त्र कैचा वेद । कैची बुद्धि कैचा बोध । एकाजनार्दनी देह । ब्रह्मी ब्रह्म होत आहे ।।३१०९।।

**अहारे अभाग्या काय केले** । फुकट नरदेह गमाविले । भजे भजे रामकृष्ण वासुदेवा । वाउगा सांडोनी देई हेवा । मूळ संकल्प तोडोनिया टाकी । अहंकार ममता वासना उपाधि शेखी । एकाजनार्दनी टाकुनी परता होय । वाचे सदा गाय वासुदेव ।।३११०।।

**प्रपंचाचे भान** । आहे मृगजळासमान । नाथिलेचि सत्य दिसे । सत्य आहे ते आभासे । मृगजळी । मृगजळी उत्पत्ती नाही । पाहता अवघे मिथ्या पाही । एकाजनार्दनी शरण । मिथ्या अवघे देह जाण ।।३१११।।

**स्वप्नी दिसे स्वयेची नासे** । तैसे काल्पनिक जग भासे । मुळीच मिथ्या मृगजळ । त्यामाजी नसे शीतळ जळ । पिंपळावरूनी मार्गु आहे । ऐकोनी वृक्षा वेधो जाये । ऐसे अभागी पामर । न कळे तयासी विचार । ह्मणोनी शरण जनार्दनी । एकाजनार्दनी एकपणी ।।३११२।।

**मृगजळाचे डोही नि:शेष जळ नाही** । यापरी माया समूळ मिथ्या पाही । माया नाही माया नाही । जगचि ब्रह्मरूप पाही । दोराचे सर्पत्व जिताची मेले । मायेची बद्धता तुजचि तुझेनी बोले । एकाजनार्दनी पाहता चैतन्यधन । बद्धता मुक्तता समूळ मिथ्या जाण ।।३११३।।

**मृगजळ जेथे नसे** । तेथे वसे कोरडे । ऐसा घ्यावा अनुभव । पदोपदी भाव जिवासी । जे दिसे ते नासे । ऐसे असे सर्वत्र । यापरी जाणावे मिथ्यापण । शरण एकाजनार्दन ।।३११४।।

**मृगजळी पहाता दिसतसे जळ** । परि ते कोरडेची केवळ । तेवी दिसे जगदाभास । अवघा मिथ्या साभिलाष । जेथे मिथ्या व्दैत भाविक । पाहता जनार्दनाची एक । तरंग हरपले पाणी । शरण एकाजनार्दनी ।।३११५।।

**दोरा अंगी जसा नसता सर्प दिसे** । मिथ्या देह तैसा वस्तुवरी आभासे । देह मी नव्हे मी नव्हे । देह मी नव्हे माझेनी अनुभवे । घटी वर्तुळ आकाश परि ते महदकाश । विकारवंत देहचैतन्य विलास । एकाजनार्दनी दो नावी एक । देह झाला मेला समूळ मिथ्या देख ।।३११६।।

**आकाशापासोनी वायु झाला** । तो गगनावेगळा नाही गेला । अग्नीपासुनी जळाचा अंशु । जळापासुनी पृथ्वीप्रकाशु । तैसे कार्य आणि कारण । परस्परे अभिन्न जाण । जेवी तंतु आणि पटू । दोन्ही दिसती एकवटु । साखरेचे नारळ केले । परि साखरत्वा नाही मुकले । जेवी का पृथ्वी मृत्तिका । मृत्तिकेचे भांडे देखा । ऐसे कार्य कारण विशेष । एकाजनार्दन निजदारा ।।३११७।।

**वांझेचीया बाळा बागुले ग्रासिले** । तैसे मिथ्या देह कळीकाळे ग्रासिले । नेणा नवलावो जाणा ब्रह्म भावो । देहिचा संभव समूळ मिथ्या । जळगार पाषाण ते जैसे जीवन । साकार देह तैसा ब्रह्मार्पण । एकाजनार्दन एकत्व पाही । देह विदेह दोन्ही समूळ तेथे नाही ।।३११८।।

**अष्टही दिशा पूर्ण भरला देव** । मा पूर्व पश्र्चिम भाव तेथे कैचा । पाहे तिकडे देव व्यापुनी भरला । रिता ठाव उरला कोठे नाही । समाधि समाधान मनाचे उन्मन । मी देवा भिन्नपण नाही नाही । एकाजनार्दनी एकपणासाठी । देव पाठी पोटी भक्तामागे ।।३११९।।

**अष्टदिशी व्यापक नारायण** । तेथे नाही पूर्व पश्र्चिमेचे भान । पहा कर्माची राहाटी उफराटी । सर्व व्यापक संकल्प ह्मणती उठाउठी । एको विष्णु म्हणता भेद उरला नाही । भेदभावे पाहाती सर्वाठाई । भेदाभेद टाकुनी देई वेगे । एकाजनार्दनी शरण रिघे ।।३१२०।।

**साकार दिसे परि गोडी न दिसे** । ते काय त्या वेगळी असे । तैसा जनी आहे जनार्दन । तयाते पहावया सांडी अभिमान । कापुरा अंगी परिमळु गाढा । पाहता उघडा केवि दिसे । पाठपोट जैसे नाहीच सुवर्णा । एकाजनार्दनी यापरी जाणा ।।३१२१।।

**भजता भजन एकाजनार्दन** । ब्रह्मपरिपूर्ण सर्व एका । सांडूनि वासना भजता भजन । ब्रह्म ते संपूर्ण सर्व एक । विषयवासना त्यागिता संपूर्ण । ब्रह्म ते संपूर्ण सर्व एक । एकाजनार्दनी एकत्व भाव । तेथे नांदे देव संदेह नाही ।।३१२२।।

**जैशी देहापाशी छाया** । तैशी दिसे मिथ्या माया । आत्मा शुद्ध काया मळीन । काया जड आत्मा चिदघन । जीव अलिप्त माया गुणी । मायावेष्टन जीवालागुनी । एकाजनार्दनी शिव । सदा असे स्वयंमेव ।।३१२३।।

**ऐसा ज्याचा एक भाव** । तेथे नाही व्दैता ठाव । व्दैत अव्दैत हारपले । अवघे एकरूप जाहले । संकल्प विकल्प विराला । अवघा देही देव जाहला । एकाजनार्दनी ठाव । स्वयमेव भरला देव ।।३१२४।।

**परमात्मा एकला एक** । एकपणे तोची अनेक । तेथे जाती विजाती नाही देखा । महासुखा सुखपात्र । ह्मणे जनार्दनाचा एका । आत्मा सारिखा सर्व देही ।।३१२५।।

**आत्मा केवळ एकला एक** । तेथे सुखदु:ख कैचे । आत्मा सुखदु:खावेगळा । हे तो न कळे कळा तयाची । म्हणे जनार्दनाचा एका । आत्मा देखा सर्वघटी ।।३१२६।।

**घटामाजी घातले अमृता** । अथवा घालिजे खात मूत । घट घाई करिता चूर । आकाशासी नुमटे चीर । घट फोडोनी केला नाश । आकाश तैसेची अविनाश । तेवी देह नश्र्वर जाण । एकाजनार्दनी परिपूर्ण ।।३१२७।।

**घटामाजी जीवन घालिता** । अभ्र दिसो लागे सर्वथा । घट फुटलिया जाण । अभ्र न नासेचि पूर्ण । घटाकार देहस्थिती । जाणावी पा त्वा निश्र्चिती । एकाजनार्दन पूर्ण । सबाह्य आत्मा परिपूर्ण ।।३१२८।।

**देही असोनी देहातीत** । भूती भूतात्मा भगवंत । भिन्न खाणी भिन्नाकार । चिदात्मा हा निर्विकार । एक निश्र्चयो नाही चित्ती । एकाजनार्दनी वाया भक्ति ।।३१२९।।

**वाया वाया शिणती साधक जन** । साधन तितुके ज्ञानधन । साध्य साधन मानिता भिन्न । निजात्म पूर्ण नव्हती । साखरेवेगळी पाहता गोडी । पाहो म्हणती ते बुद्धि कुडी । साखर अवघी गोड धाकुडी । आत्म निरवडी जग तैसे । साधनी साधू आत्मयासी । ऐसे ह्मणती ते परम पिसी । आत्मा प्रकाशी साधनाशी । तो केवी त्यासी आकळे । एक ते मंत्र उपदेशिती । जपू करावा नेणो किती । जेणे होय निजात्मप्राप्ती । ते मंत्रयुक्ती । न कळे । मंत्रीमाजी अक्षर । ॐ नमः इत्यादि उच्चार । अक्षरी अक्षर चिन्मात्र । मंत्र साचार परब्रह्म । पाठका साधन वेदपठण । अक्षर उच्चार स्वर वर्ण । कोरडी वाची तोंड पाठण । नव्हे बोळवण कामक्रोधा । वेदमूळ तो ॐकार । तोचि परब्रह्म साचार । अकार उकार मकार । वेद चिन्मात्र पठणेसी । शास्त्र श्रवण साधन शुद्ध । देहाभिमाने केले विरुद्ध । युक्ति प्रयुक्तीचे बोध । अति विवाद पंडिती । शास्त्र तितुके ज्ञान संपन्न । जे जे युक्ति ते केवळ ज्ञान । शास्त्रामाजी जाणपण । तेचि ब्रम्हपूर्ण श्रवणाचे । प्रल्हादा साधन केवळ श्रीहरी । हरी सर्वांगे विघ्न निवारी । अनामा भक्त वचने करी । नर केसरी होऊन ठेला । जैसा जैसा भक्तांचा पै भावो । तैसा तैसा भाळे देवो । भावे वाचूनिया पाहो । होय अभावो देवाचा । ऐसे साध्य तेचि साधन । ज्ञेय तेचि वृत्तिज्ञान । ध्येय तेचि होय ध्यान । समाधान गुरुवाक्ये । जे जे विषयाचे गोडपण । ते ते गोडी चैतन्यधन । विषयीविषय ब्रह्मपूर्ण । इंद्रिय स्फुरण चिन्मात्र । जेथ जो ह्मणविसी अज्ञान । अज्ञाना देखणे तो ज्ञानघन । आह्मी नेणो ज्ञानाज्ञान । तो ब्रह्मपूर्ण सहजेचि । एका पाहता एकपण । जन तोचि जनार्दन । एका जनार्दना शरण । जग संपूर्ण परब्रह्म ।।३१३०।।

**चौ देहांचा पुर्णघट** । त्याचा अवघा बोभाट । माझे माझे ह्मणती वेडे । घट भरला रिता फुडे । ऐसे भांबावले देहा । दिवसा नागविले पहा । एकाजनार्दनी पुर्ण घट । एक नांदे उघड प्रकट ।।३१३१।।

**फुटलिया घट** । नसे जीवन प्रकट । घटामाजी जिवन । घट फुटता नसे जाण । घटामाजी आकाश । आकाश घटेचि न नासे । एकाजनार्दनी मिथ्या । घट विरालीया सत्या ।।३१३२।।

**व्यापक स्थापक सर्वदेशी भरला** । पहाता तो भला पंढरीये । असोनिया नसे नसोनिया असे । योगिया हृदयी वसे द्रष्टी न पडे । एकाजनार्दनी भूवैकुंठनायक । उभा असे सम्यक विटेवरी ।।११३३।।

**जेथोनी त्रिपुटीचे विदान** । द्वश्य द्रष्टा आणि दरुशन । अध्यात्म अधिभूत असता पाही । आधिदैव सुर्य जेथे नाही । अध्यात्म अधिदैव दोन्ही आहे । अधिभूत द्वष्य दरुशने पाहे । जेथे द्वश्याचे दरूशन । तेथे एकाजनार्दन ।।११३४।।

**सुर्य आहे डोळा नाही** । तेथे पाहणे न चले काही । सुर्य आणि दृष्टी दोन्ही आहे । परि द्श्य पाहाणे नाही होय । सूर्य प्रकाशी रूपासी । एकाजनार्दन स्वरूपासी ।।११३५।।

**उदकी साखर पडत** । विरोनी उदका गोड करीत । तेथे हेतूसी नाही ठावो । निमाला भाव आणि अभावो । सांडोनी मीपणास । खेव दिधला समरसी । एकाजनार्दनी शरण । एकपणे एकचि जाण ।।११३६।।

**पंचभूतांचे हे शरीर खरे** । निर्माण ते बरे केले देवे । पृथ्वी आप तेज वायु हे आकाश । याचा हा सौरस आत्माराम । एकाजनार्दनी पंचभूत आत्मा । सर्व परमात्मा नेणती ते ।।११३७।।

**जगाचिये देही नांदतो आपण** । तरी करते कर्म परियेचा । जीव शिव दोन्ही शरीरी नांदती । कर्म धर्म स्थिती तया हाती । शिव ती उपाधी वेगळाचि वसे । कामक्रोध पिसे जीवालागी । लिगाडाचे मिसे जिवासी बंधन । एकाजनार्दनी जाण शिव मुक्त ।।११३८।।

**एका देहामाजी दोघे पै वसती** । एकासी बंधन एका मुक्त गती । पहाहो समर्थ करी तैसे होय । कोण त्यासी पाहे वक्र द्वष्टी । पापपुण्य दोन्ही भोगवी एका हाती । ऐशी आहे गती अतर्क्य ते । एकाजनार्दनी जनी जनार्दन । तयासी नमन सर्वभावे ।।११३९।।

**जाणीव फेडा जाणीव फेडा** । जाणीवेने वेडा लावियेले । नेणपण मज होता जो भाव । जाणीवेने कैसे मज नागविले । नेणपणे मी सर्वासी मानी । जाणीव येता कोण्हा न मानी । जाणीव नेणीव नेणेची काही । एकाजनार्दन लागला पायी ।।११४०।।

**माझा देही असता डोळा** । काय जालेरे गोपाळा । माझा डोळा गिवसोनी दीजे । मी पाउल न सोडी तुझे । डोळा मुराला डोळियात । कवण जाणे तेथील मात । एकाजनार्दनी अवलीळा । पाहता त्रैलोक्य जाहला डोळा ।।११४१।।

**मीच देवो मीच भक्त** । पूजा उपचार मी समस्त । हीच उपासना भक्ती । धर्म अर्थ सर्व पुरती । मीच गंध मीच अक्षता । मीच वाहे मीच पुर्तां । मीच धूप मीच दीप । मी माझे देख स्वरूप । मीच माझी करी पूजा । एकाजनार्दनी नाही दुजा ।।११४२।।

**मी तो स्वये परब्रह्म** । मीचि स्वये आत्माराम । मी तो असे निरुपाधी । मज नाही आधिव्याधी । मी तो एकट एकला । व्दैतभाव मावळला । माजविण नाही कोणी । एका शरण जनार्दनी ।।११४३।।

**ब्रह्मी स्फुरे ते स्फुरण** । शुद्ध सत्वाचे लक्षण । तो तू लक्षी लक्ष्यातीत । परिपुर्ण रे । कान्हु सच्चिदानंदु शब्द अरुतारे । त्याही परता तू निजानंदरू । जेथे नाही गुणागुण । नाही कार्यासी कारण । तो तू गुणी गुणातीत । परिपूर्णरे । एका ऐकी जनार्दन । भेद भाष्य वचन । तो तू शब्दाशी गिळून । राहिला सीरे ।।११४४।।

**सर्व देशी सर्व जीवी तो हरी** । सर्वाठाई सर्व भावे सर्व मुरारी । सर्व गावी सर्व रुपी भरुनी उरला । सर्व व्यापक सर्वभूती तो व्यापला । सर्व आदि सर्व अंती सर्वी सर्व भावो । एकाजनार्दनी देखो देवाधिदेवो ।।११४५।।

**झाली संध्या संदेह माझा गेला** । आत्माराम हृदयी शेजे आला । गुरुकृपा निर्मळ भागिरथी । शान्ति क्षमा यमुना सरस्वती । असीपदे एकत्र जेथे होती । स्वानुभव स्नान हे मुक्त स्थिती । सदबुद्धिचे घालूनि शुद्धासन । वरी सदगुरूची दया परिपूर्ण । शमदम विभूती चर्चूनी जाण । वाचे उच्चारी केशव नारायण । बोध पुत्र निर्माण झाला जेव्हा । ममता ह्यातारी मरोनी गेली तेव्हा । भक्ति बहिण धाउनी आली गावा । आता संध्या कैशी मी करू केव्हा । सहज कर्मे झाली ती ब्रह्मार्पण । जन नोहे अवघा हा जनार्दन । ऐसे ऐकता निवती साधुजन । एकाजनार्दनी बाणली निज खूण ।।११४६।।

**माझ्या देहाचे देहपण** । नागविता नारायण । माझे मीपण पाडिले वोस । वाया का मज ठेविला दोष । जेथे मीपण जाले वाव । तेथे करतेपणाचा ठाव । एकाजनार्दनी अभिमान । सांडोनिया झाला लीन ।।११४७।।

**तुझे तुझ्या ठाई तुजचि शुध्दि नाही** । मी मी ह्मणसी काई न कळे तुज । मीपण ठेवीता ठाई तूचि ब्रह्म पाही । इतर साधन काही न लगे येथे । मीपण तत्वता साच जेथे अहंता । एकाजनार्दनी तेचि ते निजात्मता ।।११४८।।

**कानावाटे मी नयनासी आलो** । शेखी नयनाचा नयन मी जाहलो । दृष्टिव्दारा मी पाहे सृष्टी । सृष्टी हरपली माझे पोटी । ऐसे जनार्दने मज केले । माझे चित्ताचे जीवपण नेले । एकाजनार्दनी जाणोनी भोळा । माझा सर्वांग जाहला डोळा ।।११४९।।

**आम्हा येणे ना जाणे जिणे ना मरणे** । करणे ना भोगणे पापपुण्य । जैसे असो तैसे आपोआप प्रकाशो । कवणा न दिसो ब्रह्मादिका । नवल नवल सांगता सखोल । अनुभवी हे बोल जाणताती । आम्हा कवण पदा जाणे ना कवण देवा भेटणे । आप आपणामाजी राहणे अखंडीत । सत्य कैलास वैकुंठ हे आह्मामाजी होती जाती । या सकळा विश्रांती आमुच्या रुपी । चंद्रसुर्य तारा हा पंचभौतिक पसारा । आह्मामाजी खरा होत जात । इतुके दिधले आम्हा गुरुजनार्दनी । एकाजनार्दनी व्यापियेला ।।११५०।।

**सात्विकाभरणे रोमासी दाटणे** । स्वेदाचे जीवन येऊ लागे । कापे तो थरारी स्वरूप देखे नेत्री । अश्रु त्या भीतरी वाहताती । आनंद होय पोटी स्तब्ध जाला कंठी । मौन्य वाकपुटी धरुनी राहे । टाकी श्र्वासोच्छ्र्वास अश्रुभाव देखा । जिरवुनी एका स्वरूप होय । एकाजनार्दनी ऐसे अष्टभाव । उत्पन्न होता देव कृपा करी ।।११५१।।

**बोधभानु तया नाही माध्यान्ह** । सायंप्रातर्नाही तेथे कैचा अस्तमान । कर्मचि खुंटले करणेचि हारपले । अस्तमान गेले अस्तमाना । जिकडे पाहे तिकडे उदयोचि दिसे । पूर्वपश्र्चिम तेथे कैचा भासे । एकाजनार्दनी नित्यप्रकाशा । कर्माकर्म जाले दिवसा चंद्र जैसा ।।११५२।।

**श्रवणी ऐकोनी पहावया येणे** । तव डोळेची जाले देखणे । आता पाहावे ते काये । जे पाहे ते आपणची आहे । जे जे देखा जाये दीठी । ते देखणे होऊनी नुठी । एकाजनार्दनी पाहे लीला । पाहता पहाणे अवलीळा ।।११५३।।

**रतीच्या अंती जे होय सुख** । सर्वांगी ते सर्वदा देख । इंद्रियाविण आहे गोडी । तेथीचा स्वादु कवण काढी । आधीच करणी कैसी यक्षिणी । गोडपणे कैसी देत आहे धणी । एकाजनार्दनी लागला छंदू । एकपणेविण घेतला स्वादु ।।११५४।।

**पाहता पाहता कैसे पालटले मन** । देखणेची दाविले चोरुनी गगन । आनंदे जनार्दना लागलो मी पाया । गेली माझी माया नाहीपणे । देखणेचि केवळ दिसताहे सकळ । सुखाचे निष्फळ वोतिले जग । एकाजनार्दनी निमाला एकपणे । मोहाचे सांडणे माया घेउनी ।।११५५।।

**ताट भोक्ता आणि भोजन** । जो अवघाचि झाला आपण । भली केली आरोगण । सिद्ध स्वादुचि झाला आपण । कैसी गोडी ग्रासोग्रासी । चवी लागली परमपुरुषी । रस सेविता

स्वमुखे । तेणे जगदुदर पोखे । संतृप्त झाली तृप्ती । क्षुधेतृप्तीची झाली शांति । एकाजनार्दनी तृप्त झाला । शेखी संसारा आचवला ।।११५६।।

**मारग ते बहु बहु प्रकार  प्रणव** । प्रणव विचार जयापरी । आदि अंतू नाही मार्गाची ग्वाही । साधने लवलाही वाया पंथे । जया जी भावना तोचि मार्ग नीट । परी समाधान चित्त नोहे तेथे । एकाजनार्दनी संतमार्ग खरा । येर तो पसारा हाव भरी ।।११५७।।

**शय्याशयन आणि शेजार** । ते अवघेचि जाले शरीर । कैसे निज घेतसे निजे । निज देखोनी समाधी लाजे । जागृती जागे निजे । स्वप्न सुषुप्तीचे निजगुजे । एकाजनार्दनी निजला । तो निजचि होऊनी ठेला ।।११५८।।

**सन्मुख देखोनिया भेटी धावा** । तव दशदिशा उचलत्या खेचा । आता नवल भेटी दैव । पुढे आलंगिता सर्वांगी खेवा । आता नवल भेटी दैव । पुढे आलंगिता सर्वांगी खेव । आलांगिनी गगन लोपे । खेव देता गगन हारपे । एकाजनार्दनी भेटी भावो । जिण्या मरण्या नुरेची ठावो ।।११५९।।

**तळी हारपली धरा** । वरी ठावो नाही अंबरा । ऐसा सहजी सहज निजे । एकाएकपणे विण शेजे । डावे उजवे कानी । निजे निज कोंदली नयनी । दिवस निशी हारपली दोन्ही । एका निजिजे जनार्दनी ।।११६०।।

पाहु जाता नारायणा । पहता मुकिजे आपणा । ऐसा भेटीचा नवलाय । पहाता नुरे भक्त देव । पहाता नाठवेचि दुजे । तेचि होईजे सहजे । एकाजनार्दनी भेटी । जन्ममरणा होय तुटी ।।११६१।।

**मुनीजन साधिती साधनी** । तो हरि कोंदला नयनी । नवल हो नवल वाटले । निरखिता निरखिता मनही आटले । स्थूळ देही देह धर्मा । गोष्टी केली हो परब्रह्मा । व्यापला तो एकाजनार्दनी । पहाता दिसे जनी वनी ।।११६२।।

**उघडा देव दिगंबर भक्त** । दोहीचा सांगात एक जाहला । देव नागवा भक्त नागवा । कोणाची केशवा लाज धरू । देव निलाजरा भक्त बाजारी । देहा माझारी उरी नाही । उघडे नागवे जाहले एक । एकाजनार्दनी देखणे देख ।।११६३।।

**भूमी शोधोनी साधली काज** । गुरुवचन बीज पेरीयले । कैसे पिक पिकले प्रेमाचे । सांठविता गगन टाचे । सहा चारी शिणले मापारी । सकळा नव्हे अद्दयाप बरी । एकाजनार्दनी निजभाव । देही पिकला अवघा देव ।।११६४।।

**मी मी ह्मणता अवघे मिच मी जालो** । तूपणाच्या बोला लाजुनिया ठेलो । मी ना कोणाचा ना माझे कोण्ही । एकुवीण एकु सहज निर्वाणी । माझे मीपण मजपाशी निमाले । एकानेक सकळ सहजी सहज जाले । एकाजनार्दनी गणीत नवानी येकु । परापरती सारुनी उगला सिद्धांकु ।।११६५।।

**मी मी ह्मणता माझे मीच मी नेणे** । चुकली रवीकिरणे सूर्या धुंडिती । मजलागी मी तो म्यां भेटावे कैसे । दीपप्रभा पुसे दीपकासी । सबाह्य अभ्यंतरी गगन सावकाश । तैसे घटाकाश महादाकाशी । एकाजनार्दनी एकत्वे जन वन । जन आह्मा दिसे जनार्दन ।।११६६।।

**भावी देव की देवी भाव** । दोहीचा उगव करुनी दावा । भाव थोर की देव थोर । दोहीचा निर्धार करुनी दावा । जव जव भाव तंव तंव देव । भाव नाही तेथे देवचि वाव । एकाजनार्दनी भावेची देव । लटिके ह्मणाल तरी हृदयी साक्ष पहाहो ।।११६७।।

**पाहलेरे मना पाहलेरे** । बुद्धि बोधे इंद्रिया सम जालेरे । नयनी पहाता न दिसे बिंब । अवघा प्रकाश स्वयंभ । एकाजनार्दनी पहाट । जनी वनी अवनी लखलखाट ।।११६८।।

**कवण देव कवण भक्त** । एक दिसे दोही आंत । भक्त ध्यानी जव वैसला । पूज्य पूजक स्वये जाहला । ध्यानी हारपले मन । सरले ध्याता ध्येय ध्यान । एकाजनार्दनी भाव । देव ह्मणण्या नुरे ठाव ।।११६९।।

**घर सोडोनी जावे परदेशा** । मजसवे देव सरिसा । कडे कपाटेसीवरी । जिकडे पाहे तिकडे हरी । आता कोणीकडे जावे । जिकडे पाहे तिकडे देव । एका बैसला निरंजनी । न जाइजे जनी वनी ।।११७०।।

**आता काय पुजू देवा** । माझी मज घडे सेवा । तोंडू गेलो तुळशीपान । तेथे पाहता मधुसूदन । अत्र गंध धूप दीप । तेही माझेची स्वरूप । एकाजनार्दनी पूजा । पूज्य पूजक नाही दुजा ।।११७१।।

**कृष्ण चंदन आणिले** । सकळ वेधिले परिमळे । तेणे फुटती अंकुर । अंगी भावाचे तरुवर । खैर धामोडे चंदन । कृष्णवेधे मन । एका एक हरिख मनी । वसंत दाटे जनार्दनी ।।११७२।।

**बोलिजे ते नव्हे** । बोलणे तेही तो आहे । बोला आतु बाहेर पाहे । पाहता कवण आहे । हरि हरि हरि हरि । अहं सोहं नुरेचि उरी । आत्मा एक चराचरी । एकपण नाही निर्धारी । दृश्य तो जाला नाही । दृश्यमात्रे त्या तेच पाही । आहे नाही ऐसे जे काही । प्रकाशे त्याच्याच

ठाई । एकपणे पाहे अनेक । अनेकी आहे एक । एका ना नव्हे आणीक । एकाजनार्दनी तोचि देख ।।११७३।।

**राहाते एक जाते दोनपण** । तेथेचि नाही पा देखणे । एकचि एक बोलता रे साचे । एक नाही तेथे अनेक कैचे । अनेकी एक निर्धारिता पाही । मुळी मन ठेउनिया ठायी । राहाते जाते दोन्हीही वाव । एकाजनार्दनी एकचि भाव ।।११७४।।

**भाव भावित भाव भावित भावित निज भावना** । निजबोध जालिया कैची भाव भावित भावना । भक्ति भावित शक्ति बोधित शोधीत निजसत्व । भक्तिमुक्ति विरहित बोधिते निजसत्व । मायामोहित काय कामीते क्षोभती निजक्रोधा । एकाजनार्दनी एकपणे आणिती निजबोधा ।।११७५।।

**रसने रस भोग्य रसाचा भोक्ता रस ग्रासी होय भेटी** । रसस्वादाचा सौरसु तोची ब्रह्मरसो कृष्णी पडतसे गांठी । आत्मा कान्हा भोगनिधि । आम्हां सकळा भोग अवघी । श्राव्य श्रावक श्रवणा समाधान सहजी सिद्धीचि पाहे । गगन गर्भे सरे गगना अलिप्त शब्दे कोंदाटले ठाई राहे । द्दष्टी द्दश्य नसे द्दश्या सबाह्य दिसे द्दष्टीविण डोळा पाहे । अरुपाचे रूप अगुणी होऊनी देख देखणे कवण आहे । घ्राणाचे जे घ्राण वासाचा अवकाशु ज्ञप्ती मात्र आहे शुद्ध । गंधाचा गंधु सुवास जीवन द्दष्टी भोग सुगंध । देहाचे आतील कठिण की कोवळे न कळे तेथीचा भावो । आत्मारामी वृत्ति जडोनी गेली मा सबाह्य रिता नुरेची ठावो । मनाचाही वेगु दिसताहे सर्वे गुप्तमाजी उभा देवो । ह्मणवोनी मन होते ते उन्मन जाले पडिला कृष्ण स्वभावो । काष्ठ भक्षिता दाहकू काष्ठामाजी असे मंथिलीया काष्ठचि अग्नि । एकाजनार्दनी कृपा देहीचाची देही मा भोग भोगिता राहे कृष्ण होऊनी ।।११७६।।

**प्रतिमाचि देवो ऐसा ज्याचा भावो** । तो न करी निर्वाहो आह्मालागी । असता सबराभरित बाहेर जो अंतरी । तो संपुष्टामाझारी ह्मणती देवो । व्दारका पंढरी देवयात्रा करी । सर्वत्र न धरी तोचि भावो । सुक्षेत्री पुण्य मा अन्यत्र ते पाप । नवल हा संकल्प कल्पनेचा मतवाद्दया । व्दांरका पंढरी देवयात्रा करी । येर काय भारी वोस पडे । एकाजनार्दनी स्वतःसिद्ध असे । विस्मरण स्मरण होत असे नाथिले ते पिसे ।।११७७।।

**स्मरण स्वयाती न लगे ती जपमाळ हाती** । नाठविता चित्ती स्मरण होय । तैसा देही देवो परिसूनि भावो । नाठव तोचि आठवो होत असे । वस्तु वस्तुपणे जडोनि गेली अंगी । आठवू तो विसरू वेगी जाला वावो । अगाध डोही गगन बुडाले दिसे । परि न बुडताचि असे गगनी गगन । तैसा देही देव असताचि संचला । ह्मणती हरपला लाज नाही । मृगजळाची

व्यक्ति जळपणाची प्रतीति । भासत असता स्थिती मिथ्या जैसी । एकाजनार्दनी एकपणे निर्वाहो । असताचि देह वावो देहपणे ।।११७८।।

**सर्वाभूती दिसे देव** । जया ऐसा अनुभव । तया चित्ती देव वसे । जिकडे पाहे तिकडे दिसे । देव जन देव विजन । देवी जडले तन मन । देव घरी देव दारी । देव दिसे व्यवहारी । देव काम देव धंदा । देवी पावला स्वानंदा । देव मागे देव पुढे । दृष्टी चैतन्य उघडे । माता देव पिता देव । देवरूप स्वयमेव । देव बंधू देव जाया । देवरूप अवघी माया । देव गुण देव निर्गुण । गुणातीत देव जाण । देवाविण काही नाही । ऐसी ज्याची दृष्टी पाही । एकाजनार्दनी देव । सहज चैतन्य स्वयमेव ।।११७९।।

**पाहो गेलो देवालागी** । देवरूप झालो अंगी । आता मीतूपण ठाव। उरला नाही अवघा देव । सुवर्णाची झाली लेणी । देव झाला जगपणी । घटी मृतिका वर्तत । जगी देव तैसा व्याप्त । एकानेक जनार्दन । एका घडला एकपणे ।।११८०।।

**ब्रह्मी नाही कर्म नाही उपासना** । नाही ध्येय ध्याना ठाव जेथे । जाणीव नेणीव भगवंती नाही । विज्ञान जे तेही लया जाय । नामरूप ठाव नाही जया ठाई । ज्ञेय ज्ञाता तेही जेथे । एकाजनार्दनी आहे एकरूप । सहज स्वरूप नित्य शुद्ध ।।११८१।।

**आजीचा सुदीन आम्हा झाला आनंदु** । सकळा स्वरूपी स्वये देखे गोविंदु । पाहिला गे माय आता सांगू मी कैसे । जेथे जेथे पाहे तेथे तेथे गोविंदु दिसे । पाहता पाहणे तटस्थ ठेले । सबाह्य अभ्यंतरी पुरुषोत्तम कोंदले । यापरी पहाता हरुष होतसे मना । एकाजनार्दनी धणी न पुरे मना ।।११८२।।

साधन काही नेणे मी अबळा । शाम हे रूप बैसलेसे डोळा । लोपली चंद्रसूर्याची कळा । तो राम जीवीचा जिव्हाळा । राम हे माझे जीवीचे जीवन । पाहता मन हे झाले उन्मन । प्रकाश दाटला दाही दिशा । पुढेहि मार्ग न दिसे आकाशा । खुंटली गती श्र्वासोच्छवासा । तो राम माझा भेटेल हो कैसा । यासी साच हो परिसा कारण । एकाजनार्दनी शरण । त्याची कृपा होय परिपूर्ण । तरीच साधे हे साधन ।।११८३।।

**पतलारे भवगजपंचानन** । निरसूनिया जन झाला जनार्दन । नाभी नाभी नाभी नाभीसी काह्या । नाथिला संसार लटकी हि माया । वचनाचेनि धाये संशय तोडिले । अनेकत्व मोडूनि एकत्व जोडिले । वांझेचा पुत्र कळीकाळाचा वैरी । एकाजनार्दनी संसार तोडरी ।।११८४।।

**पाहाला तो दीन हरिखाचा आह्मा** । सर्वाभूती अभिन्न सदा देखो श्रीराम । काय सांगू गोविंदा तुझी आवडी । जनी वनी नयनी नीच गोडी । निमिध्य जैसे वर्ध तैसे आह्मा गोडी । हरिरूप पहाता हरिखे मन बुद्धि वेडी । जन मन मन अवघे जाले जनार्दन । एका ऐकी पहाता तेथे हारपले मन ।।११८५।।

**हरिखाची गुढी बोधावा आला** । अहंकार गर्जतु अविवेकु मारिला । संतोषे विवेक आपआपणिया विसरला । लाजूनि महा हारूप आनंदासी गेला । मारविला क्रोध ममता सती निघाली । तुटला मत्सर शांति सुखे सुखावली । एकाजनार्दनी पाहता सहजी पै सहजे । स्वराज्य सांग तेथे नाही पै दुजे ।।११८६।।

**वेणुनादाचिया किळा** । पान्हा फुटला निराळा । आर्तभूत जीव तिन्ही । चातक निवाले जीवन । स्वानुभवाचे सरिते । जेवी जीवना दाटे भरते । एकाएक गजे धनी । पूर आला जनार्दनी ।।११८७।।

**उपवास पडिले भारी** । ती वेदना जाणे हरी । मज जाली नाही बाधा । देही देखता गोविंदा । देहीचे दु:ख अथवा सुख । भेटी नयेचि सन्मुख । एकाजनार्दनी सुख । विसरला तहान भूक ।।११८८।।

**पाहता पाहता वेधले मन** । झाले उन्मन समाधिस्था । ऐसा परब्रह्म पुतळा देखिलासे डोळा । पाहिला सावळा डोळेभरी । तनु मन वेधले तयाचे चरणी । शरण एका एकपणे जनार्दनी ।।११८९।।

**कल्पित देह कल्पित प्रबंध** । कल्पित षट चक्रमाळा । कल्पित धारणा कल्पित सुषुन्मा । कल्पित मेरूमंडळरे  कल्पित छाडो । निर्विकल्प वृत्ति मांडो । सहजी सहज भरपूर भरले । देह विदेह दुरी छाडो । कल्पित व्दिदळ कल्पित चर्तुदल । कल्पित अष्टकमळ । कल्पित व्दादश कल्पित षोडश । कल्पित ते सहस्त्र दलरे । कल्पित श्रीहट कल्पित गोल्हाट । कल्पित औटपीठ कल्पित भ्रमरगुंफा । कल्पित हंसपद । कल्पित योग अचाटरे । कल्पित शिव कल्पित शक्ति । कल्पित ते निजप्राप्ति । जनार्दनी निज कल्प योगे । सहज चैतन्य निज शांति रे ।।११९०।।

**खांबसूत्राची बाहुली** । सुत्राआधीन उचली । माझे मीपण नाही स्वतंत्र । क्रियाकर्म ते परतंत्र । बाहुलीचे नाही स्वतंत्रता । तैसा नव्हे कर्म कर्ता । एका एकपणाचे सूत्र । जनार्दन पायी स्वतंत्र ।।११९१।।

**वेद तो काल्पिक शास्त्र ते शाब्दिक** । पुराण सकळिक बाष्कळचि । बाहुली तो जीव सूत्रधारी तो शिव । मिथ्याचि हे मात्र जग सर्व । येथे कैचा मुक्त मुळीच नाही बद्ध । सर्वही अबद्ध दिसे जे कां । एकाजनार्दनी ऐसी याची खूण । जाणे तोचि धन्य गुरुपुत्र ।।११९२।।

**जेथे निरसोनिया व्दैत ह्मणताती अव्दैत** । त्याहुनी अतीत स्वरूप माझे । ते मी लक्षाही लक्ष्य पराचेही पर । जेथे वेदशास्त्रे लाजोनी गेली । गिळोनी अज्ञान निखळ ह्मणती ज्ञान । उभयाहूनी भिन्न स्वरूप माझे । सच्चिदानंद प्रतिपादिती वेद । याहुनी अगाध स्वरूप माझे । निरसुनिया कर्म ह्मणती परब्रह्म । याहूनी उत्तम स्वरूप माझे । माया ममत्व निरसुनी शुद्ध सत्व । सत्वाचे निजसत्व स्वरूप माझे । जेथे पद आणि पिंड अभिन्न अखंड । त्याहूनी उदंड स्वरूप माझे । जेथे शुद्ध आणि शबल म्हणताती केवळ । याहूनी निर्मळ स्वरूप माझे । ब्रह्म स्फुरण स्फूर्तीचि कारण । याहूनी परते जाण स्वरूप माझे । एकाजनार्दनी एकपणा अतीत । चित्ताचे अचिंत्य स्वरूप माझे ।।११९३।।

**देव जाला पाटी पोटी** । तया नाही आटाआटी । जेथे जाय तेथे देव । नाही जाय तेथे देव । नाही भेव सर्वथा । संसारासी मारुनी लाथा । केला तत्वता देशोधडी । विषयाचे ठेचिले तोंड । मोडिले बंड पाचाचे । जनार्दनाचा एक ह्मणे । देवा पहाणे पाठीपोटी ।।११९४।।

**साचपणे देवा शरण पै जाती** । तया वैकुंठपती विसरेंना । जैसी कन्या दूरदेशी एकटी । रात्रंदिवस संकटी धोकी मायबापा । पतिव्रतेचे सर्व मन पतिपायी । तैसा देव ठायी तिष्ठतसे । एकाजनार्दनी मज हा अनुभव । जनार्दने देव दाखविला ।।११९५।।

**नेणतिया ठायी पाहू जाय देवा** । तो अवघे या केशवा व्यापियेले । नेणतपण गेले जाणतपण हरपले । एकचि उरले नाम साचे । पहाता पहाणे पंडियेले ठक । अवघाचि हरिख वोसंडला । एकाजनार्दनी पडियेले ठक । जाणता नेणता सर्वाभूती देख ।।११९६।।

**जाणती हे कळा हरपोनी गेली** । वृत्ती मावळली तयामाजी । पहाता पहाणे हारपोनी गेले । मी माझे सरले तयामाजी । अंतर बाहेरी पहाता शेजारी । शून्याची वोवरी ग्रासियेले । ग्रासियेले तेणे चंद्र सूर्य दोन्ही । एकाजनार्दनी आनंद झाला ।।११९७।।

**सत्व रज तम गेले निरसोनी** । दृश्याची लावणी कैशी झाली । गेलिया माघारी पहाता न दिसे । स्वतः तो प्रकाशे सदोदित । अंतर बाहेरी पहाता शेजारी । प्रकाशता अंतरी लखलख । एकाजनार्दनी प्रकाश संपूर्ण । सर्व नारायण बिंबलासे ।।११९८।।

**चित्त चैतन्या पडली गाठी न सुटे मिठी** । संचित कर्माची झाली आटी उफराटी द्दष्टी । कैचा आठव द्दश्याचा । खुंटली वाचा झाला सुखाचा । देह विदेह वाढिले मीतूपणे । एकाजनार्दनी सहज एकपणे ।।११९९।।

**देखिले कंदर्पाच्या बापा** । आहमी नेणो पुण्य पापा । कैचे पाप कैचे पुण्य । देह नामे पडले शून्य । शून्य ह्मणताती बिंदुले । तेचि विश्र्वकर झाले । एका शून्याचा विस्तारू । जनार्दनी जगदकारू ।।१२००।।

**ध्येय ध्यातेविण ध्यान** । ज्ञेय ज्ञातेविण ज्ञान । ऐसे जनार्दन्नाचे ध्यान । साधनाचे निज साधन । साध्य साधनेविण साधने । द्दश्य द्दष्टत्वेविण देखिणे । बोल बोलणेविण बोलणे । एकाएकी जनार्दने ।।१२०१।।

**नेत्राचेनी तेजे पोळला चंडांश** । नभचि नाही तेथे कैचे अवकाश । रात्र हारपली पाहू मी कोठे । दिवस रुसुनी गेला पहाता न भेटे । अंगाचेनी तेजे डोळा आली चवी । पाहू गेलो तव बुडाला रवी । एकाजनार्दनी पहाता पाहणे । रात्रदिवस दोन्ही गेले हरपोन ।।१२०२।।

**जळ स्पर्शो जाता स्नानी** । तव चिन्मात्र भासे जीवनी । कैसी वहाताते गंगा । स्नानी हारपले अंगा । अंगत्व मुकले अंगा । स्नानी सोवळी जाली गंगा । एकाजनार्दनी मज्जन । सकळ तिर्थे जाली पावन ।।१२०३।।

**येणे जाणे खुंटले क्रियाकर्म ठेले** । मज माझे भेटले आत्मरूप । त्यागु ते काय भोगू ते काय । सर्व ब्रह्मरूप पाहे कोंदाटले । क्रियाकर्मधर्म निखिळ परब्रह्म । त्यागु भोगू तेथे केवळ भ्रम । एकाजनार्दनी सहजी सहज एक । एकीएक पहाता कैचे अनेक ।।१२०४।।

**जाणपणे वस्तु जाणो मी जाये** । माझी जाणीव कैसी मज आड ठाये । जाणो मी कैसे जाणो मी कैसे । जाणपणे पिसे लावियेले । जाणपणाचे पडळ जे आले । जवळीक वस्तूचे देखणे ठेले । एकाजनार्दनी सुदले अंजन । पडळ भेदोनिया दाविले निधान ।।१२०५।।

**शून्य निरशून्य तयामाजी बीज** । तया नांव गुजनिजवस्तु । जाणण्याचे मूळ अकूळाचे कुळ । अलक्ष्याचे स्थळ तयाठाई । एकाजनार्दन प्रसाद लाघला । जनार्दन वोळला सुखरूप ।।१२०६।।

**सोनियाचा देव सोनियाचे देऊळ** । सोनियाचा भक्त पूजी सोनियाच्या कमले । नामची पै रूप ते अभिन्न । जनी जनार्दन तोचि पाहे । मृत्तिकेचा घट मृत्तिकेची वेळणी । मृत्तिकेचे

आळे तेथे मृत्तिकेची माथणी । भिन्न भिन्नाकारी मृत्तिका दिसते साकार । एकाजनार्दनी निज निर्विकार ।।१२०७।।

**अभेदाच्या व्दारापाशी** । तीर्थे प्रयागादि काशी । भक्तिमुक्तीचे माहेर । अभेदाचे ते घर । ऐशी अभेद भक्ति घडे । कामक्रोध तेथे दडे । एकाजनार्दनी शरण । अभेद भक्ति मुख्य ज्ञान ।।१२०८।।

**समूळ मुळी पाहता पाहण्या उपरम** । भोग भोक्ता तेथे सहज परब्रह्म । भोगू मी काय त्यागू मी काय । त्याग भोग दोन्ही चैतन्य माय । भोग भोगिता भोग त्यागिता त्याग । दोन्हीचे निखळ अधिष्ठान अंग । एकाजनार्दनी एकपण त्यागी । ब्रह्मरूप जग आदळे अंगी ।।१२०९।।

**देह जाईल तरी जावो राहील तरी राहो** । दोराचिया सर्पा जीणे मरणे ना वावो । आह्मी जिताचि मेलो जिताचि मेलो । मरोनिया जालो जीवेवीण । मृगजळाचे जळ भरले असता नाही । आटलीया तेथे कोरडे होईल काई । एकाजनार्दनी जगचि जनार्दन । जीणे मरणे तेथे सहज चैतन्यधन ।।१२१०।।

**पाणियाचा मासा जाला** । नामरूपा नाही आला । ते पूर्वीच पाणी आहे । तेथे पारधी साधील काय । जंव पारधी घाली जाळे । तंव त्याचेच तोंड काळे । एकाजनार्दनी सर्वही पाणी । माशियाची कैची खाणी ।।१२११।।

**मीच देवो मीच भक्त** । पूजा उपचार मी समस्त । मीच माझी करी पूजा । मीच माझा देवो सहजा । हेचि उपासना कांडाचे सार । आगम निगमाचे गुह्य भांडार । एकाजनार्दनी देव । स्वये पाहे देवाधिदेव ।।१२१२।।

**लागले दैवत अक्षत सांगा** । देव देऊळ आले अंगा । देव देऊळ अवघाचि देव । देखोनिया भाव लागतसे । जाणता नेणता उरी नुरे मना । यालागी शरण एकाजनार्दना ।।१२१३।।

**सकळ गोडिये जे गोड आहे** । ते रसनाची जाली स्वये । आता चाखावे ते काय । जिव्हा अमृता वाकुल्या वाय । तया गोडपणाच्या लोभा । कैशा सर्वांगी निघती जीभा । एकाजनार्दनी गोडी । तया क्षण एक रसना न सोडी ।।१२१४।।

**जो जो कोणी मनी ध्याये** । तो मीची होऊनिया राहे । ऐसा अनुभव बहुता । अर्जुनादि सर्वथा उद्धवा । एक एक सांगता गोष्टी । कल्प कोटी न सरेची । शरण येता जीवेभावे । एकाजनार्दनी भावे हरीसी ।।१२१५।।

**साक्षीभूत आत्मा म्हणती आहे देही** । वाया का विदेही जाहला मग । नानामाते तर्क करिता विचार । पापाचे डोंगर अनायासे । देही असोनी देव वाया का शिणती । एकाजनार्दनी फजिती होती तया ।।१२१६।।

**आत्मत्वाचे ठायी सर्व एकाकार** । नाही नारीभेद भेद भिन्न । वर्णाश्रम धर्म ज्ञाति कुळगोत । एकाकारी होत आत्मतत्वी । सदोदित पाहे सर्वा ठायी आहे । एकाजनार्दनी सोय धरी त्याची ।।१२१७।।

**देही वाढे जो जो शांती** । तो तो विरक्ती बाणे अंगी । ऐसा आहे अनुभव । देही देव प्रकाशे । देही आत्मा परिपूर्ण । भरला संपूर्ण चौदेही । एकाजनार्दनी रिता ठाव । नाही वाव पाहता जगी ।।१२१८।।

**बहुतापुण्ये करूनि जोडला नरदेह** । नाही त्याचा वेवसाव घडला काही । न करावे ते केले मनामागे धावणे । परि नारायणे करुणा केली । आवरूनि इंद्रिये धरियेली हाती । कामक्रोधाची शांती केली सर्व । वाया जाये परि श्रीगुरु भेटला । एकाजनार्दनी जाहला कृतकृत्य ।।१२१९।।

**विदेह देह विस्मृती पावले** । देहादेही फिटले व्दैताव्दैत । ऐसे जनार्दने उघड दाविले । देहीच आटले देहपण । एकाजनार्दनी चौदेहावेगळा । दाविलासे डोळा उघड मज ।।१२२०।।

**निमाले राहिले गेले ऐसे ह्मणती** । वाया फजीत होती आपुल्या मुखे । नासले कलेवर घेउनिया मांडी । वाउगे ते तोंडी बोलताती । स्वये आत्मज्योती जया नाही आदीअंत । तो आत्मा प्रत्यक्ष निमाला ह्मणती । एकाजनार्दनी उफराटी बोली । कैशी भ्रांती पडली त्याचे मनी ।।१२२१।।

**व्याघ्रामुखी सापडे गाय** । अव्दैती तू रामनाम ध्याय । वाचे गाता रामनाम । निवारेल क्रोधकाम । भेद भावाची वासना । रामनामे निरसे जाणा । एकपणे जनी वनी । एकाशरण जनार्दनी ।।१२२२।।

**रामराम स्मरे पुरूषोत्तमरे** । सहज विद्दया ज्ञेय ज्ञान हाही अविद्दया धर्मरे । अहं आत्मा हेही न साही सर्व क्रिया भ्रमरे । विजन वन निरंजन जनार्दन रे । अगम्य गति ध्येय ध्यान साधन बंधन रे । एकाजनार्दनी एका स्वानंद परिपूर्ण रे ।।१२२३।।

**दर्पणामाजी आपण** । जीवरूपे शिव जाण । जेणे स्वरूप आपण । तद्रूप बिंब दिसे जाण । अग्नि राखे झोकाळिला । तरी अग्निपणे संचला । जीवशिव दोन्ही होका एक । तरी एक

मलीन एक चोख । थिल्लरी प्रतिबिंब भासे । बिबाअंगी काय संचिता वसे । निर्वाळूनि पहाता वेगी । बिंब प्रतिबिंब वाउगी । ऐसे भुलू नये मन । शरण एकाजनार्दन ।।१२२४।।

**आपणा आपण पाहे विचारूनी** । विचारीत मनी देव तूचि । तूचि देव असता फिरशी वनोवनी । प्रकटती काहाणी बोलायासी । देहच देऊळी आत्माराम नांदे । भांबावला भक्त हिंडे सदा राने । एकाजनार्दनी भ्रमाची गोष्टी । वायाची शिणती होती कष्टी ।।१२२५।।

**श्रमोनी वाउग्या बोलती चावटी** । परी हातवटी नये कोणा । ब्रह्मज्ञानी ऐसे मिरविती वरी । क्रोध तो अंतरी वसतसे । सर्वरुप देखे समचि सारिखे । व्दैतअव्दैत पारखे टाकुनिया । एकाजनार्दनी ब्रह्मज्ञान बोली । सहजचि आली मज अंगी ।।१२२६।।

**देव मनुष्य सुताचे बाहुले** । बापे बोलवणा सांगाते दिले । शेवट पालऊन दिसे मधु । नेसो जाय तव अवघाचि संबंधू । आत बाहेरी अवघेची सूत । स्वरूप देखता निवताहे चित्त । नीच नवा शोभतु साउला । एकाजनार्दन मिरवला ।।१२२७।।

**मस्तकी केश चिकटले होती** । जै ते निघती आपुले हाती । मिळती जैशा माय बहिणी । हाती घेउनी तेलफणी । ऐसा त्रिगुणाचा ठावो । एकाजनार्दनी पहा वो ।।१२२८।।

**एकचि माहेरा नाथिली** । हे तव जाण भ्रांति बोली । विठ्ठल विठ्ठल रोकडा । विठ्ठल पाहे चहूकडा । आपण आत बाहेरी पाहे । विठ्ठल देखोनी उगाची राहे । एकाजनार्दनी शरण । विठ्ठल विठ्ठल परिपूर्ण ।।१२२९।।

**सूर्य अंधाराते नासी** । परी तो सन्मुख नये त्यासी । माझे जिणे देखणेपणे । तेचि मायेचे लक्षण । देही देह अभिमानाजीवी मायेचे ते ध्यान । एकाजनार्दनी माया । देहधीन देवराया ।।१२३०।।

**नित्य नूतन दोष ज्वाळा** । होती जाती देखती डोळा । जागृती आणि देखती स्वप्न । दोहीसी देखता भिन्न भिन्न । भिन्नपणे नका पाहू । एकाजनार्दनी पाहू ।।१२३१।।

**कारचट पाहता कडू तेचि गोड** । परिपाको पाहता गोडचि शुद्ध । कडू तेचि गोड कडू तेचि गोड । समरस कोड सोयरिक । साखरेचे वृंदावन केले । चाखो नेणे ते नाडोनी गेले । एकाजनार्दनी प्रपंच एकु । नश्र्वर ह्मणता नाडला लोकु ।।१२३२।।

**जनार्दने मज केला उपकार** । पाडिला विसर प्रपंचाचा । प्रपंच पारखा जाहला दुराचारी । केलीसे बोहरी कामक्रोधा । आशा तृष्णा यांचे तोडियेले जाळे । कामनेचे काळे केले तोंड । एकाजनार्दनी तोडिले लिगाड । परमार्थ गोड दाखविला ।।१२३३।।

**जनार्दन केले अभिनव देखा** । तोडियेली शाखा अव्दैताची । केला उपकार केला उपकार । मोडियेले घर प्रपंचाचे । एकाजनार्दनी एकपणे देव । दाविला नवलाव अभेदाचा ।।१२३४।।

**कामक्रोध वैरियांचे तोडियले फासे** । जनार्दने सरसे केले मज । देहाची वासना खंडून टाकिली । भ्रांतीची उडाली मूळ दोरी । कल्पनेचा कंद समूळ उपडिला । हृदयी दाविला आरसा मज । एकाजनार्दनी सहज आटले । स्वदेही भेटले गुरुकृपे ।।१२३५।।

**भुक्ति आणि मुक्ति फुकाचे ठेवणे** । श्रीगुरु जनार्दने तृच्छ केले । येर ब्रह्मज्ञाना काय तेथे पाड । मोक्षाचे काबाड वारियेले । साधन अष्टांग यज्ञ तप दान । तीर्था तीर्थाटन शीण वाया । एकाजनार्दनी दाविला आरिसा । शुद्धी त्या सरसा सहज जाहलो ।।१२३६।।

**देहाचे देऊळ देऊळीच देव** । जनार्दन स्वयंमेव उभा असे । पूजन ते पूज्य पुजकू आपण । स्वये जनार्दन मागे पुढे । ध्यान ते ध्येय धारणा स्वयंमेव । जनार्दन ठाव रेखियला । एकाजनार्दनी समाधी समाधान । पडिलेसे मौन देही देहा ।।१२३७।।

**आता यजन कैशापरी** । संसारा नोहे उरी । सद्गुरूवचन मंत्र अरणी । तेथोनि प्रकटला निर्धूम अग्नी । सकळी सकाळच्या मुखे । अर्पितसे यज्ञ पुरुषे । एकाजनार्दनी यज्ञे अर्पी । अर्पी त्यामाजी समर्पी ।।१२३८।।

**शांतीचेनी मंत्रे मंत्रुनी विभूती** । लाविली देहाप्रती सर्व अंगा । तेणे तळमळ हारपली व्यथा । गेली सर्व चिंता पुढिलाची । लिगाडाची मोट बांधोनि टाकिली । वासना भाजली क्रोध अग्नी । एकाजनार्दनी शांत जाहला देव । कामनीक देव प्रकटला ।।१२३९।।

**अहं कोहं सोहं सर्व आटले** । द्वयश्य द्रष्टत्व सर्व फिटले । ऐसी कृपेची साउली । माझी जनार्दन माउली । व्दैत अव्दैताचे जाळे । उगविले कृपाबळे । अवघे एकरूप जाहले । दुजेपणाचे ठाव पुशिले । शरण एकाजनार्दनी । एकपणे भरला अवनी ।।१२४०।।

**पहा कैसी नवलाची ठेव** । स्वयमेव देही देखिला देव । नाही जपतप अनुष्ठान । नाही केले इंद्रियाचे दमन । नाही दान धर्म व्रत तप । अवघा देही जालो निष्पाप । पाप पुण्याची नाही आटणी । चौदेहासहित शरण एकाजनार्दनी ।।१२४१।।

**त्रिभूवनीचा दीप प्रकाशु देखिला** । हृदयस्थ पाहिला जनार्दन । दीपाची ती वाती वातीचा प्रकाश । कळीकामय दीप देही दिसे । चिन्मय प्रकाश स्वयं आत्मज्योती । एकाजनार्दनी भ्रांति निरसली ।।१२४२।।

**उदारपणे उदार सर्वज्ञ** । श्रीजनार्दन उभा असे । तयाचे चरणी घातली मिठी । जाहली उठाउठी भेटी मज । अज्ञान हरविले ज्ञान प्रकटले । हृदयी बिंबले पूर्ण ब्रह्म । एकाजनार्दनी नित्यता समाधी । वाउग्या उपाधी तोडयेल्या ।।१२४३।।

**सोलीव ब्रह्मज्ञान सांगत जे गोष्टी** । ते उघड नाचे द्दष्टी संतासंगे । गळा तुळशीहार मुद्रांचे शृंगार । नामाचा गजर टाळ घोळ । दिंडी गरुड ठके मकरंद वैभव । हारुषे नाचे देव तया सुखी । एकाजनार्दनी सुखाची मांदुस । जनार्दन समरस केले मज ।।१२४४।।

**माझे मीपण देहीच मुराले** । प्रत्यक्ष देखिले परब्रह्म । परब्रह्म सुखाचा सोहळा । पाहिलासे डोळा भरुनिया । ब्रह्मज्ञानाची ते उघडली पेटी । जाहलो असे पोटी शितल जाणा । एकाजनार्दनी ज्ञानाचे ते ज्ञान । उघड समाधान जाहले जीवा ।।१२४५।।

**दीपाचे ते  तेज कळीके ग्रासिले** । उदय अस्त ठेले प्रभेविण ।लोपिलीसे प्रभा तेजाचे तेजस । जाहली समरस दीपज्योती । फुकल्यावाचुनी तेज ते निघाले । त्रिभुवनी प्रकाशिले नवल देख । एकाजनार्दनी ज्योतीचा प्रकाश । जाहला समरस देही देव ।।१२४६।।

**जेथे परापष्यंतिची मावळली भाष** । तो स्वयंप्रकाश दावी गुरु । तेणे माझे मना जाहले समाधान । निरसला शीण जन्मोजन्मी । उपाधी तुटली शांती हे भेटली । सर्व तेथे आटली तळमळ । एकाजनार्दनी प्रेमाचे ते प्रेम । दाविले सप्रेम हृदयात ।।१२४७।।

**उग्दार विश्र्वाचा दीपकू तेजाचा** । प्रकाशु कृपेचा दाविले जनार्दन स्वयमेव । अकार उकार मकार शेवट । घेतिलासे घोट परब्रह्मी । एकाजनार्दनी विदेह दाविला । सभराभरी दाटला हृदयामाजी ।।१२४८।।

**देहाची आशा टाकिली परती** । केलीसे आरती प्रपंचाची । स्थूळ सूक्ष्म यांची रचुनिया होळी । दावाग्नि पाजळी भक्तिमंत्रे । एकाजनार्दनी देहासी मरण । विदेही तो जाण जनार्दन ।।१२४९।।

**फिरलो मी दशदिशा** । वाया सोसा हावभरी । नाही जाहले समाधान । वाउगा शीण जाहला पोटी । उरला हेत पंढरीसी । सुखराशी लाधली । एकाजनार्दनी सुखाचे भांडार । जोडिले निर्धार न सरेची ।।१२५०।।

**आणिकांची धरिता आस** । होतो नाश जीवित्वा । म्हणोनी निर्धारिले मन । धरिले ठाणे रामकृष्ण । न धावे आता कोठे मन । हृदयी ध्यान धरिले ते । एकाजनार्दनी प्राण । ठेविला जाण समूळ चरणी ।।१२५१।।

**मागे बहुतांसी सांभाळिले** । ऐसे वरदान ऐकिले । म्हणवोनी धरिला लाहो । मनीचा संदेहो टाकुनी । अजामेळ पापराशी । नेला निज सत्य वैकुंठासी । तारिले उदकी पाषाण । ऐसे महिमान नामाचे । एकाजनार्दनी जाहलो दास । नाही आस दुसऱ्याची ।।१२५२।।

**उपाधीच्या नावे घातियेले शून्य** । आणिका दैन्यवाणे काय बोलू । टाकुनिया संग धरियेला देव । आता तो उपाव दुजा नाही । सर्व वैभव सत्ता तयाचे पदरी । जालो अधिकारी आम्ही बळे । एकाजनार्दनी तोडियेला संग । जालो आम्ही नि:संग हरिभजनी ।।१२५३।।

**सकळ प्रपंचाचे भान** । ते तव मृगजळा समान । जन्ममरणापरता । त्रिगुणाते नातळता । प्रपंचाची अलिप्त युक्ति । ऐशी आहे देहस्थिती । प्रपंची न दिसे भान । एकाशरण जनार्दन ।।१२५४।।

**उघड दाखविले देवा** । नाही सेवा घेतली । ऐसी प्रेमाची माउली । जगी व्यापक व्यापली । नाही घालीत भार काही । आठव देही रामकृष्ण । एकाजनार्दनी शरण । मन माझे नेले चोरून ।।१२५५।।

**मनाचे माथा घातिला धोंडा** । वासना कापुनी केला लांडा । जनी लांडा वनी लांडा । वासना रांडा सांडियले । वासना सांडोनी जालो सांडया । कामना सांडे विषयी लाताडे । एकाजनार्दनी तयाची चाड ।।१२५६।।

**मनाचे ते मन ठेविले चरणी** । कुर्वंडी करुनी जनार्दनी । ध्यानाचे ते ध्यान ठेविले चरणी । कुर्वंडी करुनी जनार्दनी । दयेची ते दया ठेविली चरणी । कुर्वंडी करुनी जनार्दनी । दयेची ते दया ठेविली चरणी । कुर्वंडी कुर्वंडी करुनी जनार्दनी । उन्मनी समाधी ठेविली चरणी । कुर्वंडी करुनी जनार्दनी । एकाजनार्दनी देहाची कुर्वंडी । वोवाळोनि सांडी जनार्दनी ।।१२५७।।

**एक भाव दुजा न राहो मनी** । श्रीरंगावाचूनि दुजे नाही । मनासी ते छंद आदर आवड । नामामृत चाड गोविंदाची । एकाजनार्दनी नाम वाचे गाऊ । आणीक न ध्याऊ दुजे काही ।।१२५८।।

**अवघे देवा तुज समान** । मज नाही भिन्न भिन्न । नाम वाचे सदा गाऊ । आवडी ध्याऊ विठ्ठल । वारंवार संतसंग । किर्तन रंग उल्हास । एकाजनार्दनी सार । विठ्ठल उच्चार करू आह्मी ।।१२५९।।

**भुक्ति मुक्तीचे कारण** । नाही नाही आह्मा जाण । एक गाऊ तुमचे नाम । तेणे होय सर्व काम । धरलिया मूळ । सहज हाती लागे फळ । बीजाची आवडी । एकाजनार्दनी गोडी ।।१२६०।।

**लौकिकापुरता नोहे हा विभाग** । साधिले अव्यंग सुखसार । अविट विटेना बैसले वदनी । नाम संजिवनी ध्यानी मनी । बहुता काळाचे ठेवणे शिवाचे । सनकसनंदाचे कुळदैवत । एकाजनार्दनी भाग्य ते चांगले । ह्मणोनि मुखा आले रामनाम ।।१२६१।।

**वेदाचा वेदार्थ शास्त्राचा शास्त्रार्थ** । आमुचा परमार्थ वेगळाची । श्रुतीचे निजवाक्य पुराणीचे गूज । आमुचे आहे निज वेगळेचि । तत्वाचे परमतत्व महत्वासी आले । आमुचे सोनुले नंदाघरी । एकाजनार्दनी ब्रह्मांडाचा जीव । आमुचा वासुदेव विटेवरी ।।१२६२।।

**गाढवा सांगती सुकाळ लाथांचा** । श्रम जाणिवेचा वाया जाय । आह्मासी तो एक प्रेमाचे कारण । नामाचे चिंतन विठोबाच्या । एकाजनार्दनी आवडी हे माझी । संतचरण पूजी सर्वकाळ ।।१२६३।।

**दास्यत्वे चोखट** । रामनामे सोपी वाट । करिता लाधले चरण । मना जाहले समाधान । होतो जन्मोजन्मी तापलो । तुमचे दरुशने निवांत ठेलो । शरण एकाजनार्दनी । जनार्दन एकपणी ।।१२६४।।

**रामकृष्णनाम** । कथा करू कीर्तन । हाचि आह्मा मंत्र । सोपा दिसे सर्वत्र । संतांचे संगती । मुखी नामामृत तृप्ती । वसो कीर्तनी सदा । माझी मती गोविंदा । जनार्दनाचा एका । ह्मणे माझी कीव भाका ।।१२६५।।

**चरणाची सेवा आवडी करीन** । कायावाचा मन धरुनी जीवी । यापरते साधन न करी तुझी आण । हाचि परिपूर्ण नेम माझा । एकाजनार्दन एकत्वे पाहीन । हृदयी ध्याईन जनार्दन ।।।१२६६।।

**मागे बहुतांची मानिला विश्र्वास** । म्हणोनि मी दास सत्य जाहलो । कायावाचामन विकिले चरणी । राहिले धरुनि कंठी नाम । एकाजनार्दनी नामाचा प्रताप । भक्त आपोआप तरताती ।।१२६७।।

**वायाविण करू नये बोभाट** । सापडली वाट सरळ आह्मा । आता नाही भय तत्वता । ठेविला माथा चरणावरी । धरिल्या जन्माचे सार्थक । निवारला थोर धाक । गेला मागील तो शीण । तुमचे दरूशन होताची । पूर्णपणे पूर्ण जाहलो । एकाजनार्दनी धालो ।।१२६८।।

**अवघा व्यापक दाविला** । माझा संदेह फिटला । मन होते गुंडाळले । आपुले चरणी पै ठेविले । केले देहाचे सार्थक । तुटला जन्ममरण धाक । नाही पहावया द्र्ष्टी । अवघा जनार्दन सृष्टी । कार्य कारण हारपले । व्दैत अवघे निरसले । उडाले वैरियाचे ठाणे । आता एकचि जाहले एकपणे । दुजा हेत हरपला ।एकाजनार्दनी एकला ।।१२६९।।

**सखीये अनुतापे वैराग्यतापे अति संतप्त** । नयनी अश्रु अंगी स्वेद रोमांच जीवी जीव मूर्छित वो । माझे मजमाजी गुरुकृपा मन ते जाले उन्मन वो । देही देह कैसा विदेह जाले क्रिया चैतन्यधन वो । माझे मीपण पहाता चित्ती चित्त अचिंत्य वो । वृत्ती निवृत्ति तेथे चिद्रूप जाली परमानंदे तृप्त वो । एकाजनार्दनी एकत्वे जन वन समसमान एक । एकपणे परिपुर्ण जाला त्रैलोक्य आनंदघन वो ।।१२७०।।

**असोनी देही आम्ही विदेही भाई** । नातळो कर्म अकर्माचे ठाई । माझे नवल म्याच पाहिले डोळा । शब्द निशब्द राहिलो वेगळा । काय सांगू नवलाची कहाणी । पाहते पाहाणे बुडाले दोन्ही । न पाहावे न देखवे नायकवे कानी । कायावाचामने शरण एकाजनार्दनी ।।१२७१।।

**जाहली गेली तुटली खुंटली हाव** । पाहता पाहणे एकचि जाहला देव । जंगम स्थावर अचळ चळाचळ । अथवा व्यापुनी राहिला अकळ । न कळे लाघव खेळ खेळे करुणादानी । कायावाचामने शरण एकाजनार्दनी ।।११७२।।

**देव पाहता मजमाजी भेटला** । संदेह फिटला सर्व माझा । माझा मीच देव माझा मीच देव । सांगितला भाव श्रीगुरूने । एकाजनार्दनी पाहिलासे देव । फिटला संदेह आता माझा ।।११७३।।

**पहावया गेलो देव । तो मीच स्वयंमेव** । आता पाहणेची नाही । देव भरला ह्दयी । पाहता पाहता खुंटले । देवपण मजमाजी आटले । परतले द्र्ष्टीचे देखणे । अवघा देव ध्यानेमने । एकाजनार्दनी देव । नुरे रिता कोठे ठाव ।।११७४।।

**कायावाचामने** । कृपाळु दीनाकारणे । ऐसा समर्थ तो कोण । माझ्या जनार्दनावाचून । माझे मज दाखविले । उघड वाचे बोलविले । जनी जनार्दन । एका तयासी शरण ।।११७५।।

**सर्व देवांचा हा देव** । उभा रावो विटेवरी । त्याचे ठायी भाव माझा । न दिसे दुजा पालटु । वारंवार ठेवीन डोई । उगेच पायी सर्वदा । न मागे भुक्ति आणि मुक्ति । संतसंगती मज गोड । त्याचे वेड माझे मनी । शरणएकाजनार्दनी ।।११७६।।

**आजी देखिली पाऊले** । तेणे डोळे धन्य जाहले । मागील शीणभारू । पाहता न दिसे निर्धारु । जन्माचे ते फळ । आजी जाहले सुफळ । एकाजनार्दनी डोळा । विठ्ठल देखिला सावळा ।।१२७७।।

**सायासाचे बळ** । ते आजी जाहले अनुकूल । धन्य जाहले धन्य जाहले । देवा देखिले हृदयी । एकाजनार्दनी संशय फिटला । देव तो देखिला चतुर्भुज ।।१२७८।।

**मज करू दिली नाही सेवा** । दाविले देवा देहीच । जग व्यापक जनार्दन । सदा वसे परिपूर्ण । भिन्न भिन्न नाही मनी । भरलासे जनी वनी । एकाजनार्दनी शरण । सर्वाठायी व्यापक जाण ।।१२७९।।

**मानसीच ध्यान मानसीच स्नान** । मानसीच अर्चन करू आह्मी । न करू साधन लौकिकापुरते । न पुजू दैवते आन वाया । मानसीच तप मानसीच जप । मानसी पुण्यपाप नाही आह्मा । मानसी धरू जनार्दन । मानसी तीर्थयात्रा मानसी अनुष्ठान । मानसी धरू ध्यान जनार्दन । एकाजनार्दनी मानसी समाधी । सहज तेणे उपाधी निरसली।।१२८०।।

**मानसीच अर्थ मानसीच स्वार्थ** । मानसी परमार्थ दृढ असे । मानसीच देव मानसीच भक्त । मानसीच अव्यक्त दिसतसे । मानसीच संध्या मानसी मार्जन । मानसी ब्रह्मयज्ञ केला आह्मी । मानसी आसन मानसी जनार्दन । एकाजनार्दना शरण मानसीच ।।१२८१।।

**बहुत पुराणे बहुत मतांतरे** । तयांच्या आधारे बोल नोहे । शाब्दिक संवाद नोहे हा विवाद । सबाह्य परमानंद हृदयामाजी । नोहे हे कवित्व प्रेमरस काढा । भवरोग पिडा दुरी होय । नोहे हे कामनिक आहे पै निष्कामनिक । स्मरता नासे दु:ख जन्मांतरीचे । एकाजनार्दनी माझा तो निर्धार । आणीक विचार दुजा नाही ।।१२८२।।

**जो काळासी शासन कर्ता** । तोचि आमुचा मातापिता । ऐसा उदार जगदानी । जनार्दन त्रिभुवनी । आघात घात निवारी । कृपादृष्टी छाया करी । जन तोचि जनार्दन । एकाजनार्दन भजन ।।१२८३।।

**आह्मा काळाचे भय ते काय** । जनार्दन बापमाय । पाजी प्रेमाचा तो पान्हा । नये मना आन दुजे । दिशाद्रुम भरला पाही । जनार्दन सर्वाठायी । एकाजनार्दन ध्यात । जनार्दन तो ध्याना आत ।।१२८४।।

**स्वर्ग मृत्यु पाताळ सर्वावरी सत्ता** । नाही पराधीनता जिणे आमुचे । नाही त्या यमाचे यातनेचे भय । पाणी सदा वाहे आमुचे घरी । नाही जरामरणव्याधीचा तो धाक । सुखरूप देख सदा असो । एकाजनार्दनी नामाच्या परिपाठी । सुखदु:ख गोष्टी स्वप्नी नाही ।।१२८५।।

**जन्मोजन्मी आम्ही बहुपुण्य केले** । मग या विठ्ठले कृपा केली । जन्मोनी संसारी झालो याचा दास । माझा तो विश्र्वास पांडुरंगी । भ्रमर सुवासी मधावरी माशी । तैसे या देवासी मन माझे । आणिका देवासी नेघे माझे चित्त । गोड गाता गीत विठोबाचे । एकाजनार्दनी मज तेथे न्यावे । हाडसोनी द्यावे संतापाशी ।।१२८६।।

**अगाध तुझी लीला आकळ कैसेनी कळे** । ब्रह्मा मुंगी धरुनी तुझे स्वरूप सावळे । तुज कैसे भजावे आपणा काय देखावे । तुजमाजी राहुनी तुजला सेवावे । अगा देव तू आम्हा म्हणसी मानवी । हेम अलंकार वेगळे निवडावे केवि । एकाजनार्दनी सबाह्याभ्यतरी नांदे । मिथ्या स्वप्नजात जेवि जाय ते बोधे ।।१२८७।।

**नवविधा भक्ति नव आचरती** । त्याची नामकीर्ति सांगू आता । एक एक नाम घेता प्रात:काळी । पापा होय होळी क्षणमात्रे । श्रवणे परिक्षिती तरला भूपती । सात दिवसा मुक्ति जाली तया । महाभागवत करुनी श्रवण । सर्वांगाचे कान केले तेणे । श्रीशुक आपण करूनि किर्तन । उध्दरिला जाण परीक्षिती । हरी नामघोष गर्जे तो प्रल्हाद । स्वानंदे प्रबोध जाला त्यासी । स्तंभी अवतार हरि प्रकटला । दैत्य विदारिला तयालागी । पायाचा महिमा स्वये जाणे रमा । प्रीय पुरुषोत्तमा जाली तेणे । हरिपदाबूज सुकुमार कोवळे । तेथे करकमळे अखंडित । गायीचिया मागे श्रीकृष्ण पाऊले । अक्रुरे घातले दंडवत । करुनी वंदन घाली लोटांगण । स्वानंदे निमग्न जाला तेणे । दास्यत्व मारुती अर्चे देहस्थिती । सीताशुद्धि कीर्ति केली तेणे । सेव्य सेवक भाव जाणे तो मारुती । स्वामी सीतापति संतोषला । सख्यत्व स्वजाती सोयरा श्रीपती । सर्वभावे प्रीति अर्जुनासी । उपदेशिली गीता सुखी केले पार्था । जन्ममरण वार्ता खुंटविली । आत्मनिवेदन करुनिया बळी । जाला वनमाळी व्दारपाळ । औट पाऊल भूमी घेउनी दान । याचक आपण स्वये तयालागी । एकाजनार्दनी आत्मनिवेदन । भक्ति दुजेपण उरले नाही ।।१२८८।।

**हरिकथा श्रवण परिक्षिती सुजाण ऐकता आपण अंगे होये** । होय न होय ऐसा संशय नाही पूर्णत्व परिपूर्ण राहे । राहिले गेले देह ज्याचा तो नेणे देहीच विदेही होये । श्रवण समाधी नीच नवा आनंद ब्रह्माहमस्मि न साहे रया । नवविधा भक्ति नवविधा व्यक्ति अवधिया एकची प्रप्ति । एकाजनार्दनी अखंडता मुक्तिची फिटे भ्रांति रया । हरीच्या कीर्तने शुक आणि नारद छेदिती अभिमानाचा कंदु । गाता पै नाचता अखंड पै उल्हास कीर्तनी प्रेंमाल्हादु । हरीनाम गजर स्वानंदे हुंबरे जितीला मायेचा बाधु । श्रोता वक्ता स्वये सुखरूप जाला वोसंडला ब्रह्मानंदु रया । हरीचेनी स्मरणे व्दंव्द दु:ख नाही हे भक्तिप्रल्हादा ठायी । कृतांत कोपलिया रोमही वक्र नोहे मनी निर्भयता निज देहि । अग्नी विष आप नेदी त्या संताप न तुटे शास्त्राचे घाई । स्मरणाचेनि बळे परिपुर्ण जाला देह विदेह दोन्ही नाही रया । हरिचरणामृत गोड मायेसी उठी चाड लाहे लाहे जाली रमा । चरणव्दय भजता मुकली व्दंव्दभावा ह्मणोनी पढिये पुरुषोत्तमा । हरिपदा लागली शिळा उद्धरली अगाध चरणमहिमा । चरणी विनटोनी हरिपदा पावली परि चरण न सोडी रया । शिव शिव यजिजे हे वेदीचे वचन पृथुराया बाणले पूर्ण । पूज्यपूजक भाव सांडोनी सद्भावे करी पूजन । देवी देव दाटला भक्त प्रेमे आटला । मुख्य हे पूजेचे विधान । त्रिगुण त्रिपुटी छेदुनिया पुजेमाजी समाधान रया । हरिचरण रज रेणु वंदुनिया पावन जाला अक्रूर । पावनपणे प्रेमे वोसंडे तेणे वंदी श्र्वानसूकर । वृक्ष वल्ली तृणा घाली हरिस्वरूप चराचर रया । जीव जीवो जिणे परि वचन नुलघणे सेवेचा मुख्य हा हेतु । या सेवा विनटोनि सर्वस्वे भजोनि दास्य उद्भट हनुमंतु । शस्त्राचेनि बळे न तुटे न बुडे न जळे देही असोनी देहातीतु । जन्ममरण होळी कासे भासे बळी न जळे देही असोनी देहातीतु । जन्ममरण होळी कासे भासे वळी भजने मुक्त कपिनाथु रया । सख्यत्वेपर पार पावला अर्जुन त्यासी न पुसत दे ब्रह्मज्ञान । स्वर्गाची खणखण वाणाची सणसण उपदेशा तेचि स्थान । युद्धाचिये संधि लाविली समाधि कल्पांती न मोडे जाण । निज सख्य दोघा आलिंगन पडिले भिन्नपणे अभिन्न रया । बळीची दान दिक्षा कैसी जीवे देऊनी सर्वेस्वेसी निजबळे बांधी देवासी । अनंत अपरंपार त्रिविक्रम सधर आकळिला हृषिकेशी । हृदयीचा हृदयस्थ आकळिता तव देवची होय सर्वस्वेसी । यापरि सर्वस्व देवासी अर्पुनी घरीदारी नांदे देवेशी रया । भक्ति हे अखंड अधिकाराचे तोंड खंडोनी केले नवखंड । एकएका खंडे एक एक तरला बोलणे हे वितंड । अखंडता जव साधिली नाही तव मुक्त ह्मणणे हे पाषांड । बद्धता मुक्तता दोन्ही नाही ब्रह्मत्व नुरे ब्रह्मांड रया । सहज स्वरूपस्थिती तया नांव भक्ति नवविधा भक्ति भासती । ऐशी भक्तीप्रति अंगे राबे मुक्ति दास्य करी अहोराती । दासासी अनुसरणे हे तवं लाजिरवाणे मूर्ख ते मुक्ति मागती । एकाजनार्दनी एकविधा भक्ति तै चारी मुक्ति मुक्त होती रया ।।१२८९।।

**मूळची एक सांगतो खूण** । एक आधी मग दोन । तया पासाव चार तीन । व्यापिले पांचे परिपूर्ण । ते भरुनी असे उरले । सर्वा ठायी व्यापियले । जळी स्थळी सर्व भरले । शेखी पाहता नाही उरले । निवृत्ति ज्ञानदेव सोपान । हेचि जाणती प्रेमखूण । समाधी पावले समाधान । नाही उरले भिन्नाभिन्न । शरण एकाजनार्दनी । खूण बाणली निजमनी । व्यापक दिसे तिही त्रिभुवनी । गेला देहभाव विसरुनी ।।१२९०।।

**एक एक म्हणती सकळ लोक** । पाहता एकाएक हारपले । एकाविण एक गणीत नाही देख । ते नित्य वोळख निजी आत्मिया रे । त्वपद तत्पद असिपद नाही । ठायीच्या ठायी निवोनी पाही । सच्चिदानंद तिन्ही नाम माया । सूक्ष्म कारण तेथे भूलू नको वाया । अहं ते मीपण सोहं ते तूपण । अहं सोहं सांडोनि पाहे निजकानन । एकाजनार्दनी सांडी एकपण । सहज चैतन्य तेथे नाही जन्ममरण ।।१२९१।।

**लक्ष गावे तरणी** । पृथ्वी व्यापी निजकरणी । तो साक्षी अलिप्तपणी । जेथीच्या तेथे । तैसा आत्मा देही । म्हणती त्यासी ज्ञान नाही । तो व्यापुनी सर्वाठायी । साक्षत्वे असे । सद्गुरूमुखीचा विचार । जयासी झाला साक्षात्कार । उदेला ज्ञान भास्कर । अज्ञानतिमिरी । हिरवा पिवळा । संगे रंग जाला निळा । स्फटिक या वेगळा । आत्मा तैसा । तैसी ज्ञान किल्ली । जयाचे हाता आली । तयाने उगविली । अज्ञान कुलुपे । एका जनार्दनाचा रंक । त्याचे बोधे कळला विवेक । पूर्ण बोधाचा अर्क । उदया आला ।।१२९२।।

**परेहुनी कैसे पश्यंती वोळले** । मध्यमी घणावले सोहं बीज । वैखरियेसी कैसे प्रकट पै जाले । न वचे ते बोल एकविध । साक्षात्कारे कैसे निजध्यासा आले । मननासी फावले श्रवणव्दारे । सुखासुख तेथे जालीसे आटणी । एकाजनार्दनी निजमुद्रा ।।१२९३।।

**स्वयंप्रकाशामाजी केले असे स्नान** । व्दैतार्थ त्यागून निर्मळ जाहलो । सुविद्द्येचे वस्त्र गुंडोनि बैसलो । भूतदया ल्यालो बिभूती अंगी । चोविसापरते एका वोळखिले । तेचि उच्चारिले मूळारंभी । अकार हारपला उकार विसरला । माकारातीत केला प्रणव तो । अहंकर्म सर्व सांडियेल्या चेष्टा । तोचि आपोहिष्टा केले कर्म । संसारासी तीन वोंजळी घातले पाणी । आत्मत्वालागुनी अर्ध्य दिले । सोहं तो गायत्री जप तो अखंड । बुद्धिज्ञान प्रचंड सर्वकाळ । एकाभावे नमन भूता एकपणी । एकाजनार्दन संध्या जाहली ।।१२९४।।

**अविवेके देखा नवल केले** । अभिमाने कैसे लग्न लाविले । गुणाची नोवरी अवगुणाचा नोवरा । सख्या सहोदरा लग्न केले । पांचे सुरवाडी सासुरवाडीये । अकल्पाचे शेजे निजलीये । अंगसंगेविण संतती जाहली । आब्रह्म कैसी तात्काळ व्याली । गुणाचेनि बळे वरसोनि पोटे । घरोघरी भेटी नेत असे । सत्कर्म विवेकु पोटासी आला । तेणे जागविला आपुला व्याला ।

उठोनिया वरु संतती खाये । नोवरीसहित गेली माये । पितामहाचा पिता सुभानुतेजे । एकाजनार्दनी न दिजे दुजे ।।१२९५।।

**निरासिया वरुआपरूपे** । नुपजता लग्न लाविले बापे । निरासिया वरु निरासिया वरु । निरासि गमला केला संसारु । निरासिया वरु साजिरा कैसा । अंगाचिया तेजे आरसा जैसा । निरासिया जोवरी आस । संकल्पाशी जो तोडितो पाश । आस निसस जाली पाही । एकाजनार्दनी सलग्न पायी ।।१२९६।।

**एक माझी माता दोघेजण पिता** । मज तीन कांता दोघे सुत । वेद जाणा बंधु दशक बहिणी । कन्या झाल्या तिन्ही माझे पोटी । बंधु बहिणी संलग्न ते लाविले । विपरीत झाले सांगवेना । एकाजनार्दनी सांगतसे गूढ । नाही तरी मूढ । नाही तरी मूढ होऊनि राहे ।।१२९७।।

**विपरीत अर्थ ऐकता कानी** । पुरुष गाभणा स्त्रीचेनि चिंतनी । नवल गे माय नवल गे माय । तीन पोरे वयाला सांगू काय । एक ब्रह्मचारी कळी लावा मोठा । साठ पोरे४ व्याला पहा चोहटा । एका भेले गर्भी असता गे माय । बारा वर्षे लपले सांगू मी काय । एकाजनार्दनी उघडली द्दष्टी । अर्थ पहाता सुख होय पोटी ।।१२९८।।

**विटाळेविण पोटा आला** । अवघा संसार मिंधा केला । लग्न लागता आला पोटा । मग सोडिले अंतरपाटा । वोकारेसी बुडाली घडी । लग्न लाविले औटावे घडी । एकाजनार्दनी लग्न समरसे । पाहो गेलिया त्या लाविले पिसे ।।१२९९।।

**बोलू नये ते आले बोला** । आमुचा बाप गरवार जाला । नवलही ऐकिले ऐका जी तुझी चोज । ऐकु जाता तोचि नाचे भोजे । प्रौढ जाली आमुची आई । बापासी नावे त्या ठेविले पाही । लेकीने बापासी केले सावेव । एकाजनार्दनी पहा नवलाव ।।१३००।।

**अवघ्या संसाराचा कळस जाला** । आमुलाची कैसा पोटा आला । पाठी बैसला तोचि पोटी । उघड्या दिठी देखतसे । अमोल्याचे कुळ न सांगवे तोंड । सोय धरी तरी सखी भावंडे । पाठी पोटी बैसला पाठी । सोयरीक गोष्टी एकाजनार्दनी ।।१३०१।।

**बोलणे बोलता हेचि दुर्घट** । नुपजत लेकासी लाविला पाट । बोलू नये याचे सत्ते भेणे । मौनची राहाणे हेचि शहाणपण । तेथील संतती म्हणाल पवित्र । न म्हणता तरी घास कुळगोत्र । काही एक वेद बोलू गेला बोली । चवढाई चिरुनी तीन कांडे गेली । श्लाथोनी भक्ती बोलू गेली तोंडे । बोल बोले तव केली नवखंडे । लडिवाळ भक्त बोलोनी हासे । बोल

बोल तव लावियेले पिसे । बोलावया येतो चढला अभिमाना । बोल बोले तव दडविले राना । एकाजनार्दनी मौनची घोटी । एकपणे तेही घातले पोटी ।।१३०२।।

**बाप तोचि माय होऊनी आला पोटी** । जातक वर्णिता गुंती पडली भटा । बाप की माय म्हणावा पुत्र । भुललीया श्रुति करिता वृतांत । मी बापापोटी की बापू माझ्या पोटी । वर्णिता ज्योतिषी विसरले त्रिपुटी । एकाजनार्दनी जातक मोनी । जन्मनाम ठेविले नि:शब्द देऊनी ।।१३०३।।

**एकची दिठी एकाचे डोळे** । एक चाले कैसे एकाचिये खोळे । सबाह्य अभ्यंतरी सारिखा चांग । दोघे मिलोनिया एकची अंग । यापरी रिगाली अभिन्न अंगी । दोघे सामावले अंगीच्या अंगी । ऐसे लेकीने बापासी बांधिले कांकण । एकाजनार्दनी केले पाणिग्रहण ।।१३०४।।

**माये आधी लेक जन्मली** । दोघीच्या लग्नाची आवृत्ती केली । कोण नोवरा कोण नवरी । अर्थ पाहता न कळे निर्धारी । बापा आधी लेक जन्मला । लग्नाचा सोहळा बापाचा केला । वरात निघाली नोवरा नोवरी । एकाजनार्दनी नवलपरी ।।१३०५।।

**आंगुलीवरी आगुली** । खेळतसे तान्हुली । पडली तीची साउली । भिन्न माध्यांन्ही । दिवसाचे पाहणे । पाहता दिसे लाजिरवाणे । खेळ मांडिला विदाने । नवल ऐका । बारा सोळा घागरी । पाणी नाही थेंबवरी । नाहायासी बैसली नारी । मुक्त केशे । घरधणी उभा ठेला । तेणे रांजण उचलिला । जाऊनी समुद्री बुडाला । नवल ऐका । नाहता नारी उठली । परपुरुषा भेटली । आनंदाने बैसली । निजस्थानी । काळे निळे नेसली । जाऊनी दारवंटा बैसली । एकाजनार्दनी देखिली । नवल ऐका ।।१३०६।।

**जगामध्ये काय हालत** । ते दृष्टीसी नाही भरत । अचळ असोनी चळत । चंचळ ह्मणता आहे मुठी । कैसे बोटाने दाखवू तुला । सावध होई गुरूच्या मुला । हा शब्द अचोज वेगळा । अर्थ जाणे सहस्त्रात विरळा । काही नासोनी ते दिसत । नाही ह्मणता सत्य भासत । आकारी आकार लपत । वाउगे जाणत्यासी भासत । अहं सोहं कोहं लपाला । उघड दृष्टीरूपा आला । जगी व्यापक नसोनी व्यापला । एकाजनार्दनी गुरुपुत्र भला ।।१३०७।।

**चक्षुदर्पणी जग हे पहा** । जगज्जीवनी मुरुनी रहा । तुर्या कालिंदीतीर्थी पाहा । पापपुण्यासी तिलांजली वहा । डोळ्यानो सत्यही गुरूची खुण । आपुले स्वरूप घ्या ओळखून । तिही अवस्था सांडूनी मागे । अर्ध चंद्राच्या चांदण्यात वागे । चांदणे ग्रासोनि त्या ठाई जागे । गड उन्मनी झडकरी वेगे । एवढे ब्रह्मांडफळ ज्या देठी । ते आटले देखण्याचे पोटी । त्यासी पाहता पाठी ना पोटी । मीतुपणाची पडली तुटी । चहू शून्याचा निरसी जेणे । शून्य नाही

ते शून्यपणे । शून्यातीतचि स्वयंभ होणे । शून्य गाळूनी निरशून्यपणे । चारसहा दहा बारा सोळा । ह्या तो आटल्या देखण्याच्या कळा । कळातीत स्वयंभ निराळा । एकाजनार्दनी सर्वांग डोळा ।।१३०८।।

**नाभिस्थानी ठेवा हृदयकमळी पहावा** । व्दिदळी अनुभवा एकभाव । अर्धमात्रा बिंदु पहाता प्रकार । होऊनि साचार सुखी राहे । प्रणव ॐकार विचार करिता । बिंदूची तत्वता सर्वगत । कुंडलिनी गति सहजचि राहे । सहस्त्रदली पाहे आत्मरूप । भिन्नभिन्न नाही अवघेची स्वरूप । पाहता निजरूप रूप होय । तेथे कैचा विचारू कैचा पा अनाचारू । एकाजनार्दनी साचारु सर्व घटी ।।१३०९।।

**शुद्धब्रह्मज्ञानाचा धडा** । पंचभूतांचा खचला खडा । देह चतुष्ट पुसिला वाडा । धन्य धडफुडा आत्मा मी । शुद्धब्रह्मज्ञानाचा मार्ग । मृत्यु पातला सरले सर्ग । पिंड ब्रह्मांडाचे दुर्ग । विरोनी सर्व आत्मा मी । ॐ नमो जी जगदगुरु । सर्वाभूती साक्षात्कार । ब्रह्मा विष्णु महेश्र्वर । ॐकार तो वोळखिजे । अनंत ब्रह्मांडाचा टिळा । लाउनी बैसे ब्रह्म कपोला । त्यातही वेळा तरंग जळा । वरी तेवि ब्रह्मांड । ऐशा अनंत विभूती । दिगंबर अंगी चर्चिती । घडीने घडी लेप देती । पुसोनी जाती क्षणक्षणा । तैसे नव इंद्रिया सबाह्य । ब्रह्म कोंदले अनुभव पाहे । घट जळी बुडोनी राहे । ऐसा आहे दृष्टांत । गगन ग्रासोनी अपार । तैसा मी आहे सर्वेश्र्वर । अनंत ब्रह्मांडी अवतार । तरंग फिरे मजवरी । तुम्हा आहमा मध्ये जे अवकाश । ते सबाह्य ब्रह्म सावकाश । अनंत ब्रह्मांडे फुटती तयास । निरागास निर्गुण । हे ब्रह्म हे माया । का बोट लाऊनि दाखऊ शिष्यराया । आधारापासोनी सहस्त्रदळ काया । कसे काय ते ब्रह्म । ब्रह्म म्हणजे भकाश । की ब्रह्म ह्मणजे आकाशाहून पातळ । की ब्रह्म ह्मणजे शून्य सकळ । मिथ्या मूळ ते ब्रह्म । सोहं नाद सर्वांसी । विश्र्वनाथ विश्र्वासी । अमृतफळ अवियासी । लक्ष चौऱ्यायशी लोंबती । तैसे जन फळ जनार्दनी लोंबे । सोहं देठ दोहीकडे झोंबे । फळ दे वृक्ष लोंबे । अव्दैत बिंबले एकाजनार्दनी ।।१३१०।।

**स्वामी सेवका अबोला** । ऐसा जन्मचि अवघा गेला । जन्मवरी जुने भाते । साधन शिऊ नेदी हाते । काम करू नेदी हाती । उसंत नाही अहोरात्री । श्रद्धेविण अचाट सांगे । ढळो नेदी पुढे मागे । न गणी दिवस मास वरुषी । मागो जाता वहीच पुसी । चावा चावी करू नेदी । सगळे गिळवी त्रिशुद्धी । जो का ग्लानी साधन मागे । तेचि बंधन त्यासी लागे । जो सेवा करी नेटका । त्यासी करुनी सांडी सुडका । झोप लागो नेदी काही । निजे निज निजवी पाही । एकाजनार्दनी निज सेवा । जीवे उरू नेदी जीवा ।।१३११।।

**गो गोरसातील स्वानंद साखरेसी** । प्रेमे पेहे पाजीन सख्या सोयऱ्यासी । घेई घेई वाळा घोट एक । क्षणी पायरव होईल कुशली पडे तर्क । दृश्य न दिसे ते काळी अवघे लावी होटी । सद्दयुक्तीचे शिंपीवरी गिळी तैसे घोटी । अंतर तृप्त जाले सबाह्य कोंदले । निज गोडिये गोडपणे तन्मय जाले । सद्‌गुरू माउली पेहे पाजी अंगी भरला योग । तेणे देहबुद्धि समुळ केला त्याग । पंचभूतांचे अंगुले सुवर्ण हारपले । माझे माझे म्हणत होते त्यागुणा विसरले । आर्तीची हारली भूक जाले सुख । निजानंदी पालखी पहुडले स्वात्मसुख । पेहे पाजायचे मिसे देतसे पुष्टी तुष्टी । एका सामावला जनार्दना पोटी ।।१३१२।।

**नयन तान्हेले पाजावे काई** । मना खत झाले फाडू कवणे ठायी । ऐसा कोणीही वैद्दय मिळता का पुरता । सुखरूप काढी मनाची का व्यथा । डोळ्याची बाहुली पाहता झडपली । तिसी रक्षा भली केवि करू । निढळीची अक्षरे चुकली कानामात्रे । शुद्ध ल्याहावे कैसे लिहीणारे । जीवाचिया डोळा पडळ आले । अंजन सुदले केवि जाय । एकाजनार्दनी जाणे हातवटी । पुण्य घेउनी कोणी करा भेटी ।।१३१३।।

**धरा अधर जाली वोटांगणे काई** । जळे मळे ते घ्यावे कवणे ठायी । ऐसा कोण्ही गुणीया मिळो का निरुता । भुते धरे धरी आपुलिया सत्ता । अग्नि हिवेला तापावे कोठे । पवना प्राणु नाही कवण लावी वाटे । गगन हारपले पाहावो कवणे ठायी । मन मुळी लागले शांतीक ते पाही । स्वादे जेवणार गिळिला पै जाणा जेवणार । चवी सांगावया सांग ते कवणा । एकाजनार्दन जाणे एक खुणे । त्यासी भेटी कोणी घ्या एकपणे ।।१३१४।।

**संत आले वरले दिंडी** । हाती खुरक्या काखेत मुंडी । पंढरपूरी पडली होड । मुटक्या परीस धांगड गोड । आली वैष्णवांची मांदी । मेले डुक्कर बांधले खांदी । एकाजनार्दनी अर्थ उलटा । जो जाणे तो गुरूचा बेटा ।।१३१५।।

**हे सहजची थोरवले** । पृथ्वी आप तेज झाले । वायु आकाश संचले । आनंदले सकळही । ते मोहरी येवढे चक्र । गगनी हा निर्धार । याचा पाहे पा विचार । चैतन्यामाजी । तेथे वेदासी बोबडी । अनुभवी पैलथडी । एकाजनार्दनी गोडी । नित्य घेतसे ।।१३१६।।

**आता आम्ही सहजचि थोर** । ब्रह्मा विष्णु महेश्र्वर । परब्रह्म स्वये ॐकार । परात्पर जगदात्मा । आह्मी सहजचि स्वत:सिद्ध । जागृती सुषुप्ति साध्य । तुर्या त्रिसाक्षिणी बोध । अति अगाध उन्मनी । ते उन्मनी परात्पर । निर्गुण हो निराकार । तुर्या तिचा आकार । एकाजनार्दनी सगुणाकार देह झाला ।।१३१७।।

**उन्मनीचा हेलावा** । तुर्या त्रिनयनी दावावा । त्रिगुण तुर्या साठवावा । ते कारण उन्मनी । हाती देऊनी बावन कस । भूमंडळी फिरवावे भलत्यास । नाही लांछन हीन कसास । बाळकास तेवी ते । एकाजनार्दनी हा बोध । उघड बोलिलो सुबोध । अनुभवोनी गा बोध । संतचरण धरावे ।।१३१८।।

**रात्रदिवस जप होती साठ घटिका** । संख्या त्याची ऐका निरनिराळी । दिड घटिका पळे दहा निमिष दोन । प्रथम ते स्थान आधारचक्र । साडेसोळा घटिका दहा पळे लेखा । निमिषे तीन देखा स्वधिस्थानी । दहापळे देखा घटिका साडेसोळा असती । मणिपूर गणती निमिष चार । आणिक घटिपळे तितुकिच पाही । अनुहत थायी निमिष पांच । पावणेतीन घटिका दाहा पळे जाणा । विशुद्धीची गणना निमिष एक । अग्निचक्रावरी पावणेतीन घटिका । दिड पळ देखा निमिष एक । पळे आठ घटिका अडिचाची गणती । निमिष चवदा असती सहस्त्रदळी । सहाशे ते सहत्र एकविस होती । जनार्दनप्राप्ति एका उपाये ।।१३१९।।

**एक पाच तीन नावाचे शेवटी** । अठरा हिपुटी जयासाठी । सात तेरा चौदा घोकिता श्रमले । पंचवीस शिणले परोपरी । तेहतिसा आटणी चाळीसा दाटणी । एकूणपन्नासांची काहाणी काय तेथे । एकाजनार्दनी एकपणे एक । बावनांचा तर्क न चालेचि ।।१३२०।।

**एक दोन तीन विचार करती** । परि न कळे गति त्रिवर्गाते । त्रिरूप सर्व हा मायेचा पसर । त्रिवर्ग साचार भरले जग । त्रिगुणात्मक देह त्रिगुण भार वाहे । त्रिमूर्ती सर्व होय कार्यकर्ता । एकाजनार्दनी त्रिगुणावेगळा । आहे तो निराळा विटेवरी ।।१३२१।।

**चार देह चार अवस्था समाधि** । कासया उपाधि करिसी बापा । चार वेद जाण चार युगे प्रमाण । पाचवे विवरण न करी बापा । जनार्दनाचा एका चतुर्थ शोधोनि । पाचवे ते करी बापा । जनार्दनाचा एका चतुर्थ शोधोनि । पाचवे ते स्थानी लीन झाला ।।१३२२।।

**पंचक पंचकाचा पसारा पाचांचा** । खेळ बहुरूपिया पांचापासोनि । पृथ्वी आप तेज वायु आकाश जाण । पंचक प्राण मन पांचामाजी । इंद्रियपंचक ज्ञान ते पंचक । कर्म ते पंचक जाणे बापा । धर्म तो पंचक स्नान ते पंचक । ध्यान ते पंचक जाणे बापा । एकाजनार्दनी पंचकावेगळा । पाहे उघडा डोळा विटेवरी ।।१३२३।।

**सहा ते भागले वेवादती सदा** । सहाची आपदा होती जगी । सहांचे संगती घडतसे कर्म । सहा तो अधर्म करिताती । सहांचे संगती नोहे योगप्राप्ति । होतसे फजिती सहायोगे । एकाजनार्दनी सहांच्या वेगळा । सातवा आठवो मज वेळोवेळा ।।१३२४।।

**सातवा तो सर्वांठायी वसे** । शंकरांदित ध्याती तया अपेक्षा । तो सातवा हृदयी आठवा । आठविता तुटे जन्ममरण ठेवा । सातवा हृदयी ध्यावा जनी वनी पहावा । पाहुनिया ध्यावा मनामाजी । एकाजनार्दन सातवा वसे मनी । धन्य तो जनी पुरुष जाणा ।।१३२५।।

**आठवा आठवा वेळोवेळ आठवा** । श्रीकृष्ण आठवा वेळोवेळा । कलीमाजी सोपे आठवा आठवण । पावन तो जन्म आठव्यामे । आठवा नामे तारी पांडवा सहाकारी । दुराचारिया मारी आठवा तो । एकाजनार्दनी आठवयाची आठवण । हृदयी साठवण करा वेगी ।।१३२६।।

**नववा बैसे स्थिर रूप** । तया नाम बौद्धरूप । संत तया दारी तिष्ठताती निरंतरी । पुंडलिकासाठी उभा । धन्य धन्य विठ्ठल शोभा । शोभा चंद्रभागा तीर । गरुड हनुमंत समोर । ऐसा विठ्ठल मनी ध्याऊ । एकाजनार्दनी त्याला पाहु ।।१३२७।।

**तुमचे गुज तुम्हा बोले** । आमुचे त्यात काय केले । वरले आळीस नवल देखिले । एका पुरुषाने कुत्रे खादले । नवल मोठे जाणा । कान्होबा नवल मोठे जाणा । तुमच्या तुह्मी जाणा खुणा । ओस गावाचा एक मारुती । त्याचा बाप चोरी कटी दिवसराती । त्यासी पंचावन सांगती । गावच्या कुळकर्ण्यांची फजिती । गंगे आला महापूर । वाचून गेले तेथे अंबर । चंद्रसूर्य दारोदार । हिंडो लागली पांच पोरे । त्याला साक्षी एक जावई । सासुबाई देती ग्वाही । लेक आमुची ढालगज पाही । एका शरण जनार्दन पायी ।।१३२८।।

**रात्रीमाजी स्वप्न देखिले** । परपुरुषाचे घर पळाले । तेथे नागवे आडवे आले । तेणे उघडयासी गिळिले । नवल माझे तुम्ही पहा । उगवे नुगवता उगेच रहा । माझ्या नवलाची परी । खाली कुंभार वरते चाक फेरी । लक्ष लागे तोचि येईना हरि । ऐशी नवलाची कोण परी । नवल पाहून बहु भ्याले । या जगामधी नाही आले । ते स्वदेहासी मुकले । ऐशापरी नरनारी ठकले । या नवलासी गिळून । एका राहिला जनार्दन ।एकाजनार्दनी शरण । तो नवली नाही भिन्न ।।१३२९।।

**नका धरू धरू अनुमान** । आले मुसळासी कान । जातियाची पाळी करी रुदन । वेधियले मन चाटू वाचे । अर्थ करा माझे भाई । नका हिंडू दिशादाही । उठिला रागावूनि पाटा । येउनी बैसला दारवंटा । मोडिला काथवटीचा थाटा । वरवंटा नाचतसे । चूल धावुनी आली बाहेरी । रागावली घारीवरी । शिंकेकरी मारामारी । घरकुलासी भेदसावी । घर जाहले जुनाट वाउगे । पाया निघाला लागवेगे । भिंत उडाली सवेगे । कोणा कोणा आवरीना । एकाजनार्दन म्हणे । न कळे वेदांतीचा बोलणे । मतवादीयांचे ठाणे । सहज गेले उठोनी ।।१३३०।।

**कान्होबा नवल सांगतो गोष्टी** । एक वृक्ष द्दष्टी देखिला तयावरी सृष्टी । कोडे रे कोडे कान्होबा तुझे कोडे । जाणती जाणती अर्थ पहाता उघडे । वृक्षाग्नी नाही मूळ वर शेंडा नाही सरळ । बावन शाखा पल्लव पत्र पुष्प भरले सकळ । एकाजनार्दनी वृक्ष सुढाळ । तयावरी खेळे एक एकुलते बाळ ।।१३३१।।

**पंचभुते नव्हती जई** । तै वृक्ष देखिला भाई । अधोभागी शेंडा मूळ पाही । वरी वेधली तिसी पाय नाही । सांगे तु आमचे कोडे कान्होबा सांग तु आमुचे कोडे । नाही तरी जाऊ नको पुढे । नवलक्ष जया शाखा । पत्रपुष्पे तेचि रेखा । पंचभूते कोण लेखा। ऐसा वृक्ष देखिला देखा । तयावरी एक सर्पिण । तिचे खादिले त्रिभुवन । शरण एकाजनार्दन । हे योगियाचे लक्षणरे ।।१३३२।।

**सगुण निर्गुण नोहे वृक्ष** । पाहता नेत्री न भासे साद्दश्य । देखता देखता होतो अद्दध्य । सांगरे कान्होबा हे कोडे तुझे तुजपाशी केले उघडे । आह्मा न कळे वोडेकाडे । एक मुळी वृक्ष देखिला । व्दिशाखा तो शोभला । पाहता पत्रेपुष्पे न देखिला । ऐसे वृक्ष अपरंपार । एकाजनार्दनी करा विचार । मग चुकेल येरझार ।।१३३३।।

**अलक्ष अगोचर ह्मनती वृक्ष** । तो द्दष्टी न दिसे साक्ष । योगी ह्मणती पाहिला लक्ष । कान्होबा तुझे कोडे । तुजपुढे केले उघडे । सांगता वेद जाहले वेडेरे । सहा अठरांची मिळणी । छत्तिसांचे घातले पाणी । तो वृक्ष देखिला नयनी रे । पंचाण्णवाची एक शाखा । एकाजनार्दनी वृक्ष देखा । अर्थ पाहता मोक्ष रेखा रे ।।१३३४।।

**अहं सोहं वृक्षा तो निघाला वोहं** । याचा शेंडा नाही मा कोठे कोहं । कान्होबा उघड माझे कोडे । बोल बोलतो साबडे । अर्थ करी कारे निवाडे । वृक्ष जाहला मन पवन । वृक्ष जो सहजचि हवन । वृक्षे वेधले चाराचर गहन रे । वृक्ष भेदिले आकाश । एकाजनार्दनी निरवकाश । वृक्षचि जाहला अलक्ष रे ।।१३३५।।

**नीळवर्णी वृक्ष तो अति द्दश्य** । पाहता सावकाश द्दष्टी न पडे । भले कोडे कान्होबा हे तुझे । लय लक्षा न कळे ह्मणती माझे आणि तुझे । हि वृक्षाची वोळख धरा वरी । निवृत्ति ज्ञानदेव सोपान अधिकारी । एकाजनार्दनी वृक्ष सगुण निर्गुण । जहला पुंडलिकाकारणे ब्रह्म सनातन ।।११३६।।

**वृक्ष व्याला आकाश पाताळ** । वृक्षी प्रसवले लोकपाळ । अठयांशी सहस्त्र ॠषीमंडळ । कान्होबा बोलो तुझे कोडे । अर्थ ऐकता ब्रह्म जोडे । अभक्त होती केवळ वेडे रे । वृक्षाअंगी

पंचभूते । प्रसवला तत्वे निरते । अहं सोहं पाहता ते होते । एकाजनार्दनी पाहिला वृक्ष । गुरुकृपे वोळखिला साक्ष । भेदभाव गेला प्रत्यक्ष रे ।।११३७।।

**निर्गुण निराकार वृक्ष आकारला** । पंचतत्वे व्यापक जाहला । कान्होबा हे बोलणे माझे कोडे । पंचविसाचे ध्यानी नातुडे रे । साठ ऐशी शोभती शाखा । नवलक्ष पल्लव भोवती देखा रे । चौऱ्यायशी लक्षांची मिळणी । वृक्षरूपी एकाजनार्दनी रे ।।११३८।।

**ॐकार हा वृक्ष विस्तारिला** । चतु:शाखे थोर जाहला । पुढे षडंतर शाखे विस्तारला । अठराचा तया मोहोर आला । उघडे माझे कोडे । जाणती न जाणती ते वेडे । पडले विषयाचे साकडे । तया न कळे हे कोडे रे । चौऱ्यायशी लक्ष पत्रे असती । सहस्त्र अठ्ठ्यायशी पुष्पे शोभती । तेहतीस कोटी फळे लोंबती । ऐशी वृक्षाची अनुपम्य स्थिती रे । आदि मध्य अंत पाहता न लागे मूळ । एकविस स्वर्ग सप्त पाताळे । एकाजनार्दनी वृक्ष तो सवळ । उभा विटेवरी समूळ वो ।।११३९।।

**वृक्ष पाहता परतला आगम** । निगमा न कळे दुर्गम । वेदशास्त्रासी निरुते वर्म । तो वृक्ष देखिला विठ्ठलनाम । माझे सोपे कोडे । कान्होबा करी तू निवाडे । अर्थ सखोल ब्रह्मांड भक्ति भाव तयासी उघडे रे । साहाची येथे न चाले मती । चार गुंतले न कळे गती । अठरा भाटीव वर्णिती । ऐशियासी न कळे स्थिती रे । चौऱ्यायशी लक्ष भुलले वाया । अठ्ठ्याशी सहस्त्र भोगिती छाया पाया रे ।।११४०।।

**सोपा वृक्ष फळासी आला** । विठ्ठल नामे विस्तारला । वेदा न कळे मूळ शेंडा । शास्त्रे भांडती पै तोंडा । पुराणे स्तविता व्याकुळ जाहली । निवांत होऊनिया ठेली । मूळ वृक्ष जनार्दन । एकाजनार्दनी विस्तार पूर्ण ।।११४१।।

**देऊळ बांधिले कळस साधिले** । स्थापन ते केले लिंगाप्रती । पाया जो खंदला मध्येचि मंगला । शब्द मावळला काय सांगो । वरिल्या मंडपां मुंगीचे धरिले । त्रिभुवनी व्यापिले मकुंडयाने । एकाजनार्दनी मंडप उडाला । देवही बुडाला देऊळासहित ।।११४२।।

**नीर मंथुनी मंथन पै केले** । सार असार ते चवीस आले । ताक तेही गोड दुध तेही गोड । रसनेसी चाड पारूषली । मंथन करिता बुडाला रवि । सर्वांगी सर्व निज नाचवी । एकाजनार्दनी अवघेची सार । मानस मंथोनी पावलो पार ।।११४३।।

**भोगे चेतविसील नाना दु:खे** । तो तू भोगचि भोगसील मुखे । मीपण कैचे काये । हानी लाभ तुझा तूचि पाहे । भोग जै आले वाडवाड । तुझे आख अंग आम्हा आड । एकाजनार्दनी एक वर्म । माझेनि नावे तूचि भोगी कर्म ।।१३४४।।

**मजूर राऊळाचे धृत नेता** । तो तुरंगी चढे मनोरथा । सबळ वारूवाचे उड्डाण । म्हणोनि उडो जात आपण । बळे उडाला माझा घोडा । परि स्मरण नाही धगडा । उडीसरसी घागरी पडे । एकाजनार्दनी पाहूनी रडे ।।१३४५।।

**एक आधार खोचुनी स्वाधिष्ठाना येती मणिपुरी घेताती झटे** । चंद्रसूर्य कळा म्हणती बारा सोळा पवनासी करिती उफराटे । संतरावीचे क्षीर सेऊनि कळिकाळ वचनी ताठे । अबाह्य आत्माराम नेणुनि विश्राम व्यर्थचि करिती या चेष्टे । ते वर्म चूकलेरे ते वर्म चुकलेरे । जवळीच असता अंतरी न पाहे । ब्रह्मप्राप्ति केवी होय । मिमांसक मत्त कर्माचा आचार स्नानसंध्या यथायुक्ति । एक दोन तीन स्नाने झाली करिती नारायण स्मरण चित्ती । स्वये नारायण की तेथे आपण नेणती स्वरूपस्थिति । चारी वेद पूर्ण आचार होम क्रिया नित्य नेम आचरती । सिखासूत्र मंत्र त्रिकाळ क्रिया संध्यादि यथा पद्धति । पूजा ब्रह्मयज्ञ उपवास पारणे मध्यमाते नातळती । आत्मज्ञानेवीण न तुटे बंधन कष्टचि पावती अंती । विष्णु उदरी त्रिभुवन अवघे म्हणउनि वैष्णव झाले । तुळशी वृदावने हरीचे पूजन विष्णुपदी मिरविले । आत्मज्ञानेवीण न तुटे बन्धन कष्टची पावती अंती । विष्णु उदरी त्रिभुवन अवघे म्हणउनि वैष्णव झाले । तुळशी वृदंवने हरीचे पूजन विष्णुपदी मिरविले । हरिहरा भेद करिताती वाद जाणिवेने नागविले । आत्मज्ञानेविण न तुटे बन्धन कणेविण उपणिले । दैवत शिवापरते नाही जंगम राहिले नेहटी । शैव पाशुपत रुद्राक्ष विभूति आचार लिंगे कठी । पाषाण पुजूनि पवाडा करिती घालूनिया शस्त्रे पोटी । आत्मज्ञानेविण न तुटे बन्धन मरण पावती हटी । दरवेश काजी सैद मुलांना पढताती नित्य किताबा । करिती पंचवक्त निमज गळा घालूनी पोकळ जुभा । परमात्मा देही न पडेचि ठायी पश्चिमे मारिती बोंबा । आत्मज्ञानेवीण न तुटे बन्धन अंती करिती तोबा तोया । शक्तीचे उदरी त्रिभुवन आवघे आवडी पुजिती शक्ति । अर्चन हवन पूजन कामना वाढवूनी फळे घेती । जारण मारण स्तंभन मोहन अभक्त लाविले भक्ति । आत्मज्ञानेवीण न तुटे बन्धन चुकले ते निजमुक्ति । बौद्धरूपालागी क्षपणिक जाहाले करिताती लुंचि कर्मे । वेद विरोधान मनी निरोधन आचरती जैन कर्मे । वस्त्र फेडूनिया नग्न फिरताती न चुकती मरण जन्मे । आत्मज्ञानेवीण न तुटे बन्धन चुकली त्या गुरु वर्मे । भ्रष्टाचा आचार पालव माथा उफराटी काठी धरिती । पंचक्रोशी ध्यान पंथीचे स्मरण पढचक्रा उलटती । दर्शन खांडिती सज्जन निंदिती दुष्ट कर्मे आचरती । आत्मज्ञानेवीण न तुटे बन्धन व्यर्थ तनु विटंबिती । ऐसा एक एका संवाद

करिता अहंता ममताची पाही । अनुभवाची खुण नेणता निपुण बुडाले संसारडोही । स्वकर्माचरणमत्ताचे विवरण परमात्मा । न पडेची ठायी । एकाजनार्दनी अनुभवी तो जाणे सर्वेश्र्वर याच देही ।।१४१६।।

## ।।समाप्त।।